अर्वाचीन

# मराठी वाङ्मयसेवक

[ तृतीय खण्ड ]




—ग्रंथकर्ता—

गंगाधर देवराव खानोलकर

प्रथमावृत्ति ] १९५१ [ मूल्य चार रुपये

# प्रस्तावना

'वाङ्मयसेवका'चा द्वितीय खण्ड प्रसिद्ध होऊन जवळ जवळ अकरा वर्षे लोटल्यानंतर हा तृतीय खण्ड प्रसिद्ध होत आहे. वीस वर्षांपूर्वी जेव्हां या ग्रंथाची योजना मी मनाशीं ठरविली, तेव्हां पांच-सहाशें पृष्ठांत हे काम आटोपतां येईल असें वाटलें होतें. पण जसजसें संशोधन व संकलन करूं लागलो, तसतसें आपल्याला प्रारंभीं वाटलें होतें तेवढें आटोपशीर हें क्षेत्र नाहीं याची स्पष्ट कल्पना येऊं लागली. आज मजकडे जी ग्रंथकारनामसूचि तयार आहे ती पाहिली म्हणजे हें काम पूर्ण होण्यास आणखी हजार-दीड हजार पृष्ठें तरी खर्ची घालावीं लागतील असें वाटूं लागलें आहे.

'वाङ्मयसेवका'ची रचना ज्या स्वरूपाची आहे ती लक्षांत घेतां, ज्या तऱ्हेचें संदर्भसाहित्य अत्यंत आवश्यक असतें त्या तऱ्हेचें साहित्य आपल्याकडे तयार नाहीं. त्यामुळें साधनें हुडकून काढून त्यांचा आपल्या कामाला नीट उपयोग व्हावा यासाठीं त्यांची रचना करण्यांत कितीतरी वेळ व शक्ति खर्च होते. या संबंधींचें प्रत्यक्षच उदाहरण देतों. 'वाङ्मयसेवकां'तील प्रत्येक चरित्राच्या शेवटीं 'वाङ्मय' व 'चरित्र, चर्चा, अभ्यास' अशा दोन सूचि दिलेल्या आहेत. या सूचि तयार करण्यांत माझा कितीतरी वेळ गेलेला आहे. आज सुदैवानें श्री. शंकर गणेश दाते यांची 'मराठी ग्रंथसूचि' उपलब्ध असल्यामुळें माझें काम याबाबतींत बरेंचसें सुलभ झालें आहे. पहिल्या दोन खण्डांच्या वेळीं ही सूचि उपलब्ध असती तर माझ्या ग्रंथसूचीसाठीं साधनें धुंडाळण्यांत जो वेळ वांया गेला, तो अभ्यासांत व लेखनांत घालवितां येऊन ग्रंथनिर्मितीचें काम मला अधिक झपाट्यानें करतां आलें असतें.

आज श्री. दाते यांच्या 'ग्रंथसूची'मुळें वाङ्मयसेवकांतील एका सूचीचें काम थोडेंसें जरी हलकें झालेलें असलें, तरी दुसऱ्या सूचीचें काम तितकेंच किचकट व काळखावू बनलें आहे. या सूचीसाठीं मुख्यतः नियतकालिकें चाळावीं लागतात. आणि महाराष्ट्रांत असें एकहि ग्रंथालय नाहीं कीं जेथें मराठींत आजवर प्रसिद्ध झालेल्या एकोण एक नियतकालिकांचा संग्रह केलेला आहे. जो कांहीं थोडाबहुत संग्रह आहे तो मुंबई व पुणें येथील 'मराठी ग्रंथसंग्रहा-

लयां'त. त्यामुळें या 'संग्रहालयां'वरच केवळ अवलंबून न राहतां, सर्वत्र सतत शोध घेत राहावें लागतें. श्री. दाते यांच्या 'ग्रंथसूची'प्रमाणें मराठी नियतकालिकांत प्रसिद्ध झालेल्या लेखांची विषयवार, ग्रंथवार व ग्रंथकारवार कोणी सूचि तयार केली असती, तर आज माझीच नव्हे, तर सर्व अभ्यासकांचीच केवढी तरी सोय झाली असती. पण हें, अति कष्टाचें, झटपट प्रसिद्धी किंवा पैका मिळवून द्यावयाला असमर्थ असलेलें; अमाप शक्ति, वेळ व वित्त खाणारें काम करावयाला कोण कशाला पुढें येतो. साहित्यपरिषद् किंवा विद्यापीठ यांनीं मनांत आणलें तर तें होण्यासारखें आहे, पण त्यांना त्यांच्या नेहमींच्या व्यापांतून डोकें वर काढण्यास जेथें फुरसत मिळत नाहीं तेथें असल्या गोष्टीसंबंधीं विचार करावयास कोठें फुरसत असणार! शंकरराव दात्यांसारखा एखादा नादी मनुष्य, असल्या कामाचें वेड घेऊन बाहेर पडला तरच कदाचित् शक्यता! नाहींपेक्षां व्यावहारिक दृष्टया भिकार, व असलें वेड घेणाऱ्यालाहि कायमचें भिकारी बनविणाऱ्या या फंदांत कोण कशाला पडेल!

अमेरिका व इंग्लंड या देशांत प्रसिद्ध झालेले, वाङ्मयाभ्यासाच्या कामाला उपयोगीं पडणारे एकाहून एक सरस असे संदर्भ ग्रंथ पाहिले म्हणजे माझ्यासारख्याचे डोळे दिपून जातात. संदर्भग्रंथनिर्मितीचें जवळ जवळ शास्त्रच आतां त्यांचेकडे बनलें आहे अमेरिकेचें तर या बाबतींत विशेषच पाऊल पुढें आहे. साधनांच्या माहितीच्या अभावीं अभ्यास अडला असें ज्ञानाच्या कोणत्याहि क्षेत्रांतील अभ्यासकाला म्हणतां येणार नाहीं, एवढी विविध व विपुल संदर्भग्रंथसंपत्ति तिनें निर्माण केली आहे. भारतीय भाषा व त्यांतील वाङ्मय यांचा दर्जा उंचावण्याच्या घोषणा करणारे आमचे राज्यकर्ते व राजकारणी भाषाभिमानी याबाबतींत थोडेंसें लक्ष घालून आपापल्या प्रांतांच्या विद्याखात्यांस अशा तऱ्हेच्या कामांत भरभक्कम उत्तेजन देण्यास प्रवृत्त करतील तर संदर्भग्रंथनिर्मितीचें कार्य कांहीं प्रमाणांत तरी उभें राहूं शकेल.

प्रस्तुत खण्डांत एकुण ४६ चरित्रें आलीं आहेत. द्वितीय खण्डाचे शेवटीं 'प' व 'पा' या अक्षरानें सुरुवात होणाऱ्या वाङ्मयसेवकांचीं चरित्रें आलीं असतांहि या तिसऱ्या खण्डाची सुरुवात पऱ्हां 'प' या अक्षरापासून, क्रमभंगाचा दोष स्वीकारून, बुध्याच केली आहे. ती केली नसती तर, द्वितीय

खण्ड प्रसिद्ध झाल्यापासूनच्या अकरा वर्षांच्या कालांत ज्या व्यक्ति दिवंगत झाल्या त्यांचीं चरित्रें देणें शक्य झालें नसतें. डॉ. माधवराव पटवर्धन, ह. भ. प. पांगारकर यांचीं चरित्रें पुढें केव्हां तरी द्वितीय खण्डाचें पुनर्मुद्रण होईल त्या-वेळीं येतीं तरी या क्रमभंगाच्या दोषाबद्दल, हेतूकडे लक्ष देऊन, वाचकांनीं क्षमा करावी.

वाङ्मयसेवकाच्या या तृतीय खण्डासाठीं म. भा. भू. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर व श्री. चिं. ग. कर्वे यांजकडून अनुक्रमें 'लक्ष्मण रामचंद्र पांगारकर,' व 'नारायण भवानराव पावगी' यांजवर लेख लिहून घेतले आहेत. या दोघांहि मान्यवर लेखकांनीं मला केलेल्या या लेखनसहाय्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. या ग्रंथरचनेच्या कामीं श्री. शंकराव दाते यांच्या 'ग्रंथसूची'चा मला केवढा उपयोग होत आहे याचा उल्लेख मी वर एके ठिकाणीं केलाच आहे. या सूचीप्रमाणेंच त्यांजकडील कांहीं दुर्मिळ ग्रंथांचा व नियत-कालिकांचाहि मला, नवीन माहिती मिळविण्याचे कामीं, बराच उपयोग झाला. त्यांनीं सौजन्यपूर्वक केलेली ही मदत अमोल आहे.

यापुढें, 'वाङ्मयसेवका'च्याच कामाला मी वाहून घेतलें आहे. वर्षांतून कमीत कमी दोन खण्ड प्रसिद्ध करून, शक्य तेवढ्या लवकर, हातीं घेतलेलें हें काम पूर्ण करण्याची मनीषा आहे. आत्तां, लगेच प्रथम खण्ड परिष्करणास घेतला आहे. या खण्डाची पहिली आवृत्ति पांचसहा वर्षांपूर्वी संपली. नव्या आवृत्तींत न चिं. केळकर; श्री. कृ. कोल्हटकर; डॉ श्री. व्यं. केतकर; कृ. प्र. खाडिलकर; वा. म. जोशी; द. वि. आपटे; चंद्रशेखर वगैरेंचीं चरित्रें येतील हा खण्ड पूर्वार्ध व उत्तरार्ध अशा दोन भागांत प्रसिद्ध होईल.

'वाङ्मयसेवका'च्या लेखनाचें आतांपर्यंत उरकलेलें काम अल्प असून, उरकावयाचें काम मात्र अफाट आहे. तें कधीं संपेल याचा आज तरी अंदाज नाहीं. जीवितांतील, यापुढील, हें एकच एक व्यावसायिक कर्तव्य मानून मी त्यांत माझें लक्ष केंद्रित केलें आहे. मग त्याची पूर्ति होवो वा न होवो.

**विजयादशमी,**
ता. १ आक्टोबर १९४९
शिवाजी पार्क; मुंबई

सर्वांचा नम्र,
**गंगाधर देवराव खानोलकर**

मजविषयीं निरपेक्ष स्नेह बाळगणारे

माझे एक थोर स्नेही

# श्री. नारायण दाजी सामंत

यांस सादर अर्पण





डॉ. माधवराव त्रिंबक पटवर्धन
( माधव जूलियन् )

# अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक

## तृतीय खण्ड

**पटवर्धन, अनंत विनायक उर्फ वामनराव** [१८७३–१४-२-१९३९] 'ज्ञानप्रकाश' पत्राचे कांहीं काळ संपादक; 'संस्थानी स्वराज्य' या केवळ संस्थानी राजकारणाला वाहिलेल्या साप्ताहिकाचे संपादक; आर्यभूषण छापखान्याचे व्यवस्थापक. पुणें येथील 'भारतसेवक समाजा'च्या आद्य सभासदांपैकीं ते एक होते. नामदार गोखले यांच्याबरोबर आजन्म देशसेवेची शपथ त्यांनीं घेतली होती. हे मूळचे सांगलीचे असून, जमखिंडीच्या पटवर्धन घराण्यांत दत्तक गेले होते. यांचें शिक्षण सांगली व पुणें येथें झालें. १८९६ सालीं ते बी. ए. झाले. पदवी घेतल्यावर कांहीं काळ जमखंडी, जत, सांगली, बुधगांव येथील अधिपतींचे शिक्षक म्हणून त्यानीं काम केलें. आपल्या 'संस्थानी स्वराज्य' या साप्ताहिकाचे द्वारा, त्याचप्रमाणें श्री. न. चिं. केळकर यांच्या सहाय्यानें स्थापिलेल्या 'दक्षिणी संस्थान सभे'चे द्वारा संस्थानी प्रजेच्या बाबतींत त्यांनीं केलेली कामगिरी महत्वाची आहे. 'आर्यभूषण' छापखान्याला आज जें स्थिर, सुव्यवस्थित स्वरूप प्राप्त झालें आहे, त्यालाहि वामनरावांचेच परिश्रम कारण आहेत. वामनराव हे जुन्या पिढींतील, समाज-हिताच्या सर्व चळवळींकडे आस्थापूर्वक पाहणारे, कर्तबगार, त्यागी, निरलस व शीलसंपन्न असे समाजसेवक होते.

**पटवर्धन, गंगाधरराव गणेश** [१८६६—११-१२-१९३९] व्यायामविषयक पुस्तकांचे कर्ते; १९१५ सालीं मुंबई येथें भरलेल्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष; मिरज संस्थानाधिपती. १८७५ सालीं यांना मिरजसंस्थानाधिपतींनीं दत्तक घेतलें. कोल्हापूर येथील राजाराम हायस्कुलात व प्रो बाळाजी प्रभाकर मोडक यांच्या देखरेखीखालीं यांचे शिक्षण झालें. १८८७ सालीं त्यांना

मुखत्यारी मिळून ते संस्थानचा कारभार पाहूं लागले. मल्लविद्येचा यांना विशेष नाद होता. या विद्येसंबंधीं त्यांनीं अनेक पुस्तकें लिहिलीं. करारी, बाणेदार, शिस्तप्रिय व निर्व्यसनी अधिपती म्हणून यांचा लौकिक होता. व्यायामाप्रमाणेंच कीर्तनाचीहि यांना फार हौस असे.

**वा ङ्म य :**

( १ ) पुराणें म्हणजे काय ?–भाग १ ला; १९२५; रामविजय प्रेस, बडोदें.
( २ )  ,,  ,,  ,, —भाग २ रा; मिरज स्टेट प्रेस, मिरज.
( ३ )  ,,  ,,  ,, —भाग ३ रा;  ,,  ,,  ,,
( ४ )  ,,  ,,  ,, —भाग ४ था;  ,,  ,,  ,,
( ५ ) रासायनिक परीक्षण अथवा व्यवहारोपयोगी रसायनशास्त्र [ निरिंद्रिय. क्षारांचें पृथक्करण ], सचित्र; १८९८, विद्याविलास प्रेस, समर्थप्रसाद छापखाना, कोल्हापूर; दु.आ. १९०१, निर्णयसागर, मुंबई.
( ६ ) बिनोट, (व्यायामविषयक), १९२९; सचित्र; श्रीरामविजयप्रेस; बडोदें.
( ७ ) भीमसेनी कुस्ती-भ ग १ ला, सचित्र;१९२०;श्रीरामविजयप्रेस, बडोदें.
( ८ )  ,, —भाग २ रा, सचित्र; १९२२;  ,,  ,,
( ९ ) भीमसेनी कुस्ती-तोडी; सचित्र; १९२३; श्रीरामविजयप्रेस, बडोदें.
(१०) भीमसेनी कुस्ती-बंदी; सचित्र; १९२६; श्रीरामविजयप्रेस, बडोदें.
(११) मल्लविद्याशास्त्र—खंड १ ला; [ मल्लविद्येची साद्यंत माहिती. ]; १९२६; श्रीरामविजय प्रेस; बडोदें.
( १२ )  ,, —खंड २ रा; सचित्र; श्रीरामविजय प्रेस; बडोदें.

**पटवर्धन, गणपत हरिहर** [प्रथम खण्ड, पृ. ९५. पहा **कुरुंदवाडकर, गणपतराव हरिहर** ]

**पटवर्धन, माधव त्रिंबक** [२१ जाने. १८९४—२९ नोव्हेंबर १९३९] कवि, काव्यचर्चिक, कोशकार, छंदशास्त्रज्ञ, भाषाशुद्धि, लिपी व लेखनसुधारणा यांचा प्रचारक. जन्म बडोदें येथें आजोळीं झाला. वडील टपालखात्यांत पत्रांची विल्हेवारी लावण्याच्या कामावर होते. त्यांचें वारंवार स्थलांतर होत

असल्यामुळें माधवरावांचीं पहिलीं कांहीं वर्षे शिक्षणाच्या दृष्टीनें अनिश्चिततेंत गेलीं. कधीं मराठी शाळेंत, तर कधीं गुजराथी शाळेंत, तर कधीं इंग्रजीचें ज्ञान अकालीं लैकर व्हावें अशी इच्छा धारण करणाऱ्या वडिलांच्या करड्या शिस्तीखालीं, मिळून बराच काळ वायां गेला. आपल्या शिक्षणासंबंधीं स्वतः माधवरावांनींच पुढीलप्रमाणें माहिती, मोनेकृत ' मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरणप्रबन्धकार ' या पुस्तकासाठीं लिहिलेल्या चरित्रविषयक टिप्पणांत नमूद केली आहे. " १९०४ सालीं बडोदें येथें आजोळीं राहून शिक्षणाला सुरुवात केली. १९०९ सालीं माझी प्रवेश परीक्षा उतरली. शाळेंतच ऐच्छिक भाषा फार्शी घ्यावी लागली. संस्कृत घेतल्यास परीक्षेंत नापासच होण्याचा संभव अशी भीति वाटून, वडिलांनीं फार्शी घेण्याची माझ्यावर जबरदस्ती केली होती; आणि प्रवेश परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर ताबडतोब मी नोकरींत शिरून मार्गाला लागावें, असा त्यांचा आग्रह होता; परंतु माझे थोरले मामा रा. महादेव विश्वनाथ सहस्रबुद्धे यांच्या प्रोत्साहनानें आणि माझ्या ( कदाचित् आनुवंशिक ) आग्रही व महत्त्वाकांक्षी स्वभावामुळें मीं पदवीधर होण्याचें ठरविलें. मामांच्या व दुसऱ्या एका उदार नातलगाच्या सक्रीय सहानुभूतीमुळें अंशतः, परंतु मुख्यत्वेंकरून शिष्यवृत्त्या व शिकवण्या मिळवून, विद्यापिठांतील अभ्यासक्रम पार पाडून इ. स. १९१८ सालीं फार्शी व इंग्रजी हे विषय घेऊन एल्फिन्स्टन कॉलेजांतून एम. ए. ची परीक्षा दुसऱ्या वर्गांत पास झालों. माझ्या फार्शी भाषेच्या प्राविण्याविषयीं अनुकूल अभिप्राय परीक्षकांनीं आपल्या अहवालांत नमूद करून ठेविला आहे. त्या वर्षी फार्शी विषयांत तिघे बसले होते व मी एकटाच उत्तीर्ण झालों; परंतु हें प्राविण्य संपादण्यांत शाळेंतील वा महाविद्यालयांतील शिक्षण माझ्या उपयोगीं मुळींच पडलें नाहीं. चार-पांच ओळीसुद्धां धड वाचून भाषान्तरितां येत नसूनहि, भाषान्तरें व टिप्पण्या घोंकून, उदार परीक्षकांना झुकांड्या देऊन, मी निसटून जात होतों; इतकेंच नव्हे तर, पहिल्या वर्गाचे गुण मिळवून १९११ सालीं इंटरच्या परीक्षेंत महाविद्यालयांतीलच फार्शीचें फरीदुद्दीन अहमद बक्षीस मी मिळविलें ! १९१४ सालच्या डिसेंबर महिन्यांत, फार्शीचे मराठीवर काय संस्कार झाले, या विषयावर पदवीधरीनंतर काम करावयाचें असें ठरवून, फार्शी हा ऐच्छिक विषय घेऊन अभ्यासाला पुनश्च अलिफ् बे पे पासून सुरुवात केली;

आणि व्याकरण-कोशादि ग्रंथांना गुरु करून स्वावलंबी व्यासंग करूं लागलों. त्याच सुमारास, संस्कृतांत ज्यांनीं मुंबई विश्वविद्यालयाच्या प्रवेश–परीक्षेपासून स्नातक परीक्षेपर्यंत सर्व परीक्षांतील संस्कृताचीं पहिलीं पारितोषिकें मिळविलीं होतीं, अशा एका माझ्या गुरूस फार्शी शिकविण्याचा प्रसंग माझ्यावर आला. त्याचा मला तयारीच्या दृष्टीनें बराच फायदा झाला." एम्. ए. ची पदवी घेतल्यावर १९१८ सालीं ते पुण्याच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटींत दाखल होऊन, फर्ग्युसन कॉलेजांत फार्शीच्या अध्यापकाचें काम करूं लागले. १९२५ सालीं सोसायटीच्या सभासदांशीं 'निकराचा बेबनाव' झाल्यामुळें त्यानीं आपल्या जागेचा राजिनामा दिला. या राजिनाम्याचे आधीं त्यांना सोसायटीनें एक वर्ष सक्तीनें रजा घ्यावयाला लावली होती. या रजेच्या काळांत व राजीनामा दिल्यानंतर मे १९२८ पर्यंत त्यानीं अमळनेर येथील प्रताप हायस्कूल व पुणें महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचें हायस्कूल यांत शिक्षक म्हणून काम केलें. १९२८ च्या जून महिन्यांत कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांत फार्शीचा प्राध्यापक म्हणून त्यांची योजना झाली. याच कॉलेजांत ते अखेरपर्यंत होते. त्यांच्या वाङ्मयक्षेत्रांतील कार्याचा गौरव म्हणून, त्यांस नाशिक येथें १९३३ सालीं कविसंमेलनाचे, १९३६ सालीं जळगांव येथील महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष म्हणून निवडण्यांत आलें. मृत्यूपूर्वी कांहीं महिने (१९ फेब्रुवारी १९३९) मुंबई विश्वविद्यालयाकडून त्यांस त्यांच्या 'छंदोरचना' या प्रबंधावर 'डी. लिट्' ही पदवी देण्यांत आली. मराठी विषयांत ही पदवी मिळविणारे हे पहिलेच गृहस्थ होत. २९ नोव्हेंबर १९३९ रोजीं पुणें येथें त्यांच्या 'निवान्त' या बंगल्यांत 'लिव्हर कॅन्सर'च्या विकारानें त्यांचा अंत झाला.

माधवरावांच्या लेखनाला कवितालेखनानें प्रारंभ झाला. त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे '१९१० पासून कवितेचा कच्चा खर्डा गिरविण्यास सुरुवात झाली.' यानंतर कांहीं दिवसांनीं कवि चंद्रशेखर यांचें त्यांस सान्निध्य लाधून कलेच्या तंत्रमंत्रांशीं त्यांचा पद्धतशीर परिचय झाला. निर्दोष काव्य-रचना, वर्णनांतील रेखिवपणा व प्रसंगानुरूप भाव व्यक्त करणाऱ्या समर्पक शब्दांची निवड व गुंफण हे महत्त्वाचे गुण त्यांनीं चंद्रशेखरांकडून घेतले.

आणि अत्यंत कष्टपूर्वक त्यांची त्यांनीं जोपासना केली. चंद्रशेखरांचें हें ऋण त्यानीं अनेक प्रसंगीं व्यक्त केलें आहे. चंद्रशेखरांना नवीन पिढी जवळ जवळ विसरून चालली होती. अशा वेळीं त्यानीं त्यांच्या कवितेवर स्वतंत्र प्रबंध* लिहून हें गुरुऋण अंशतः फेडण्याचा प्रयत्न केला. आणि पुढें ज्या ज्या वेळीं जाहीर किंवा खासगी बैठकांत काव्यवाचनाचे प्रसंग येत त्या त्या वेळीं आपल्या या गुरूच्या 'गोदागौरवा' सारख्या त्यांना अप्रतीम वाटणाऱ्या कविता ते आवर्जून म्हणून दाखवीत, त्यांतील विविध सौंदर्यस्थळांचीं वर्णनें करून, त्यांतील इंगित श्रोत्यांना समजावून देण्यांत गुंग होऊन जात. नाशिक येथें १९३३ सालीं भरलेल्या 'महाराष्ट्र कविसंमेलना'चे वेळीं, आपल्या अध्यक्षीय भाषणांत या आपल्या थोर गुरूसंबंधींच्या भावना त्यांनीं पुढील-प्रमाणें व्यक्त केल्या होत्या, "अशा प्रसंगीं नि या नगरांत एका कविवर्यांची आठवण मला न होणें अशक्य आहे. आपल्या या पुण्यभूमींतील विविध स्थळांचें, या गोदावरीच्या परिसरांतील मोहक दृश्यांचें दर्शन मला त्यांनीं वीस-बावीस वर्षांपूर्वींच आपल्या 'गोदागौरव' काव्याचा द्वारा घडविलें आहे. त्या वेळीं मी नुकताच महाविद्यालयांत प्रवेश मिळविला होता आणि कुतूहलानें 'टला ट' जोडण्याचा खेळ खेळूं लागलों होतों. कविमन हें कसें संस्कारक्षम नि रसिक असतें याचा अनुभव मला त्यांच्या सहवासांत मिळाला. रचना निर्दोष नि घोटीव असावी, आणि शब्दांची योजना करितांना त्यांच्या नादमाधुर्यापेक्षां अर्थवाहकतेकडे अधिक लक्ष असावें या दोन गोष्टी त्यांच्या संभाषणानें नि विशेषतः त्यांच्या स्वतःच्या उदाहरणानें माझ्या मनावर बिंबल्या. आज त्यांच्या नि माझ्या भाषापद्धतींत नि काव्यस्वरूपांत कितीहि वैधर्म्य दिसलें तरी या दोन गोष्टींपुरते ते मला गुरुस्थानीं आहेत यांत किमपि संदेह नाहीं. म्हणून, आज माझा—वस्तुतः माझ्या पद्यपायिकीचा—जो गौरव

---

* पुणें येथील डेक्कन कॉलेजांत ११-९-२२ रोजी 'चंद्रशेखर आणि त्यांची कविता' यावर त्यांनीं व्याख्यान दिलें. हेंच व्याख्यान पुढें सुधारून व वाढवून निबंध-रूपानें पुणें येथील महाराष्ट्रशारदा मंदिराच्या विद्यमानें प्रसिद्ध झालेल्या 'काव्यचर्चा' या ग्रंथांत छापण्यांत आलें.

आपण केला आहे, त्याचें श्रेय राजकवि चंद्रशेखर यांना अर्पण करून मी व्यवहारदृष्ट्या तरी गुरुऋणांतून मुक्त होतों."

पटवर्धन चंद्रशेखरांना जरी काव्यक्षेत्रांतील आपले गुरु मानीत तरी त्यांच्या काव्यदृष्टीचा किंवा ध्येयाचा स्वीकार त्यांनीं कधींच केला नाहीं. चंद्रशेखरांचें काव्यशिल्प त्यांना आदर्श वाटे, आणि तेवढ्यापुरतेंच ते आनृण्य स्वीकारीत. चंद्रशेखरांइतकाच कविवर्य तांबे यांजबद्दल त्यांना नितांत आदर होता. साहित्यिकांच्या किंवा साहित्यभक्तांच्या बैठकींत चंद्रशेखर किंवा तांबे यांचा उल्लेख झाला नाहीं किंवा त्यांना स्वतःला आवडणाऱ्या त्यांच्या कवितांचें वाचन, वर्णन किंवा विवेचन घडलें नाहीं असें क्वचित् . तांबे यांच्या कवितांना ते केवढा मान देत हें पहावयाचें असेल तर त्यांनीं त्यांचेवर लिहिलेली लेखमाला* व त्यांचा अत्यंत कसोशीनें व परिश्रमपूर्वक संपादिलेला काव्यसंग्रह× हीं पहावीं. या दोन कविश्रेष्ठांच्या काव्यसृष्टीबद्दल एवढा आदर असूनहि स्वतःच्या पृथगात्मतेला त्यांनीं केव्हांहि ढळ पोंचूं दिला नाहीं. त्यांच्या स्वयंप्रकाशी प्रतिभेला परप्रकाश सहन होण्यासारखा नव्हता.

पटवर्धनांच्या काव्यरचनेला १९१० सालापासून सुरुवात झाली खरी, परंतु तिला प्रसिद्धी मिळावयाला जवळजवळ एक तप जावें लागलें. नाट्यछटाकार दिवाकर, कवि अनंततनय, द. ल. गोखले, श्रीधरपंत रानडे यांच्यांशीं परिचय होणें, त्यांच्याबरोबर शारदामंदिरांत जाणें-येणें घडणें व त्याबरोबरच क्रमप्राप्त असा साहित्यविषयक समान आवडीच्या मंडळीशीं सहवास घडून येणें या घटना १९११ सालीं न होत्या तर त्यांच्या कविता आणखी किती दिवस 'पिवळ्या जुन्या वहींत' पडून राहत्या हें सांगवत नाहीं. १९११ त 'मुरली' ही कविता लिहिल्यानंतर त्यांनीं आपल्या कांहीं कविता त्यावेळच्या लोकप्रिय व श्रेष्ठ म्हणून गणल्या गेलेल्या 'मासिक मनोरंजन' व 'नवयुग' या मासिक पुस्तकांकडे प्रसिद्धीसाठीं पाठविल्या होत्या, पण त्या 'साभार परत' आल्या. या मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या कवितांपेक्षां त्या खास कमी दर्जाच्या नव्हत्या. परंतु कवीपाशीं पदवी किंवा वशिला यांपैकीं कांहीं नसल्यामुळें, त्या काळीं

* लोकशिक्षण; लोकशिक्षण, सप्टें-आक्टो १९३०.

× तांबे यांची समग्र कविता.

तसें घडलें नसतें तरच आश्चर्य होतें. मानी आणि कांहीं विशिष्ट बाबतींत हळव्या असलेल्या पटवर्धनांच्या मनावर त्याचा परिणाम थोडासा अनिष्टच झाला. काव्यनिर्मिती जरी त्यांनीं थांबविली नाहीं, तरी तिच्या प्रसिद्धीसंबंधीं त्यांच्यांत औदासिन्यच उत्पन्न झालें. आपल्या अत्यंत निकटवर्ती अशा चारदोन स्नेह्यांखेरीज ते आपली कविता दाखविनातसे झाले.

पटवर्धन पुण्यास १९१८ सालीं आले; फर्ग्युसन महाविद्यालयांतील फार्शी भाषेचा अध्यापक म्हणून ते लोकांना माहित झाले. १९१९ सालीं पुणें येथें भरलेल्या पहिल्या प्राच्य विद्यापरिषदेपुढें त्यांनीं इंग्रजींतून वाचलेल्या "फार्शीतून मराठींत आलेल्या शब्दांच्या परिणतीचे नियम" या निबंधामुळें फार्शीचा पंडित म्हणूनहि त्यांचा थोडासा बोलबाला झालेला होता. पण ते कवि आहेत याची माहिती १९२१ पर्यंत कोणालाहि नव्हती. ही माहिती एके दिवशीं अचानकपणें कशी झाली याचें रसभरित वर्णन प्रो. श्रीधर बाळकृष्ण रानडे यांनीं आपल्या आठवणींत पुढीलप्रमाणें केलें आहे. "नाट्यछटाकार दिवाकरांनीं माझी त्यांच्याशीं ओळख करून दिली. कवि अनंततनय यांच्या घरीं रविवारीं सकाळीं पुण्यांतील कवि भेट देऊन जात. तेथें त्यांची एकदोनदा गांठ पडली. महाराष्ट्रशारदामंदिराच्या बैठकीस हजर राहून श्री. द. ल. गोखले यांच्याबरोबर माधवराव निमूटपणें बसून राहात. तरीहि विशेष परिचयाचा प्रसंग आला नाहीं व माधवरावर कविता लिहीत असतील याची पुसट कल्पनाहि माझ्या मनाला नव्हती. एक दिवस माधवरावांनीं आपल्या राहात्या खोलींत मला चहाला बोलाविलें. त्या फर्ग्युसन कॉलेजजवळच्या राहतेकरांच्या बैठ्या चाळींतल्या खोलींत मी सकाळीं सातच्या सुमारास थंडींत कुडकुडत गेलों. त्या खोलींत आवश्यक तेवढ्या वस्तु टापटिपीनें मांडलेल्या दिसत होत्या. चहा झाल्यावर माधवरावांनी टेबलाच्या खणांतून हलकेच 'कविता–वही' काढली व माझ्या हातांत साशंक मनानें दिली. ह्या चिमुकल्या वहींतील पंधरा–वीस कवितांत माधवरावांचीं तत्कालीन व भावी सर्व वैशिष्ट्यें बीजरूपानें होतीं. कवितांबद्दल मी आवेशानें अनुकूल अभिप्राय देऊन 'कांहीं प्रसिद्ध केल्या कीं नाहीं' असें विचारतांच माधवरावांनीं 'बडोदा मिसेलेनी' त्रैमासिकांतील कवितेचें एक कात्रण दाखविलें. माधवराव त्यावेळीं अत्यंत हळुवार झाले होते. 'माझ्या त्या

एकाच कवितेच्या प्रसिद्धीकरणानें मला अत्यंत मनस्ताप मात्र झाला; कविता प्रसिद्ध करायच्या नाहींत, कोणाला दाखवावयाच्या नाहींत, पण तुम्हांला आवडतात कीं नाहीं याची मला उत्कंठा होती.' असें ते म्हणाले, मी ती वही त्यांच्याकडून मागून घरीं नेली व आम्ही दोघांनीं (श्रीधरपंत व सौ. मनोरमाबाई) पुनः पुन्हां वाचून एक बेत कायम केला आणि त्याप्रमाणें पुढील रविवारच्या शारदा-मंदिराच्या बैठकींत माधवरावांना त्यांतील कांहीं कविता वाचण्यास आग्रह केला. मध्यभागीं तक्क्याशीं अनंततनय अध्यक्षस्थानीं बसले होते व त्या माडींत बिछायतीवर दोन्ही बाजूंना भिंतीशीं रेलून पुढें कवितांच्या वह्या ठेवून कवि बसले होते. नवीन कवींच्या ओळखी, आठवड्यांतील ताज्या गरम कवितांचें वाचन व ठराविक वादविवाद संपत आल्यावर मी माझ्याजवळ बसलेल्या माधवरावांच्यापुढें वही टाकून कविता वाचण्याचा आग्रह केला. माधवरावांनीं तीन-चार कविता वाचल्या. तें गझल वृत्त, ते साधे शब्द, मध्येंच बिचकविणारे ते पर्शियन शब्द, ती जोरदार पण रांगडी भाषा, ती निर्भीड पण मन हलविणारी विचारसरणी, तरुण मनाच्या गूढ, पवित्र व मनांतल्या मनांतच राहणाऱ्या भावना, 'कौमार्यस्मित', 'एक घाव', 'चिमकुली शांता', 'श्यामा रजनी', 'प्रेमाची परीक्षा नको', 'पिरोजा कोला' (कुमारी पिरोजा) अशा प्रकारच्या कविता ऐकत मी इकडे तिकडे आशेनें पाहात होतों. गिरीश, यशवंत, मनोरमाबाई यांच्याशिवाय इतर कोणालाहि त्या कवितांचें कौतुक वाटलें नाहीं. माधवरावांनीं वही मिटली. इतरांच्या कवितांचें वाचन सुरू झालें. माझी निराशा झाली.' पुण्याच्या तत्कालीन कवींच्या क्षेत्रांत अनुक्रमें राजा व प्रधान मानले गेलेले अनंततनय व प्रो. श्री. नी. चाफेकर यांना या नवागत कवीबद्दल विशेष कांहीं न वाटणें साहजिक होतें. 'ज्या गोष्टी अथवा जे प्रकार मराठी भाषेच्या व काव्याच्या वैशिष्ट्याच्या दृष्टीनें रूढ होणें कधींहि शक्य अथवा इष्ट नाहीं, अथवा खरें भाषागौरव व खरा भाषाविलास यांच्या दृष्टीनें ज्या तादृश महत्वाच्या नाहींत त्यांच्याविषयीं उगाच नाविन्याच्या भ्रामक जादूनें अट्टाहास करीत बसणें केवळ अप्रयोजक व हास्यास्पद होय!' + अशी ज्यांची उघड विचारसरणी

---

+ काव्यचर्चा, प्रस्तावना, श्री. नी. चाफेकर, पृ. १७

होती त्यांजकडून सहानुभूतीची अपेक्षा करणेंच चुकीचें होतें. नव्या विचारांतील वा कृतींतील मौलिकता ओळखावयाला पूर्वग्रहविमुक्त असें मन लागतें, ठराविकाची मर्यादा ओलांडून नव्या नव्या क्षेत्रांत संचारार्थ सदा सज्ज असलेली बुद्धि लागते. या दोन्ही गोष्टींचें या दोन व्यक्तींना वावडें होतें, नव्या प्रवृत्तींमागील प्रेरणा ओळखण्याची ताकद त्यांच्यांत नव्हती. आणि त्यामुळेंच शारदामंदिर ही संस्था इतिहासजमा झाली आणि ज्या प्रवृत्तींचा त्यानीं उपहास केला त्यांच्या पुजाऱ्यांनीं—रविकिरणमंडळाचे द्वारा—मराठी काव्यक्षेत्रांत नवा इतिहास निर्माण केला. माधवरावांचें शारदामंदिरांतील तें पहिलें कवितावाचन तथा-कथित 'बड्यां'कडून प्रोत्साहन मिळण्याच्या दृष्टीनें जरी अयशस्वी ठरलें असलें तरी गिरीश, यशवंत, मनोरमा व स्वतः श्रीधरपंत रानडे यांना त्यांच्या कवितांबद्दल कौतुक वाटलें हेंहि कमी महत्त्वाचें नाहीं. या कौतुकाचें पुढें स्नेहांत व स्नेहाचें सहकार्यांत रूपांतर होऊन माधवरावांच्या मनांत नव्या उमेदी, नव्या आकांक्षा निर्माण करण्यास तें कारण झालें. मराठी कवितेवर या साऱ्यांचे एक प्रकारें उपकारच आहेत.

पटवर्धनांची कविता प्रसिद्ध करण्याचा पहिला मान जळगांव येथें निघणाऱ्या 'काव्यरत्नावली' या मासिकाकडे जातो. या मासिकाच्या १९१६ सालच्या जुलै महिन्याच्या अंकांत 'निशीगंधाचीं फुलें' ही त्यांची कविता 'एम्. जूलियन्' या टोपणनांवानें प्रसिद्ध झाली. तदनंतर पुण्यास आल्यावर फर्ग्युसन कॉलेजच्या त्रैमासिकांत 'दिल्जू' या टोपण नांवानें एक कविता* प्रसिद्ध झाली. परंतु कवि म्हणून त्यांजकडे लक्ष ओढण्या इतकी ती प्रसिद्ध नव्हती. ती प्रसिद्धी त्यांची कविता 'नयुवग,' 'ज्ञानप्रकाश , व 'महाराष्ट्र साहित्य' यांत येऊं लागल्यापासून त्यांना मिळूं लागली. 'नवयुग' हें त्यावेळच्या मान्यवर मासिकांपैकीं एक होतें. सहजासहजीं त्यांत प्रवेश मिळणें कठीण जाई. पूर्वीं याच मासिकाकडून कविता 'साभार परत' आलेल्या होत्या. परंतु तेथेंहि सन्मानपूर्वक प्रवेश मिळूं लागला. त्याचें श्रेय ग. त्र्यं. माडखोलकर व माधव केशव काटदरे (कवि माधव) यांचेकडे जातें. 'नवयुगा'च्या

* 'आमची ओळख', फर्ग्यु. कॉ. मॅगेझिन, वर्ष १०, अं. १, जुलै १९१९; गुर्जर कवि कलापि याच्या 'हमारी पिछान' या कवितेचें समवृत्त भाषांतर.

काव्यविभागाच्या संपादनांत या दोघांचाहि त्यावेळेस विशेष हात असे. 'नवयुगां'त प्रसिद्ध झालेली पटवर्धनांची पहिली कविता 'कुणी काय बांधिलें ?' ही होय. 'नवयुगा'च्या डिसेंबर १९२१ च्या अंकांत ती प्रसिद्ध झाली. तदनंतर १९२२ च्या जानेवारी ते जुलैपर्यंतच्या 'नवयुग'च्या प्रत्येक अंकांत त्यांची कविता प्रसिद्ध झालेली आहे. १९२३ त (ता. ३ मार्च) 'ज्ञानप्रकाश' पत्राची 'काव्य-शास्त्र-विनोद' या नांवानें श्री. माडखोलकर यांच्या संपादकत्वा-खालीं एक साहित्यविषयक पुरवणी प्रतिशुक्रवारीं निघूं लागली. या पुरवणींत माधवरावांची कविता नियमानें प्रसिद्ध होऊं लागली. त्यांतील त्यांच्या प्रणयपर कविता पुष्कळांच्या डोळ्यांत खुपूं लागल्या. त्यांना अनेकांनीं आक्षेप घेतला. कांहीं प्राध्यापक व लेखक 'या कविता उत्तान ठरवून त्या ज्ञानप्रकाशांत येऊं देणें सदभिरुचीला सोडून आहे, असें आग्रहानें म्हणत.'* पण त्याची तमा पटवर्धनांनीं किंवा संपादकांनीं बाळगिली नाहीं.

१९२१-२४ हीं वर्षें पटवर्धनांच्या काव्यनिर्मितीच्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत. 'शारदामंदिरां'त ज्या समवयस्क, समानविचारी, व समानछंदी तरुण मंडळीशीं त्यांचा परिचय घडून आला त्यांच्याशीं अधिक निकटचे संबंध जडून आले. 'मंदिरां'त नियमीतपणें उपस्थित होणारी ही मंडळी पुढें त्या ठिकाणीं न भेटतां आळीपाळीनें एकमेकांच्या घरीं चहा-चर्चेला जमूं लागली. या रविवारच्या चहा-चर्चेच्या बैठकीला 'सन्टी' (Sun-Tea) असें नांव असे! या बैठकींतील मंडळीनें १९२३ सालीं आपल्या मंडळाला 'रविकिरणमंडळ' असें नांव दिलें. श्रीधरपंत रानडे, सौ. मनोरमाबाई रानडे, 'गिरीश' (शं. के. कानेटकर), 'यशवंत' (य. दि. पेंढरकर), माधव ज्यूलियन (माधवराव पटवर्धन), ग. त्र्यं. माडखोलकर, द. ल. गोखले, दिवाकर (शं. का. गर्गे) ही मंडळी यांत प्रारंभीं होती. कांहीं दिवसांनीं दिवाकर यानीं मंडळाशीं असलेला आपला संबंध सोडला. त्यांच्या जागीं पटवर्धनांच्या आग्रहावरून त्यांचे बालमित्र श्री. विठ्ठलराव घाटे यांस घेण्यांत आलें. ही सारी मंडळी विशिष्ट सामाजिक तत्त्वांचा, साहित्यविषयक ध्येयांचा पुरस्कार करणारी व त्यांचा प्रसार समाजांत जोरकसपणानें आपणच केला

* दोन तपें, ग. त्र्यं. माडखोलकर, पृ. २३१.

पाहिजे असें मानणारी होती. हरएक बाबतींत नवीनपणाला तिजकडून प्राधान्य देण्यांत येऊं लागलें. अशा या मंडळींत माधवरावांचें ध्येयवादी, सुधारणाप्रिय, काव्यात्म मन अल्पावधींत रमून गेलें. त्यांच्यांतील काव्यांकुर वाढीला लागावयाला ज्या प्रकारचें जीवन हवें होतें त्याप्रकारचें जीवन त्याला मिळालें. मंडळाच्या 'खुल्या रोमँटिक पण बौद्धिक वातावरणांतच माधवरावांच्या सुधारकी मतांची व प्रेमकाव्याच्या बीजांची वाढ झाली. माधवरावांच्या आयुष्यांतील हीं वर्षें निर्भेळ आनंदाचीं, उमेदीचीं व महत्त्वाकांक्षेचीं होतीं. श्रीधरपंत रानड्यांना त्याबद्दल बरेंच श्रेय दिलें पाहिजे.'*

'किरण' हें रविकिरणमंडळाचें पहिलें प्रकाशन होय. हें ९ सप्टेंबर १९२३ रोजीं प्रसिद्ध करण्यांत आलें. यांत पटवर्धन, माडखोलकर, यशवंत, गिरीश, द. ल. गोखले, श्रीधरपंत रानडे, सौ. रानडे यांच्या कविता व दिवाकर यांच्या नाट्यछटा प्रसिद्ध झाल्या आहेत. पुस्तक ३२ पृष्ठांचें, लहानसेंच आहे, पण त्यांत वैचित्र्य पुष्कळ होतें. नवीनांनीं त्याचें स्वागत केलें, जुन्यांपैकीं पुष्कळांनीं नाकें मुरडलीं. त्या काळांतील ज्येष्ठ व श्रेष्ठ गणल्या गेलेल्या टीकाकारांपैकीं एक बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं तर त्यावर अत्यंत निष्ठुर असा हल्ला चढविला, 'विविधज्ञानविस्तार' मासिकाच्या डिसेंबर १९२३ च्या अंकांत त्यांनीं या पुस्तकाचें जें परीक्षण केलें त्यांत त्यांनीं काढलेल्या पुढील उद्गारांवरून या हल्लयाची कल्पना येऊं शकेल. "हीं सर्वच कवनें अत्यंत मोहक उतरलीं आहेत. त्यांचें रचनाचातुर्य, श्रवणमाधुर्य, भावनातरलत्व, कल्पनाकौशल्य, व विकारोन्माद, कोणाहि तरुणाच्या अंतःकरणास भारून टाकल्याशिवाय रहाणार नाहींत. पण या शृंगारिक कवनांचें भयंकरत्व काव्यप्रतिभेच्या दीप्तीनें दुणावलें आहे. चावणाऱ्या विषारी दातांच्या अगर कापणाऱ्या तीव्र शस्त्राच्या सुभगाकाराचें, तेजस्वी पाण्याचें किंवा कुशाग्रतेचें कौतुक आम्ही कोणत्या तोंडानें करावें ? कवंडळाची कांति, वेस्वेचें लावण्य, मदिरेचा सुवास, विषाचें माधुर्य, शठांचें साधुत्व, व प्रस्तुत कवनांचें प्रतिभासंपन्नत्व, हीं परिणामीं सारखींच घातक होणारीं आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभाच्या सुमारास रावबाजीच्या चैनबाजींत उद्भवलेल्या

* आमचीं अकरा वर्षें, लीलाबाई पटवर्धन, पृ. ११६

अनंतफंदी, परशराम, होनाजी बाळ, प्रभाकर इत्यादि वागीश्वरांचे सुधारलेले अवतार विसाव्या शतकाच्या आरंभीं पुन्हां होणार, अशीं दुश्चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. पुढील छकडा लावण्यांच्या उदयाचा हा अरुणकिरण आहे, असे म्हटलें तरी चालेल." 'किरणां'तील माधवरावांच्या 'रानकिशोरी'वर तर त्यांनीं गहजबच केला. ते म्हणतात, "माधव जूलियन् हे पुण्यांत पुला-जवळच्या वळणावर भेटलेल्या 'बेहेस्तांतील परी'चे लोकलाजेस्तव 'भाऊ' म्हणतात, परंतु 'वनकिशोरी'शीं गांठ पडल्याबरोबर लोकलज्जेचें भय नसल्यामुळें त्यानीं, सर्व आडपडदा दूर सारून, कुंजविहाराचा आपला हक्क उघड उघड पुढें मांडला आहे. चटोरपणांत माधव जूलियन् धाडसी आहेत, हें निभ्रांत कबूल केलें पाहिजे!" भिड्यांप्रमाणेंच अनेकांकडून 'किरणा'-वर उघड व प्रच्छन्न हल्ले झाले. परंतु प्रतिकूल टीकेनें दबणारी ही मंडळी नव्हती.

'किरणा'चे प्रसिद्धीनंतर एका वर्षाचे अवधींत मंडळानें 'काव्यविचार', 'उषा', व 'मधुमाधव' अशीं तीन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. 'काव्यविचारां'त "केशवसुतांच्या युगांत महाराष्ट्रामध्यें जे नवीन काव्यप्रकार प्रचलित झाले, त्यांची शास्त्रीय, सोपपत्तिक व सोदाहरण मीमांसा करण्याचा प्रयत्न केला आहे." 'उषा' व 'मधुमाधव' हे दोन कवितासंग्रह असून, पहिल्यांत मंडळाच्या सर्व सदस्यांच्या कविता असून दुसऱ्यांत मधु ( विठ्ठलराव घाटे ) व माधव ( माधवराव पटवर्धन ) यांच्या कविता संग्रहीत केलेल्या आहेत. या तिन्ही पुस्तकांमुळें मंडळाचा लौकिक वाढला, सुशिक्षित मंडळींत नव-कवितेबद्दल अभिरुची उत्पन्न झाली, मराठी सारस्वतांत नवें वारें खेळूं लागलें, उपहासाची वृत्ती हळुहळु लोपूं लागून आदराची कौतुकाची वृत्ति वाढूं लागली. वृत्तवैचित्र्य व विषयांतील विविधता यांमुळें मराठी कवितेंत एक नवें आकर्षण निर्माण झालें. समकालीनांत मंडळाची, विशेषतः यशवंत, गिरीश व माधव जूलियन् यांची, छाप पडूं लागली.

पटवर्धनांचें या सुमारास पद्यलेखनाबरोबरच गद्यलेखनहि सुरू होतें. कॉलेजांत असल्या वेळेपासून, पदवी घेतल्यावर, भाषाविषयक संशोधनात्मक असें काम आपण हातीं घ्यावें असे विचार त्यांचे मनांत घोळत असत.

पुण्यास आल्यावर त्या दृष्टीनें त्यानीं अभ्यास चालविला. १९१९ सालीं पुणें येथें भरलेल्या पहिल्या प्राच्य विद्या-परिषदेंत त्यानीं वाचलेला 'फार्शींतून मराठींत आलेल्या शब्दांच्या परिणतीचे नियम' हा इंग्रजी निबंध हें त्याचें पहिलें फळ होय. हा निबंध अधिक सुधारून त्यानीं त्याचें मराठींत 'अरबी, फार्शी व तुर्की शब्दांची परिणति' या मथळयाखालीं त्रिविधज्ञानविस्तारांत (डिसेंबर १९२२) भाषांतर प्रसिद्ध केलें. याचे आधीं कांहीं महिने, 'फार्शी-मराठी कोशा'च्या रचनेस त्यानीं सुरुवात केली व १२ जून १९२५ रोजीं त्याचें लेखन पूर्ण केलें. "हा कोश भारत इतिहाससंशोधक मंडळानें १९२६ सालीं प्रसिद्ध केला. स्थूलमानानें एकनाथापासून प्रभाकरापर्यंत होऊन गेलेल्या लेखकांच्या लिखाणांत, वा ऐतिहासिक कागदपत्रांत आढळणाऱ्या आणि आजच्या बोलींत ऐकूं येणाऱ्या सर्व फार्शी शब्दांचा संदर्भ पाहून व तौलनिक व ऐतिहासिक दृष्टीनें अभ्यास करून, हा कोश तयार केलेला आहे व मिळविलेल्या सामग्रीच्या आधारें फार्शी-मराठी संबंधाचें विस्तृत विवेचन उपोद्घातांत केलें आहे." 'शब्दसिद्धी' या नांवाचा एक स्वतंत्र निबंधहि प्रारंभीं जोडला आहे. सतत ४॥-५ वर्षें खपून, कोणाचीहि मदत न घेतां, पुस्तकें वाचून त्यांतील उतारे काढण्यापासून तों कच्चीं मुद्रितें तपासण्यापर्यंतचें सर्व काम त्यानीं एकट्यानींच केलें. त्यामुळें त्यांत कांहीं कांहीं ठिकाणीं दोष राहून गेले आहेत. हे दोष दूर करून हा कोश प्रसिद्ध झाल्यानंतर शिवकालीन कागद, त्याचप्रमाणें पेशवे दप्तरांतील पत्रें फार मोठ्या प्रमाणावर प्रसिद्ध झालीं, तीं वाचून काढून इतिहासाभ्यासकाला सहाय्यक होईल असा विस्तृत व शास्त्रशुद्ध ऐतिहासिक शब्दकोश तयार करण्याचा त्यांचा विचार होता. त्यासंबंधीं कांहीं योजनाहि त्यांनीं निश्चित केली होती. मृत्युपूर्वी, रस व अलंकार यासंबंधींचा त्यांचा जो अभ्यास चालू होता, तो संपून त्यासंबंधींचा ग्रंथ तयार होतांच या ऐतिहासिक शब्दकोशाचें काम हातीं घ्यावयाचें असें त्यानीं मनाशीं ठरविलें होतें. परंतु त्यांच्या आकस्मिक मृत्युमुळें त्यांच्या साऱ्याच योजना जेथल्या तेथें राहिल्या.

'फार्शी-मराठी कोशा'ची रचना होत असतां त्यानीं जें जुनें गद्य व पद्य वाचलें त्याचा परिणाम त्यांच्या पद्याच्या व गद्याच्या भाषेवर बराच झाला.

त्याचबरोबर आजची मराठी भाषा व दीडशें वर्षांपूर्वीची मराठी भाषा यांचेसंबंधींचे तुलनात्मक विचार त्यांचे डोक्यांत घोळूं लागले. या विचारांचें प्रतिबिंब त्यांनीं 'विविधज्ञानविस्तारां'त लिहिलेल्या व 'छंदोरचना' या पुस्तकांत समाविष्ट केलेल्या 'पद्याची भाषा' या निबंधांत आढळून येतें. ते लिहितातः

"पेशवाईचा अंत झाल्यावर अव्वल इंग्रजींतहि पुणें शहराचें महत्त्व चालू राहिल्यामुळें व तेथें एकामागून एक होऊन गेलेल्या काबील कलमबहाद्दरांनीं केलेल्या वाङ्मयिक लोकमान्य कामगिरीमुळें बोलींचें विविधत्व बहुतांशीं नष्ट होऊन मराठी भाषेचें स्वरूप निश्चित व दृढ झालें. ही गोष्ट मराठराष्ट्राच्या एकीकरणास व समुन्नतीस सर्वथैव सहाय्यक व इष्ट अशीच झाली. परंतु हें स्थित्यंतर घडवून आणून ज्या विद्वानांनीं महाराष्ट्राला उपकृत करून ठेविलें, त्यांचें संस्कृताचें अध्ययन उत्तम, पण मराठी भाषेचें व साहित्याचें ऐतिहासिक व सोपपत्तिक दृष्टीनें केलेलें अध्ययन अल्प होतें, ही गोष्ट नजरेआड करण्यांत हंशील नाहीं. संस्कृत भाषेवर जडलेल्या फाजील प्रेमामुळें, मराठीला संस्कृत शब्दप्राचुर्यानें सजवून प्रौढ व सुसंस्कृत करण्याच्या भरांत, व नकळत पांडित्य दाखविण्याच्या आवेशांत त्यांची कामगिरी क्रांतिकारक झाली, अपभ्रष्ट म्हणा वा परिणत म्हणा, परंतु बहुजनसमाजाला तत्काळ समजणाऱ्या, घरगुती, उच्चारसुलभ, आटोपसर, जिव्हाळयाच्या शब्दांची या नव्या पद्धित वाङ्मयांतून निष्ठुरपणानें एकदम हकालपट्टी झाली. अवस, पुनव, तीथ, सय, गावणें वगैरे शब्द स्त्रियांच्या व अशिक्षितांच्या आश्रयास जाऊन राहिले. प्राजक्त न म्हणतां पारिजातक म्हणणें, कमळास कमल व केसास केश म्हणणें, निदान लिहिणें, हें सुशिक्षितपणाचें व नागरत्वाचें लक्षण होऊन बसलें. प्राचीन व मध्य मराठींत गद्य वाङ्मय फार अल्प आणि तेंही अंधारांत सांदीकोपऱ्यांत पडलेलें; अशा उपस्थितींत संस्कृताच्या वाढत्या अभ्यासानें व मराठीच्या वाढत्या उपेक्षेनें गेल्या पन्नास पाऊणशें वर्षांत मराठी भाषेचा नैसर्गिक आत्मविकास न होतां तींत एक क्रांतीच घडून आली. जुन्या भाषेशीं, वाङ्मयाशीं, व मोळयाशीं जणूं काय आमच्या पिढ्याच तुटल्या. संस्कृत शब्दांच्या वाढत्या संख्येमुळें गुजराथी, हिंदी, बंगाली वगैरे

भाषा यांतील अंतर कमी होऊं लागलें; हें एका दृष्टीनें इष्ट असलें तरी शब्दसंपत्तीच्या दृष्टीनें आमचें किती नुकसान झालेलें आहे, याची जाणीव आम्हांस अद्याप झालेली नाहीं. इंग्रजींतून अध्ययन, इंग्रजी ग्रंथांचें परिशीलन व साधारणतः इंग्रजींतूनच वा इंग्रजी धर्तीवर चिंतन अशी आमची परावलंबी दशा झाली. आजसुद्धां बोलतांना जरी आम्ही इंग्रजी-मराठी शब्दांची खिचडी करितों तरी लिहितांना आपले विचार व्यक्त करावयाला संस्कृताचें साहाय्य घेतों. त्यामुळें भाषा बोजड, कृत्रिम व दुर्बोध होते; परंतु साक्षरतेच्या वाढीबरोबर व प्रसाराबरोबर हे अवगुण झांकले जात आहेत. आतां संस्कृतांतून आवश्यक शब्द उचलणें ही एका दृष्टीनें उसनवारी नव्हे. तसें करण्याचा सर्व प्राकृत भाषांस हक्क आहे. या उसनवारीमुळें एका अंगानें मराठी सुसंपन्न झाली हें आम्हांस मान्य आहे. परंतु या प्रकृतीमुळें जर मराठीच्या मूळच्या शब्दसंपत्तीस क्षय लागत असेल व तिच्या सर्गशक्तीस अपाय होत असेल तर या प्रवृत्तीस आळा घातलाच पाहिजे. संस्कृत भाषा म्हणजे मराठी नव्हे; ती मराठीची आजी असेल, पण आम्हांस ती मायभाषेपेक्षां प्रिय होणें अस्वाभाविकच होय. भाषेचा पराक्रम जसा तिच्या शब्दसंपत्तीवर व परकी शब्द आपलेसे करून घेण्याच्या चातुरीवर, तसाच तिच्या नवशब्द-प्रसवशक्तीवर अवलंबून असतो, ही महत्त्वाची बाब ध्यानांत ठेविली पाहिजे. अभ्यासाच्या अभावीं नवशब्दोत्पादक प्रयय व उपसर्ग एकीकडे नामशेष होत असतांना, वाढत्या कर्जावर कालक्रमणा करणाऱ्या व त्याच्या आंकड्यावर मोठेपणा मानणाऱ्या बेफिकीर बड्या सरदाराप्रमाणें आम्ही आपल्या वाढत्या गरजा शिष्टसम्मत उसनवारीवरच भागवून घेत आहों. शाळांतून सहज लाभणाऱ्या संस्कृत शिक्षणानें व विद्यापीठांतून होणाऱ्या आदर्शभूत संस्कृत ग्रंथांच्या वाचनानें ही उसनवारीची प्रवृत्ति अखंड बळावतच चाललेली आहे. 'माझा प्रवास'चे कर्ते विष्णुभट गोडसे, 'पण लक्षांत कोण घेतो ?'चे लेखक हरिभाऊ आपटे अथवा 'वाईकर भटजी'चें चित्र रेखाटणारे टिकेकर 'धनुर्धारी' यांच्यासारखे मराठमोळ्याची जिवलग भाषा लिहिणारे लेखक फार विरळा...एका बाजूनें संस्कृत शब्दभांडार आम्ही मराठींत आणीत आहों, तर उलट पक्षीं आमची मराठी दौलत आम्ही उपेक्षित चिठोऱ्यांच्या राशींत व अशिक्षितांच्या जिवलग घरगुती बोलींत राहूं देत आहों.....

मराठ्यांनीं पूर्वी ज्याप्रमाणें बृहन्महाराष्ट्र एकसत्तेखालीं आणून राष्ट्र पायाशुद्ध, मजबूत व सुसंघटित करण्याच्या आधींच लुटीसाठीं दूरवर स्वाऱ्याशिकारी करण्यांत शक्तीचा अपव्यय केला व घरांत शिरलेले राष्ट्रशत्रु घरांतच राहूं दिले, त्याचप्रमाणें आजही आम्ही मराठीच्या नवशब्दप्रसवशक्तीस विघातक अशी आमची शाब्दिक गनिमाई चालू ठेविली आहे. ज्ञानेश्वरकालीन मराठीची तत्कालीन इंग्रजीशीं तुलना केली व नंतर आधुनिक मराठीची व इंग्रजीची तुलना केली म्हणजे आमच्या प्रगतीची छातीफोड जाणीव आम्हांस चांगलीच होईल. कुठें जगताच्या नानाविध व्यवहारांत धडाडीनें खेळून स्वतंत्र वाङ्मयांत विराजणारी इंग्रजी तर कुठें संस्कृत भाषेंतील उपशावर व पाश्चात्य उष्ट्या विचारांवर जीव घेऊन राहिलेली मराठी! ज्ञानेश्वर व एकनाथ हे फार जुने म्हणून सोडून दिले, तरी तुकारामगाथा व दासबोध यांसारख्या अलिकडील सर्वमान्य पूज्य ग्रंथांतील शेंकडों शब्द सुशिक्षितांस अगम्य व म्हणूनच लेखी भाषेंत बहिष्कृत असावेत ही अनास्था अत्यंत लज्जास्पद आहे......ही स्थिति बदललीच पाहिजे. मराठी शब्दसंपत्ति सांभाळण्याची व वाढविण्याची जबाबदारी गद्यलेखकाप्रमाणें कवीवरही आहे. ही महनीय कामगिरी त्यानें अंगाबाहेर टाकणें त्याच्या ब्रीदाला शोभणार नाहीं.'[३]

पटवर्धनांच्या पद्याच्या भाषेंत त्याचप्रमाणें भाषाविषयक दृष्टींत जी पुढें सारखी उत्क्रांति होत गेलेली दिसते तिचीं बीजें या उताऱ्यांत स्पष्टपणें दिसतात. मराठी भाषेचें मराठपण नाहींसें होत चाललें आहे, तें तसें होऊं देणें म्हणजे तिजवर जिवंतपणें मृत्यू ओढवण्यासारखेंच आहे, असें त्यांस वाटे. या जाणीवीनें त्यांचें हृदय तळमळे, तडफडे, स्वतःच्या पद्याच्या भाषेचें सतत परिष्करण करीत राहण्याची त्यांची वृत्ति किंवा आयुष्याच्या अखेरपर्यंत मराठी भाषेच्या शुद्धीकरितां त्यांनीं चालविलेलें झुंज या तळमळींतून, तडफडींतूनच निर्माण झालें.

'कोश'चें काम संपत येण्याच्या सुमारास, एका कामांतून मोकळे होतांच दुसऱ्या एखाद्या नवीन कामास स्वतःला जुंपून घ्यावयाचें या त्यांच्या नेहमींच्या वृत्तीस अनुसरून, फारां दिवसांपासून त्यांच्या मनांत घोळत असलेल्या वृत्त, जाति व छन्द या विषयींच्या विचारांना व्यवस्थित रूप आणण्याचें

ठरवून त्यांनीं त्याविषयींच्या अभ्यासाला व लेखनाला सुरुवात केली. या अभ्यासांत थोडासा थारेपालट म्हणून त्यांनीं, पुष्कळ वर्षांपासून अपूर्ण स्थितींत पडून राहिलेलें ‘ विरहतरंग ’ हें काव्य लिहावयास हातीं घेतलें. “ या काव्याला आरंभ १९१३ सालीं ‘ प्रियकराची विरहपत्रिका ’ या २०–२५ श्लोकांच्या कवितेंत झाला. पुढें १९२० सालीं कांहीं अधिक श्लोक लिहिले गेले, आणि काव्याची रूपरेखा अशी एक ठरली.” अमळनेरास १९२४–२५ सालीं असतां त्याला त्यांनीं व्यवस्थित स्वरूप आणलें, व फर्ग्युसन कॉलेजांतील त्याचे एक समव्यवसायी मित्र प्रो. चिं. रा. देवधर यांनीं ते ९ सप्टेंबर १९२६ रोजीं प्रसिद्ध केलें.

‘ विरहतरंगा ’चा जन्म १९१३ सालीं कांहीं घटनांमुळें उत्पन्न झालेल्या मनाच्या एका विशिष्ट प्रक्षुब्ध अवस्थेंत झालेला आहे. कॉलेजांत असतांना, उदारमतवादी व सामाजिक सुधारक म्हणून गाजलेल्या अशा बडोदेस्थ एक–दोन कुटुंबांतील सुशिक्षित व समवयस्क अशा दोन–तीन तरुणींशीं त्यांचा दाट परिचय घडून आला, त्यांपैकीं कांहींकडून भावनेच्या भरांत विवाहाबद्दलची उत्सुकताहि दाखविण्यांत आली. परंतु ही उत्सुकता परस्परांतील आर्थिक व सामाजिक दर्जाच्या विषमतेचें चित्र उभें राहतांच जितक्या द्रुततेनें उद्भवली तितक्याच द्रुततेनें ती ओसरली. एका व्यक्तीनें तर वल्लभा, भगिनी व माता अशा भिन्न, भिन्न नात्याचे प्रयोग केले असतां, त्या त्या प्रयोगांना पोषक अशी भूमिका ठेवण्याचे माधवरावांनीं अत्यंत संयमपूर्वक आटोकाट प्रयत्न केले. पण साऱ्या आयुष्यभर ज्या व्यक्तीला आपल्या मनावर केव्हाहि मालकी स्थापित करतां आली नाहीं तिला स्वतःच सुचविलेल्या या भूमिकांपैकीं कोणतीहि भूमिका यशस्वी करतां आली नाहीं, यांत आश्चर्य तें कोणतें ? स्त्रीस्वभावांतील जीवघेण्या चंचलतेचा हा अनुभव माधवरावांना त्यांच्या आयुष्यांत हा पहिल्यानेंच येत होता. आयुष्यांतील एका महत्त्वाच्या संक्रमणकाळांत माधवरावांसारख्या भावनाशील व्यक्तीच्या मनावर या साऱ्या घटनांचे झालेले परिणाम सहजासहजीं नष्ट होणें शक्य नव्हतें. आणि ‘ यावी विस्मृतीची प्रचण्ड लहरी, पोटांत घ्यावें तिनें ! ’ अशी कितीहि इच्छा केली तरी ती व्यर्थ होती. या घटनांचे स्पष्ट–अस्पष्ट असे पडसाद ‘ विरहतरंगांत ’,

त्याचप्रमाणें सुनीतांत पडलेले आहेत. 'तुटलेले दुवे' यांतील १०,११,१३, १५,२९,६२ हीं १९१३-१४ सालीं लिहिलेलीं सुनीतें क्रमानें वाचल्यास याचा प्रत्यय येईल. या सुनीतांच्या, कवीच्या हृदयांतील खळबळीचें यथातथ्य चित्र रेखाटणाऱ्या पूर्वीच्या संहितेंत व आतांच्या संहितेंत बराच फरक घडलेला आहे. कांहींचा तर पार चेहरामोहराहि बदलून टाकला आहे. पण तशा त्या बदललेल्या स्थितींतहि १९१३-१४ सालांतील माधवरावांच्या भावनात्मक जीवनाची कल्पना आणून देणाऱ्या पुष्कळशा खाणाखुणा त्यांत आढळतील. माधवरावांच्या प्रेमविषयक कल्पना व भावना समजून घेऊं इच्छिणाऱ्यांनी 'विरहतरंगा'बरोबरच 'तुटलेले दुवे'हि बारकाईनें डोळयांखालून घातले पाहिजेत.

विरहतरंग 'ही एक आधुनिक प्रेमकहाणी आहे. इंग्रजी व संस्कृत सारस्वताच्या वाचनानें सुसंस्कृत झालेल्या मनांत यौवनाच्या पहिल्या बहरांत आणि महाविद्यालयाच्या खुल्या निर्विशंक भावपोषक वातावरणांत उद्भूत होणारें प्रेम, त्याची स्थिति आणि रूपांतर यांचें प्रस्तुत काव्यांत वर्णन केलेलें आहे.' आणि या प्रेमकहाणीच्या आनुषंगानें चालू शतकांतील पहिल्या पंचविशींतील, पाश्चात्य शिक्षणामुळें ज्याच्या स्त्री-पुरुषसंबंधविषयक विचारांना नवें वळण मिळूं पहात होतें, सहजीवनविषयक कांहीं नव्या आकांक्षा ज्यांच्यांत मूळ धरूं पहात होत्या, रूढींच्या आहारीं न जातां, मन आणि आत्मा यांचा आदर्श विकास करून घेतां येईल अशा तऱ्हेचा वैवाहिक आयुष्यक्रम आंखण्यांत जिचा सहकार मिळूं शकेल अशी सहचरी मिळविणें हें आपलें ध्येय असलें पाहिजे असें ज्यांना वाटत असे आणि तशीं स्वप्नचित्रें चितारण्यांत ज्यांना सुख वाटे अशा तरुण पिढीच्या आंतरजीवनाचें सूक्ष्म, सौंदर्यपूर्ण व सहकंपानें भरलेलें असें चित्र या काव्यांत चितारलें गेलें आहे. काव्यांतील नेहमींच्या संकेतांप्रमाणें यांतील नायक असामान्य असा रेखाटलेला नाहीं. हरघडीच्या जीवनांत आढळणाऱ्या सर्वसामान्य, किंचित् दुबळया, भावनाविवश पण शुद्ध व मोकळया वृत्तीच्या तरुणापैकीं तो एक आहे. या काव्यांतील प्रभाकराप्रमाणें, तारुण्याच्या पहिल्या काळांत, प्रत्येकजण कमी-अधिक प्रमाणांत त्या विशिष्ट मनोवस्थेंतून गेलेला असतो. आणि त्यामुळेंच

तिला एक प्रकारचें सर्वसाधारण्य आलेलें आहे. 'विरहतरंग' सर्वसामान्याच्याहि हृदयाची पकड घेतें याचें रहस्य हेंच आहे. हें काव्य प्रसिद्ध होतांच एका कॉलेज-कुमारानें कवीला धाडलेल्या पत्रांत त्यानें, " कांहीं भावना व प्रसंग अत्यंत सत्यदर्शी, सूक्ष्म व चित्रमय ( Graphic ) असून ते कवीनें जणुं आमच्याच आयुष्यांतील, बीनतारी यंत्रानें ऐकून, लिहिलेले आहेत कीं काय असें वाटतें. अशा वेळेलाच कवीची किंमत कळून येते. आपलें काव्य आम्हांस चिरंतन सुख देणारें आहे व त्या दृष्टीनें आपण आम्हांस कायमचे ऋणी करून ठेविलेलें आहे. " असे जे उद्गार काढले, ते या सर्वसाधारण्याचेच निदर्शक होत. याचे उलट बाळकृष्ण अनंत भिडे यांसारख्या नीतिवादी टीकाकारानें हें सर्वसाधारण्य व त्याचा कवीनें मोठ्या चातुरीनें आपल्या काव्यांत करून घेतलेला उपयोग लक्ष्यांत न घेतां केलेली विदारक टीका होय. 'नटवें व नखरेबाज काव्य' असा शेरा ठोकून, " ज्याचें चरित्र कोणाहि सभ्य हिंदु तरुणाला अनुसरतां येणार नाहीं व अनुसरलें असतां सुखावह होईल अशी खात्री देतां येणार नाहीं, असा खोडकर नायक उत्पन्न करून, त्याचें चरित्र समर्थनीय व अनुकरणीय आहे, असा बहाणा कवीनें सर्वत्र दाखवावा हें लांछनास्पद आहे. प्रो. देवधरांनीं 'चार शब्दांत' लिहिलेले सर्व काव्यगुण त्यांच्या (पटवर्धनांच्या) कृतींत आढळतात. त्यांची प्रतिभा उज्वल आहे, वाणी प्रसंगाप्रमाणें तडफदार किंवा कोमल आहे, शब्दरचनेची सजावट त्यांस उत्तम साधते, रसाविर्भावांत व भावनोद्बोधांत त्यांचें सामर्थ्य बहुत आहे, तरी त्यांनीं हें गुण श्रेयस्कर काव्यरचनेला लावावे. 'प्रणय' हा विषय टाकावू नाहीं. प्रणयाचे अनेक प्रवाह रा. पटवर्धनांस अवगत आहेत. तरी ज्याच्या योगानें तरुणांचीं मनें उल्लू व विषयलोलुप होण्याचा संभव आहे, अशीं काव्यें त्यांनीं निर्माण करूं नयेत. तरुणांच्या अनिर्बंध स्त्री-प्रेमाचें कौतुक करावयाचें आणि त्याचा सुपरिणाम होईल म्हणून आशा करीत राहावयाचें, यांत पश्चात्तापाचेच प्रसंग जास्त येतील, असें आम्हांस वाटतें. " असे त्यांनीं उद्गार काढले आहेत. आज, हें काव्य प्रसिद्ध झाल्याला दोन तपांहून अधिक काळ लोटला आहे. परंतु, भिडे यांनीं व्यक्त केलेलें हें भय योग्य होतें असें मानण्यासारखा एकहि 'पश्चात्तापाचा प्रसंग' कोणावर ओढवलेला आढळलेला नाहीं. उलट हें काव्य मराठी कवितेचें एक अभिमानास्पद लेणें होऊन बसलें आहे. मराठी

काव्योद्यानांतील, ज्याचा सौरभ व ज्याचें सौंदर्य कधींहि लुप्त होणें शक्य नाहीं असें तें एक अमर पुष्प होऊन बसलें आहे. अर्वाचीन मराठी काव्यांत त्याच्या तोडीचें प्रेमकाव्य अद्याप तरी कोणी निर्माण करूं शकलेला नाहीं. " भाषेची सफाई, शब्दांची काटकसर, अवयवांची प्रमाणबद्धता, नादगौरव, अर्थसूचकता, विचारांची उदात्तता, दृष्टीची व्यापकता, आणि शिवाय, पृथगात्मता' इत्यादि आदर्श वाङ्मयाचे जे गुण खुद्द पटवर्धनांनींच या काव्याच्या प्रस्तावनेंत एके ठिकाणीं वर्णिलेले आहेत, ते सारे या काव्यांत प्रगट झालेले आहेत. या काव्याला ही योग्यता प्राप्त होण्यास कवीच्या उज्वल प्रतिभेइतकेच, त्यानें घेतलेले अपार कष्टहि कारण आहेत. सतत तीन वर्षे ( १९२४–२६ ) त्यांचें या काव्याचें पुनर्लेखन व परिष्करण चाललेलें होतें.

'विरहतरंग' पूर्ण होतें न होतें त्याच सुमारास १९२४ पासून अर्धवट लिहून तयार असलेलें 'सुधारक' त्यानीं १९२६ च्या प्रारंभीं, पूर्ण करण्यासाठीं हातीं घेतलें व अमळनेर येथें त्याच वर्षीच्या एप्रिल महिन्यांत तें पूर्ण केलें. या काव्याचें स्वरूप व त्याचा उद्देश त्यानीं स्वतःच आपल्या प्रस्तावनेंत पुढील-प्रमाणें दिला आहेः—" केशवसुतांनीं 'तुतारीं'त व गोविंदाग्रजांनीं 'स्मशान गीतां'त सामाजिक अन्यायांवर जशा प्रकारची टीका केली आहे तशाच प्रकारची टीका सुधारक काव्यांत निरनिराळ्या सामाजिक प्रश्नांवर व कल्पनां-वर केलेली आहे. पण ही टीका एका कल्पित कथेच्या निरूपणाच्या ओघांत विखुरलेली असून कित्येकदा उपरोधिक आहे. शिवाय निरनिराळ्या विचार-सरणींचेंहि दिग्दर्शन व्हावें अशी व्यवस्था पुरोगामी व प्रतिगामी श्रोत्यांचे उद्गार अनुक्रमें चौकटीच्या व अर्धचन्द्राकृति कंसांत छापून केलेली आहे. विनोदाचा उपयोग अधम भावना उद्दीपित करण्यासाठीं नसून उद्बोधक मनो-रंजनासाठीं आहे. यांत सहृदय उपहास आहे, पण चावटपणा नाहीं. धर्माचा व्यापार करणाऱ्या दांभिकतेचें यांत वस्त्रहरण असेल, पण कोणत्याहि उदात्त नीतितत्त्वाची यांत कुत्सित हेटाळणी नाहीं. कांहीं प्रसिद्ध व्यक्तींची यांत स्पष्ट स्तुति असली तरी कुणाहि व्यक्तीची यांत नालस्ती करण्याचा प्रयत्न नाहीं. व्याजोक्तीनें नालस्ती करणें हें भ्याडपणाचें लक्षण होय. वैयक्तिक हास्यास्पद पण क्षम्य अशा दोषांची गम्मत म्हणजे व्यक्तीची नालस्ती नव्हे हें

ध्यानांत धरिलें पाहिजे. तथापि कांहीं भाग स्वतःस अनुलक्षून आहे अशा गैरसमजानें दुखावण्याइतकें कुणाचें मन हळवें असलें तर त्यानें आमच्या हेतूकडे लक्ष्य देऊन क्षमा करावी. प्रचलित रूढि व संस्था यांत योग्य क्रांति घडून खऱ्या महाराष्ट्रधर्माची प्राणप्रतिष्ठा व्हावयास मदत व्हावी या हेतूनेंच प्रस्तुत कथानक रचण्यांत आलें आहे. जातिभेद मोड केल्यावांचून, धर्मदृष्ट्या पूर्ण समता स्थापिल्याविना आणि स्त्रियांच्या बाबतींत स्वयंनिर्णयाचे हक्क मान्य होण्याइतका त्यांचा स्वतंत्र दर्जा कबूल केल्याशिवाय प्रगति अशक्य आहे असा आमचा सिद्धांत आहे."

"प्रस्तुत काव्यांत कथानुषंगानें इतर सामाजिक विषय आलेले असले तरी व्यक्तिमाहात्म्य व विवाहसुधारणा हे दोन प्रामुख्यानें ठेविले आहेत. स्वातंत्र्य म्हणजे अमर्याद स्वैराचार बिलकूल नव्हे; परंतु सामाजिक शिस्त म्हणजे तरी इतरांनीं निमूटपणें सोसावयाचा व शिवाय धर्म्य मानावयाचा अशा अल्पसंख्याक लोकांचा जुलूमहि नव्हे. स्वतःच्या स्वातंत्र्याला जपणाऱ्यानें दुसऱ्याच्या स्वातंत्र्याला तितकाच मान द्यावयाचा असतो ही एकच स्वातंत्र्याची मर्यादा होय; आणि या मर्यादित व्यक्तिस्वातंत्र्याचेच पवाडेकार होण्यांत आशावादी कवींना भूषण वाटतें. इतर कोणत्याहि व्यक्तीला बाध न आणतां शक्य तें ऐहिक व पारलौकिक सुख भोगण्याचा व स्वतःची उन्नति करून घेण्याचा प्रत्येकाचा हक्क जन्मसिद्ध आहे. या हक्काचा कांहीं अंश व्यक्ति आपखुशीनें समष्टीच्या हितासाठीं सोडील; तसें करणें कर्तव्यहि आहे; पण तें तीस पटलें पाहिजे, समष्टीनें पटवून दिलें पाहिजे; नाहींतर जुलूम होईल. स्वतःच्या सुखसोयीसाठीं दुसऱ्याला कमी अधिक असह्य गुलामगिरींत राबविण्याचा प्रयत्न करणें हा मनुष्याचा स्वभावधर्म असला तरी तो रानटीपणाचा द्योतक आहे. त्याचें समर्थन स्वार्थी सुलतानांनीं व नादान गुलामांनींच करावें. अर्थात् स्वातंत्र्याचा दुरुपयोग होईल या भीतीनें स्त्रियांस मानसिक व कायदेशीर सामाजिक दास्यांत ठेवणें सुधारकास कधींहि मान्य होणार नाहीं."

"प्रस्तुत काव्यांत प्रेम आणि विवाह यांच्या निरनिराळ्या बाजू दाखविण्याचा प्रयत्न आहे. या विषयाच्या सार्वत्रिक पिष्टपेषणांत आम्ही सामील झालों आहों हें पाहून आमची, व आमचा सुधारणावाद प्रेम आणि विवाह या

विषयावरच केंद्रीभूत झालेला पाहून आमच्या सुधारणेची कांहीं लोक कींवच करतील. तथापि सूक्ष्म नजरेनें खोल व दूरवर पाहणाऱ्यास या प्रश्नांत मानवजातींस शाश्वत महत्त्वाची व जिव्हाळ्याची अशी नवता आढळेलच आढळेल."

कवीनें स्वतःच्या विद्यार्थीदशेंत, सुधारणेच्या विचारांनीं भारून जाऊन सार्वजनिक व्यक्ती, संस्था व देशोद्धारक चळवळी यांजविषयींच्या ज्या भव्य-कल्पना मनांत बाळगल्या होत्या, त्या धकाधकीचें व्यावहारिक जीवन सुरू झाल्यावर जवळ जवळ अवास्तव होत्या, आदर्श तत्त्वांचा पोकळ पुकार करणारेच जगांत फार, त्यांचा स्वीकार त्याप्रमाणें आचार करणारे विरळाच; त्यागाची उठल्यासुटल्या थोरवी गाणारेच सत्ता व संपत्ती हातीं ठेवण्यासाठीं कित्येकदा सामान्य माणुसकीलाहि पारखे होतात, असा एका मागून एक अनुभव येऊं लागला. आपण समजतों तितकें जग सरळ नाहीं, त्याचे मार्ग कांहीं वेगळेच आहेत याचा साक्षात्कार जेव्हां तेव्हां होऊं लागला. ध्येयाच्या अंतराळांत भराऱ्या मारणारें मन प्रत्यक्षाकडे वारंवार खेंचलें जाऊं लागलें, भोंवतालच्या स्थितीचा विचार करूं लागलें, तुलना व चिकित्सा करूं लागलें; स्वतःस सुधारक म्हणविणाऱ्या पांढरपेशा समाजाचें अंतर्मुख वृत्तीनें परीक्षण करूं लागलें. ही चिकित्सा, हें परीक्षण म्हणजेच 'सुधारक' काव्य होय. समाजांतील दोषांचें, ढोंगबाजीचें इतकें कठोर व हंसत हंसत सूक्ष्म विश्लेपण करणारें, उपहासाबरोबरच उदात्त ध्येयाची शिकवण देऊन उद्बोधन करणारें मराठींत यासारखें हेंच काव्य होय.

'सुधारका'नंतर बऱ्याच वर्षांनीं त्यांनीं 'नकुलालंकार' हें १०९० आर्यांचें उपहासपर काव्य लिहिलें. या आर्यांचा ढंग 'मोरोपंती' असून लेखनपद्धति 'सुधारका' प्रमाणेंच मर्मभेदक आहे. पुण्यपत्तनांत एकेकाळीं शिष्टपणानें मिरविणाऱ्या एका मत्सरी कविब्रुवाच्या वाङ्मयक्षेत्रांतील लटपटी व कारवाया यांमुळें तिरस्कार व संताप उत्पन्न झाल्यामुळें हें विडंबन लिहिण्यास प्रारंभ झाला. काव्य लिहावयास प्रारंभ केला त्यावेळेस ही व्यक्ती हयात होती; समकालीन नवशिक्षित कवींना 'बिंदुस्रावी कवि' म्हणून हिणवून, मोरोपंताच्या घरीं शागिर्दी करण्याचीहि यांची लायकी नाहीं असे वेळींअवेळीं उद्गार काढून त्यांचा उपहास करण्यांत त्यांना मोठी धन्यता वाटे. त्यांच्या या फाजील शिष्ट-

पणाचे वाभाडे काढण्याच्या हेतूनें पटवर्धनांनी लेखणी हातीं घेतली. पण पुढें, विशिष्ट व्यक्ती डोळयांसमोर ठेवून लिहिणें त्यांना बरें वाटेना म्हणून, समाजांत अनेक ठिकाणीं अनेक स्वरूपाच्या आढळणाऱ्या लटपट्या व संधिसाधू व्यक्तींची एक स्वतंत्र व्यक्ती 'कविभूषण कविकल्पद्रुम दण्डी म्हणजेच रा. ब. प्रो भय्यासाहेब नकुलराव दण्डे कुलकर्णी—बनवून त्यांचें जीवनचित्र रेखाटण्यांत आलें. "एखादा आवडता सिद्धांत, एखादा जागतिक संदेश प्रतिपादण्यांसाठीं नि जगाला कशाचा तरी लाभ करून देण्यासाठीं हें काव्य जन्मलेलें नाहीं. तुम्ही आम्ही जन्मल्यापासून जितका जगाला लाभ होण्याचा संभव तितकाच लाभ या काव्यापासून होण्याची आशा आहे; तथापि हट्टानें मंथन करून कांहीं नवनीत काढायचेंच झालें तर एवढें निघूं शकेल. संसार हा विचित्र आहे. नीट पहा म्हणजे चमत्कृति दिसेल आणि चमत्कृति दिसली कीं हसूं येईलच येईल. तेव्हां डोळे मिटून पाणी गाळूं नका. डोळे उघडे ठेवून चाला नि हंसा. परिहासानें हंसणें शक्य न झाल्यास उपहासानें हंसा पण हंसा. धुमसण्यापेक्षां हंसणें, विकटपणानें हंसणें केव्हांहि श्रेयस्कर होय. जें अपरिहार्य आहे तें हंसत सहन करण्यानेंहि शत्रूवर कडी होते." प्रो जोग यांच्यासारख्या पटवर्धनांच्या चहात्यांनीं, "यांत खर्च झालेली प्रतिभा दुसरीं विरहतरंगासारखीं काव्यें लिहिण्यांत उपयोगास आणली असती तर बरें झालें असतें असा विचार मनांत आल्यावांचून राहत नाहीं,*" असा अभिप्राय, त्यांतील बुद्धिप्रकर्ष, ठायीं ठायीं आढळणारें पांडित्य, प्रतिभेच्या तरळतेची पदोपदीं पटणारी साक्ष इत्यादि गुण मान्य करूनहि, व्यक्त केला आहे. हा अभिप्राय अर्थातच त्यानीं कवीच्या पूर्वनिर्मित थोर दर्जाच्या काव्यांशीं तुलना करून व कवीसंबंधींच्या स्वतःच्या विशिष्ट अपेक्षा बाळगून दिलेला आहे. तो सर्वसंमत होईलच असें नाहीं. 'छंदोरचने'चें पुनर्लेखन व तद्विषयक अभ्यास चालू असतांना स्वतःच्या मनोविनोदनासाठीं यांतील अनेक आर्यांची रचना झाली. एक उपहासपर काव्य लिहून तें प्रकाशित करावयाचें अशी प्रारंभीं तरी कांहीं योजना नव्हती. कांहीं आर्या रचल्या कीं त्या आपल्या स्नेहीमंडळींत मधूनमधून वाचून दाखवावयाच्या व स्वतःची

* अर्वाचीन मराठी काव्य, पृ. १८७.

व त्यांची करमणूक करावयाची, असें तेव्हां चाले. पण पुढें ही आर्यांची संख्या जसजशी वाढत चालली तसतशी, 'सुधारका'प्रमाणेंच त्याला सुसूत्र काव्याचें रूपच दिलेलें काय वाईट अशी कल्पना सुचली किंवा सुचविली गेली. ही कल्पना पटल्यामुळें, कथानकाचा धागा नीट जुळवून सर्व आर्यांची त्यांनीं पुनर्रचना केली. या काव्याला 'सुधारका'ची' योग्यता येणार नाहीं ही त्यांनाहि जाणीव होती व तशी त्यांनीं कधीं अपेक्षाहि केली नव्हती. पण तसें असलें तरी ते मोरोपंताप्रमाणें म्हणत "परि म्यां एके दिवशीं रेवडीचा स्वाद कां न चाखावा."

'नकुलालंकारा'प्रमाणेंच उमरखय्यामकृत 'रुबायां'च्या भाषांतराच्या कामीं त्यांनीं केलेले परिश्रम अनेकांना अस्थानीं वाटले; आणि लोकप्रियता तर तें कधींच संपादूं शकलें नाहीं. याला अनेक कारणें आहेत; पण त्यांतील प्रमुख कारण म्हणजे, भाषांतराची योग्यता ठरवूं शकेल अशा फार्शी जाणणाऱ्या मराठी वाचकवर्गाचा अभाव हें होय. फिट्झेरल्डचें इंग्रजी भाषांतर वाचलेला वर्ग व वाचकांत मोठा. आणि फिट्झेरल्डनें तर भाषांतराचे बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य आचरलेलें. "[१]फिट्झेरल्डनें मूळ सुभाषितवजा त्रिटाळशांच्या शेंकडों रुबायांतून सुमारें पन्नास अखंड रुबायांची व इतर थोड्या स्फुट श्लोकार्धांची व चरणांची निवड करून जुळणी केली, आणि शब्दशः पाहिल्यास अगदींच शिथिल, पण स्वतंत्रपणें वाचिल्यास अभिनव, सरस व चटकदार असें भाषांतर तयार केलें. रस काढून घेऊन चोथा त्यानें टाकून दिला. मूळांतील भावनेचा आभास वा अभाव याच्याऐवजीं शीतल करुणरसाची त्यानें योजना केली आणि मूळांतील केवळ चमत्कृतिजनक अशा अनुप्रासश्लेषादि अलंकारांच्या ठिकाणीं त्यानें अर्थगांभीर्य, नादगौरव आणि अंधुक व्यंजना यांची स्थापना केली. त्याच्या कांहीं रुबायांना ( उदाहरणार्थ ५ वी )[२] मूळांत आधारच नाहीं. कांहींत हाफिझ् वगैरे कवींचे प्रतिध्वनि आहेत. उदाहरणार्थ,

---

१ द्राक्षकन्या, माधवजूलियन्, प्रस्तावना पृ. ११

२ " Iram indeed is gone with all its Rose.
And Jamshyd's Sev'n ring'd Cup where no one knows;
But still the vine her ancient Ruby yields,
And still a Garden by the Water blows.

चौथ्या आवृत्तींतील ३३ व्या रुबाईत फरीदुद्दीन अत्तार या कवीचा प्रतिध्वनि आहे. शिवाय मूलतः त्रुटित अशा रुबायाना फिट्जेरल्डनें स्वतःचा असा क्रम लावून दिल्यानें या हुर्मुजी मोत्यांच्या सराला एकप्रकारचें एकपिंडत्व व पूर्णत्व आलें आहे. स्थूलमानानें पाहतां या काव्यांत एका विचारी जीवाचा इतिहास सूचित झालेला दिसतो. प्रतिभेची किमयाच अशी आहे कीं तिच्या हातगुणानें मूळांतील हीन पितळाचें बावनकशी सोनें व्हावें. फिट्जेरल्डची कृति वाचून जी एक सुख-करुण काव्यमय संवेदना होते ती फार्सी मूळ वाचून मुळींच होत नाहीं. मूळ फार्सीवरून व्हिन्फील्ड, टॉम्सन, पेन वगैरे लोकांनीं केलेलीं शुद्ध व अधिकृत भाषांतरें स्वाभाविकपणेंच नीरस वाटून भाषांतरकारांच्यावर एकांगी व अन्याय्य टीका होते. असें सांगतात कीं काश्मिरांतून फुलें परदेशीं नेलीं कीं त्यांचा रंग कायम राहिला तरी विशिष्ट सुगंध कमी होतो वा अगदींच उडून जातो. फिट्जेरल्डनें इराणी काव्यवनांतून कांहीं फुलें व दलें गोळा करून त्यांचा भरगच्च हार गुंफिला; आणि त्यांचा रंग व तजेला उजळून स्वप्रतिभेनें त्यास अभूतपूर्व व शाश्वत अशा परिमळाची जोड करून दिली. सामान्य गोष्टीच, पण त्या कष्टशील प्रतिभेच्या गंगेंत सुस्नात होऊन बाहेर पडल्या कीं कशा अभिनव व चिरमनोहर होतात याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे ही फिट्जेरल्डची वाग्वैजयंती आहे. साधनसामग्री त्यानें स्वतः उत्पन्न केलेली नसली तरी त्याच्या दुर्लभ योजकतेमुळें ही त्याची जिवंत कृति पृथगात्म, स्वतंत्रच समजण्यांत आली पाहिजे " पटवर्धनांनीं मूळांतून केलेल्या भाषांतरावर टीका करणारे लेखक वा वाचक ही गोष्ट लक्ष्यांत घेत नाहींत

उमरखय्याम किंवा त्याची कविता यांबद्दल पटवर्धनांचें विशेषसें प्रेम नव्हतें. त्यांच्यासारख्या प्रयत्नवादी ध्येयपूजकाला अशाश्वतीचें गीत गाणाऱ्या शोकी उमरची संशयवादी व गाढ निराशेच्या छटांनीं भरलेली वृत्ति आकृष्ट करणें शक्यच नव्हतें. निकटवर्ति स्नेह्यांचा अत्याग्रह व स्वतःस फार्सी भाषा येत असल्यामुळें एक जगद्विख्यात काव्य मूळांतून मराठींत आणण्याचा योग येत आहे तर तो साधावा हा हेतु, यामुळेंच त्यांनीं या कामाला हात घातला. पाऊण महिन्यांत त्यांनीं भाषांतर पुरें केलें. तें पुरें झाल्यावर ' निरनिराळया आवृत्त्या पाहून पाठभेदांतून निवड करून भाषांतर मूळाशीं अधिकाधिक धरून सरस व प्रसन्न करण्याचें काम सुरू झालें. शिवाय सर्व रुबायांचा अर्था-

नुसार अनुक्रम लावणें अगत्याचें वाटलें. या सार्‍या किचकट कामानें वर्ष खाल्लें!' पण या कष्टांचें विशेषसें चीज झालें नाहीं. पण त्यामुळें ते निरुत्साही झाले नाहींत. फिट्झेरल्डच्या इंग्रजी रुबायांच्या पहिल्या व चौथ्या आवृत्तीचीं त्यानीं 'द्राक्षकन्या' व 'मधुलहरी' अशीं दोन भाषांतरें प्रसिद्ध केलीं, त्यासाटीं पदरमोड केली, इतकेंच नव्हे तर सोन्याच्या मोलाचा काळहि बहुत खर्च केला. परभाषांतील प्रातिनिधिक ग्रंथांचीं स्वभाषेंत अधिकारी लेखकांकडून जेवढीं भाषांतरें होतील तेवढीं हवीं आहेत हें खरें, परंतु पटवर्धनांसारख्या सृजनशील बुद्धिमंताची प्रतिभा 'रुबायां'च्या भाषांतरासारख्या दुय्यम दर्जाच्या कामीं खर्ची पडावी, हें त्यांचा अधिकार जाणणार्‍यांना तितकेंसें रुचत नाहीं. 'हौस वेडी असते आणि हौसेला खर्चाचीहि फिकीर नसते,' हें खरें पण त्यालाहि कांहीं मर्यादा आहेच.

काव्य हें पटवर्धनांच्या भावनात्मक जीवनाचा एक भाग होतें; त्यांच्या मानसिक विसांव्याचें तें एक अति पवित्र असें स्थान होतें. त्यांचें काव्य हें त्यांच्या आत्म्याच्या प्रवासाची एक त्रुटित अशी दैनंदिनी आहे. ही दैनंदिनी स्वतःच्या समाधानाकरितां, आत्मप्रगटीकरणाच्या आनंदाकरितां, चित्तांत उठणार्‍या कल्लोळांना स्थिरावण्याकरितां लिहिली आहे. "मी काव्यं यशसे म्हणूनि धरिली नाहीं करीं लेखणी; किंवा अर्थ हवा म्हणूनि नकली स्तोत्रें न मीं गायिलीं" हे त्यानीं एके ठिकाणीं काढलेले उद्गार त्यांच्याबाबतींत अक्षरशः सत्य आहेत. काव्यरचना हें त्यांचें ध्येय नव्हतें; तो त्यांचा छंद होता. संशोधनपूर्वक स्वभाषासेवा हें त्यांचें ध्येय होतें. संशोधनाकडे, ज्ञानोपासनेकडेच त्यांची मूळापासून प्रवृत्ति होती. महाविद्यालयांतून बाहेर पडल्यापासून तों आयुष्याच्या अखेरपर्यंत त्यांनीं आपली ही ज्ञानोपासना अखंड चालू ठेविली. अंतःप्रवृत्ति काव्यात्म असूनहि तिचा त्यांनी बुद्धीवर कधींहि वरचष्मा होऊं दिला नाहीं. त्यामुळें भोंवतीं कितीहि वावटळी उठल्या तरी त्या त्यांना भिववूं शकल्या नाहींत, त्यांच्या ध्येयपथापासून त्यांना दूर लोटूं शकल्या नाहींत. 'काव्यात्म जीवनाची राख झाल्यामुळें ते पांडित्याकडे वळले' असें विधान त्यांच्या एका चाहत्यानें एका ठिकाणीं केलें आहे. हें विधान ऐकावयाला काव्यमय वाटत असलें तरी त्याला वस्तुस्थितीचा आधार नाहीं.

" आस जळुनि तीच राख जणुं शिरीं उडाली
क्षारोदक ऊन गळुनि करपली नव्हाळी "

हे त्यांचे एका कवितेतील उद्गार त्यांच्या जीविताला लावणें हें एक प्रकारचें धाष्टर्य ठरेल. अंतःकरणांतील नव्हाळी करपली असती तर त्यांचा जीवंतपणींच मृत्यू घडता. परंतु त्यानीं तसा घडूं दिला नाहीं. आणि त्यामुळेंच ते अमर होऊं शकले. भावना व बुद्धि यांचा सुंदर मिलाफ त्यांनीं आपल्या आयुष्यांत घडवून आणला होता. त्यांचें काव्य व पांडित्य हीं दोन्हीहि प्रतिभापूर्ण व प्रभावी वाटतात याचें कारण हेंच.

पटवर्धनांची स्फुट कविता 'गज्जलांजलि', 'स्वप्नरंजन,' 'तुटलेले दुवे', व 'मधुलहरी' अशा चार संग्रहांतून प्रसिद्ध झालेली आहे.

ग ज्ज लां ज लि : स्फुट कवितांचा स्वतंत्रपणें प्रसिद्ध झालेला ( १९३३ ) असा हा त्यांचा पहिला संग्रह. आत्माविष्कारासाठीं लिहिलेले हे गज्जल नाहींत. कवीच्या भाषेतच सांगायचें तर हा 'पद्यप्रपंच केवळ कलेची सेवा' म्हणून केलेला आहे. त्यानें लिहिलेलें त्याच्या यौवनांतील तें प्रेमकाव्य नव्हे, आणि कांहीं टीकाकार समजतात त्याप्रमाणें त्यांतील—कांहीं अपवादात्मक गज्जल सोडून दिल्यास—प्रेमविषयक तत्त्वज्ञान हेंहि त्यांचें नव्हे. कविमनाशीं दीर्घकाळ परिचित असलेले रा. विठ्ठलराव घाटे यांनीं यात्रायतींत दिलेला पुढील इषारा माधवरावांच्या कवितांचा अभ्यास करणाऱ्यांनीं नेहमी ध्यानीं ठेवावा. " माधवरावांचें प्रेमाचें तत्त्वज्ञान समजून घ्यावयाचें असल्यास त्यांच्या गज्जलांचा उपयोग आपण जपूनच केला पाहिजे, किंबहुना त्यांचा उपयोग न केला तरी चालेल. हीं त्रुटित गीतें म्हणजे माधवरावांचा कल्पनाविलास आहे. रा. उमराणींना * माझें हें विधान मान्य नाहीं. त्यांना गज्जलांत कल्पनेहून

* " गज्जलांजलीत माधवरावांचें आत्मचरित्र नाही याविषयी वाद नाही. परंतु तो केवळ कल्पनेचाहि विलास नाही. असूनि प्रणयाचें अधिष्ठान ज्या कवीच्या अंतःकरणांत तीव्र जागृत आहे त्याने त्या देवतेची प्रत्येक गज्जलरूपानें पूजा बांधलेली आहे. प्रणयोपासनेची ती अलग अलग भावमुद्रा आहे." [ गज्जलांजलि, समीक्षण; के. ग. उमराणी; लोकशिक्षण. फेब्रु-मार्च १९४० ]

अधिक म्हणजे मनांतील भावना व्यक्त झाल्या आहेत असें वाटतें. मीहि तें मान्य करितों. वास्तविक मतभेदाला येथें जागाच नाहीं. जातिवंत कवीचें कोणतेंहि काव्य घेतलें तर त्यांत कमी अधिक प्रमाणांत कल्पनेबरोबर भावना या असणारच. भावना व्यक्त झाल्या नाहींत तें काव्यच नाहीं. परंतु भावना भावनांत फरक आहे. कवि परकायाप्रवेश करून नाना परिस्थितींतील व्यक्तींच्या नानाविध भावना आपल्या काव्यांत व्यक्त करितो इतकेंच नव्हे तर त्याची सहानुभवाची शक्ति जितकी मोठी असेल त्या मानानें तो दुसऱ्यांचे अनुभव आणि भावना जिव्हाळयानें व आपलेपणानें आपल्या काव्यांत रंगवितो. ब्रौनिंगचें उदाहरण लक्ष्यांत घेण्यासारखें आहे. तो नाना देशांतील आणि नाना शतकांतील भिन्न भिन्न कार्यक्षेत्रांत वावरलेल्या व्यक्तींशीं समरस होऊन त्यांच्या हृदयाची कहाणी बहुधा त्यांच्याच तोंडून वदवितो. त्या व्यक्तीच काव्यांत बोलत असल्यानें वाचकांची दिशाभूल होत नाहीं. उलट कवीच स्वतः काव्यांत बोलत आहे अशी भूमिका असली म्हणजे वाचकांचा गोंधळ होतो व इतरांच्या भावनांचा आरोप कवीवर करण्याचा मोह उत्पन्न होतो. गझलांत माधवराव स्वतः बोलत असले आणि नानाविध भावना व अनुभव व्यक्त करीत असले तरी ते अनुभव व त्या भावना त्यांच्या स्वतःच्याच आहेत असें समजण्याचें कारण नाहीं. बरेचसे गझल केवळ नवीन चाली मराठींत आणण्याच्या हेतूनेंच माधवरावांनीं गमतीनें आम्हां मित्रांच्या देखत लिहिलेले आहेत. त्यांत भावना आहेतच पण त्या अनुभवामुळें जन्म पावलेल्या आहेत असें म्हणणें धाडसाचें होईल. ............गझल लिहिण्यांत माधवरावांचा मुख्य हेतु आपल्या भावना व्यक्त करणें हा नसून एका नवीन काव्यप्रकाराचा महाराष्ट्रास परिचय करून देणें हाच होता. म्हणूनच यांत इराणी कविसंकेत, कल्पना, भाषेच्या लकबा यांचेंच वातावरण प्रामुख्यानें दिसून येतें."

गझल म्हणजे बेहोष प्रेमपागलांची कविता अशी एक सर्वसाधारण समजुत मराठींत होऊं पहात होती. गझल याचा धात्वर्थ 'प्रेमालाप' असा असला तरी 'मस्त व उत्तान शृंगार' हाच गझलाला अनुरूप हा समज दूर करून, शृंगाराप्रमाणेंच नीति व वैराग्य हेहि त्याचे विषय होऊं शकतात हें, त्याच-

प्रमाणें गज्जल हा वृत्तप्रकार नसून तो एक काव्यप्रकार असून तो अनेक वृत्तांत रचतां येतो हें सोदाहरण दाखविण्याच्या हेतूनें त्यांनीं १९२२ सालीं मुंबईस निघणाऱ्या 'महाराष्ट्र–साहित्य' या मासिकांत 'गज्जलांजलि' या शीर्षकाखालीं एक लेखमाला प्रसिद्ध केली. यांत त्यांनीं १६ गज्जल रचून दाखविले होते. पुढे, १९२३ सालीं रविकिरणमंडळानें प्रसिद्ध केलेल्या 'काव्यचर्चा' हा पुस्तकांत 'वृत्तमनोरमा' या शीर्षकाखालीं याच विषयावर, संक्षेपानें सर्व वृत्तें सोदाहरण देणारा एक लेख त्यांनीं लिहिला. अनेकांना यांत त्यांनीं दिलेलीं वृत्तें आवडल्यामुळें व त्यांनीं आग्रह धरल्यामुळें अरबी छंदः-शास्त्रांतील बहुतेक वृत्तांचा उपयोग करून त्यांनीं गज्जलांजलींतील भावगीतांची रचना केली. 'रसाळ व मंजुळ वाटणाऱ्या कांहीं वृत्तांचा स्वीकार झाल्यास, मराठी वृत्तसंग्रहांत भर पडेल,' अशी आशा त्यांना वाटे.

मराठींत हा नवा काव्यप्रकार रूढ करतांना अरबी-फार्सी वृत्तांच्या शुद्धतेकडे दुर्लक्ष होऊं नये, यासाठीं स्वतःचें व्यक्तिवैशिष्ट्य राखून अत्यंत कसोशीनें त्यांनीं काव्यरचना केली, आणि त्याबरोबरच त्याचें शास्त्रहि सांगून टाकलें.

गज्जलांजलि ही विविध रसरंगांनीं युक्त अशा १०८ भावकुसुमांची अंजलि आहे. त्यांत जशीं प्रणयगीतें आहेत तशींच वीर पुरुषांना अनुलक्षून गायिलेलीं पराक्रमगीतेंहि आहेत; प्रेमविफलतेचीं नैराश्यगीतें जशीं आहेत तशींच जीवन-साफल्याचें समाधान उत्पन्न करणारीं शांतिगीतेंहि आहेत. प्रणयाचे विविध राग जसे त्यांत आळवलेले आहेत, तशींच त्यांत प्रेमाचीं व भक्तीचीं विविध रूपें अतिशय हळुवारपणें चितारलेलीं आहेत.

स्वप्नरंजन : पटवर्धनांनीं, १९११ ते १९३४ या तेवीस वर्षांच्या काळांत लिहिलेल्या–गज्जल व सुनीतें वगळून–११३ स्फुट कविता यांत संग्रहीत केल्या आहेत. या कवितांचें स्वरूप अनेक रंगी व अनेक ढंगी आहे; त्यांचे विषयहि विविध आहेत. 'भावनेची उत्कटता आणि उत्तानता, आत्मलेखनाची हौस, अन्यायाची चीड, रचनेचा अर्थदृष्ट्या आणि वृत्तदृष्ट्या साक्षेप, लेखनशैली-मधील व्यक्तिविशिष्ट अशी विषमता इत्यादि पटवर्धनांचे सारे विशेष या संग्रहांतील काव्यांत उतरलेले दिसतात.'

पटवर्धनांच्या आयुष्यांत या तेवीस वर्षांच्या काळांत जीं अनेक आवर्तनें आणि प्रत्यावर्तनें झालीं, त्यांच्या भावजीवनाला जे अनेक प्रकारचे हेलकावे मिळाले, त्यांच्या मनोभूमिकेवर जीं लहानमोठीं वादळें उठलीं, त्यांतून यांतील बऱ्याचशा कविता निर्माण झालेल्या आहेत; त्यांच्या आंतर्जीवनाचीं स्पष्ट चित्रें यांत उमटलीं आहेत; त्यांच्या विचारांतील व वृत्तींतील पालटहि प्रतिबिंबित झालेले आहेत.

माधवरावांची बुद्धि जितकी तरल, तितकीच त्यांची मनोवृत्ति क्षोभसुलभ होती. कोणता प्रसंग किंवा कोणती घटना त्यांच्या मनांत केव्हां वादळ उठवील याचा नेम नसे. एका क्षणापूर्वी हंसत खेळत, विनोद करीत असलेले माधवराव, दुसऱ्या क्षणीं एखाद्या दृश्यामुळें किंवा एखाद्या स्नेह्याच्या तोंडून सहज निघालेल्या उद्गारामुळें क्षुब्ध व गंभीर होऊन अबोल बनून विचारांत गुंग होत, हा अनुभव त्यांच्या निकटवर्ती स्नेह्यांपैकीं अनेकांना अनेकदां आलेला आहे. त्यांच्या पुष्कळशा कवितांचा जन्म अशा मनःस्थितींतूनच झालेला आहे. याचीं उदाहरणें लीलाबाई पटवर्धन[1] व ग. त्र्यं. माडखोलकर[2] यांच्या आत्मचरित्रांत त्याचप्रमाणें खुद्द त्यांच्या पत्रांत[3] आलेलीं आहेत.

'स्वप्नरंजन' हा 'रंजित स्वप्नचित्रां'चा एक संग्रह असून रसिकांनीं आपलें रंजन करून घ्यावें, असें माधवरावांनीं या संग्रहाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. प्रत्यक्ष कवीनेंच असें म्हटल्यानंतर रसिक त्यावर काय म्हणूं शकणार ! वास्तविक 'स्वप्न' किंवा स्वप्नचित्र या शब्दानें जी कल्पना उभी राहते तिच्याशीं, कांहीं कविता वगळल्यास या कवितांचें स्वरूप जुळत नाहीं. त्यामुळें निर्माण होणारी अपेक्षा प्रारंभींच फोल ठरते. कल्पना, कला व भाषा यांचा यांतील आकर्षक विलास पाहून मन रंजित होत असलें, तरी जो कालखंड हा 'संग्रह' व्यापतो तो अनेक क्रांतिकारक घटनांनी भरलेला कालखंड लक्ष्यांत घेतां पटवर्धनांसारख्या संवेदनाशील, क्षोभसुलभ, प्रज्ञावंत व विचारवंत कवीची

---

१ आमचीं अकरा वर्षें, पु. १२९–१४७.

२ दोन तपें, पृ. २३९–२४१.

३ माधवरावांची पत्रें, 'रा. वि. म.' लोकशिक्षण, फेब्रु–मार्च १९४०.

प्रतिभा त्यानें विशेषशी प्रस्फुरित झालेली दिसत नाहीं. 'लक्ष द्या चोंहींकडे, द्या कालवैशिष्ट्याकडे' असें आक्रंदून सांगणाऱ्या कवीची ही अलिप्तता तीव्रतेनें जाणवल्याशिवाय राहात नाहीं.

कदाचित् या अलिप्ततेचें कारण त्यांची विशिष्ट प्रकारची प्रकृति हेंहि असूं शकेल. या त्यांच्या प्रकृतीवर त्यांचेच पुढील विचार थोडाबहुत प्रकाश पाडूं शकतील. ते म्हणतातः* "एखादा कवि आपल्या काळाचा प्रतिनिधि कितपत असावा हें त्याच्या स्वभावावर, त्याच्या प्रवृत्तीवर अवलंबून राहील. परिस्थिति ही न्यूनाधिक प्रमाणांत नेहमींच जाचक असते. नवे नवे प्रश्न नवे नवे कलह, नित्य उपस्थित होत असतात. कोणी कोणी या कलहापासून दूर एकीकडे जाऊन त्या कलहाची आंच लागणार नाहीं इतकेंच नव्हे तर त्याची आठवणहि होणार नाहीं अशी रम्य तटबंदी आपल्याभोंवतीं करून घेऊन आत्मसंतोषानें कालक्रमणा करितात. कोणी कोणी कलहांत प्रत्यक्ष भाग घेत नाहींत, पण ज्या पक्षाविषयीं त्यांना सहानुभूति वाटत असेल त्या पक्षाला गुप्त साह्य करीत तटस्थ, सुखी आणि शांत राहतात. कोणी कोणी वैयक्तिक सुखाचीच काय पण यशापयशाचीहि चिंता न करितां तत्त्वासाठीं झुंजांत पडतात. हे असे प्रकृतिभेद कवींत आणि इतर वाङ्मयसेवकांतहि संभवतात. प्रत्यक्ष झुजांत पडलेल्या मनुष्याला वाङ्मयनिर्मितीसाठीं अवश्य असणारें स्वास्थ्य आणि सवड हीं क्वचितच लाभतात. झुंजात बौद्धिक भाग घेऊन आपल्या पक्षाचें मंडण, विरुद्ध पक्षाचें खंडन आणि स्वमतांचा प्रसार करण्याचें मोठें कार्य आतां मुख्यतः वक्त्यांच्या आणि वर्तमानपत्रांच्या अंगावर पडलें आहे. एखादा कवि जर पद्यांत हें कार्य करण्याचा अव्यापारेषु व्यापार करील तर त्याची भाषा कितीहि उत्कट आणि घोटीव असली तरी त्याच्या काव्याला वर्तमानपत्राहून अधिक आयुष्य आणि महत्त्वहि लाभणार नाहींत. प्रचलित प्रश्नांचा निर्णय होण्याच्या आधींच त्या काव्याचा फडशा पडेल. अटीतटीनें झुंज खेळतांना एकांगीपणा येतो. दृष्टीला विकृति होते; आणि जेथें विकृति आहे तेथें शाश्वति येऊं शकत नाहीं. संसारांतील विविध कलहांकडे योग्य सहानुभूतीनें पाहून जो संसारचित्रें रंगवील आणि कळकळीचे कां होईना पण

* आधुनिक मराठी कविता, 'काव्यविहार', पृष्ठ १९०–१९२.

नुसते उपदेशपाठ न देतां वाचकांना आपली दृष्टि देईल, आणि आपल्या कलाकृतीच्या करवीं सहानुभूतीच्या बळें वाचकांच्या प्रवृत्तीला नकळत चांगलें वळण देईल, त्याची कृति आदर्शभूत व शाश्वत समजावी. तो कवि धन्य होय. खोल ज्ञानामुळें, व्यापक सहानुभूतीमुळें, सूक्ष्म व दूरवर निरीक्षणामुळें आणि एकप्रकारच्या तटस्थपणामुळें अशा कवीची कृति जितकी मनोरंजक आणि हृदयंगम तितकीच उद्बोधक आणि वास्तव उठते. पण महाराष्ट्रांत या प्रतीचे वाङ्मयसेवक दुर्मिळ आहेत. मराठी लेखक सध्यांच्या सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीमुळें कांहीं विशिष्ट वर्गांतूनच निर्माण होतात. इतर वर्गांविषयीं त्यांना कितीहि सहानुभूति वाटली तरी निकट सहवासाच्या अभावीं, त्यांच्या कृतींत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष अनुभूतीचा जिव्हाळा येऊं शकत नाहीं. लेखकाच्या जीवनाचा राष्ट्रीय संसारांतील विविध कलहांत पडलेल्या मनुष्याच्या जीवनाशीं निकट संबंध क्वचितच येतो. म्हणून श्रेष्ठ प्रतीचें प्रातिनिधिक वाङ्मय निर्माण व्हायला, निरनिराळ्या जातींतूनच नव्हे तर निरनिराळ्या वर्गांतून लेखक निघूं शकतील अशी सामाजिक व आर्थिक स्थिति यायला हवी आणि असें जेव्हां होईल तेव्हांच आपलें वाङ्मय खरोखर राष्ट्रीय, खरोखर प्रातिनिधिक होण्याच्या मार्गाला लागेल."

"जीवनांतील विविध कलहांपासून शरीरानेंच नव्हे तर मनानेंहि अलिप्त रहाणारे जसे कांहीं लोक असतात तसेच कांहीं कवीहि संभवतात. कोणाची दृष्टि भूतकालावर स्थिरावेल तर कोणाची अंतर्मुख होईल; त्यांच्या कृतीपासून जर प्रत्यक्ष जाचक परिस्थितीचा क्षणैक विसर पडत असेल, श्रमाचा परिहार होत असेल, आणि काल्पनिक का होईना पण जिवंत व्यक्तीच्या सहवासाचें सुख लाभत असेल तर तिला कविता म्हणून योग्य स्थानमान द्यायला प्रत्यवाय कोणता? असत ना कवितेंत कवीच्याच मनस्तरंगांचीं चित्रें? कवितेंत तत्कालीन समाजाचें प्रतिबिंब असलेंच पाहिजे असें नाहीं."

कवि हा काळाचा प्रतिनिधी कितपत असूं शकेल, त्याचें प्रतिनिधित्व कोणत्या स्वरूपाचें असूं शकतें, हें प्रतिनिधित्व त्याच्या कवितेंत प्रतिबिंबित झालेलें नसेल तर तिला कांहीं महत्त्वच नाहीं किंवा काय असा प्रश्न उपस्थित करून त्याचें उत्तर देण्याचा पटवर्धनांनी वरील विवेचनांत प्रयत्न केला आहे.

वास्तविक आजचे कांहीं टीकाकार कवीबद्दल जेव्हां अपेक्षा बोलून दाखवितात, तेव्हां त्या वरील प्रकारच्या असतात ही पटवर्धनांनी करून घेतलेली समजुत तितकीशी बरोबर नाहीं. कवि हा काळाचा प्रतिनिधी असावा किंवा नसावा यापेक्षां तो कालात्मा ओळखणारा, त्या काळांत वावरणाऱ्या जनतेचें मन जाणणारा, तिच्या मूक भावनांना वाचा फोडणारा, त्यांच्या आशा, आकांक्षा सहानुभवी अंतःकरणानें समजून घेऊन त्यांना धीर देत त्यांच्या जीवनलढ्यांत त्यांना पुढें पुढें नेत त्यांच्यांत एक नवा जीवनानंद निर्माण करणारा असावा, अशा तऱ्हेची ती अपेक्षा असते. अर्थात् ही अपेक्षा सर्वसामान्य कवीकडून कोणीहि करीत नाहीं. पटवर्धनांसारख्या प्रज्ञा व प्रतिभा यांनीं संपन्न असलेल्या व्यक्तीकडून तशा तऱ्हेची अपेक्षा केली जाते. आणि अशा व्यक्ति, सामर्थ्य असूनहि जेव्हां मर्यादित क्षेत्रापलिकडे न जातांना दिसतात त्यावेळेस एक प्रकारचा विषाद वाटूं लागतो आणि त्याच्या कारणांची चिकित्सा होऊं लागते.

तु ट ले ले दु वे: प्रारंभीं स्वतंत्र अशीं लिहिलेलीं व पुढें त्यांतून कथानक निर्माण होऊं शकेल असें वाटल्यामुळें त्याला पोषक अशी गुंफण केलेलीं १०१ सुनीतें. 'या पुस्तकांत मी गेल्या सव्वीस वर्षांत वेळोवेळीं लिहिलेल्या सुनीतांपैकीं बहुतेक सुनीतें संग्रहित करण्यांत आलीं आहेत. एका कवीची ही दैनंदिनी आहे. या दैनंदिनीचीं कित्येक पृष्ठें उपलब्ध नाहींत म्हणूनच या पुस्तकाला 'तुटलेले दुवे' असें नांव दिलें आहे. वेळोवेळीं लिहिलेलीं हीं स्फुट सुनीतें या नांवारूपास येतील अशी मला आरंभीं अर्थातच कल्पनाहि नव्हती. कलाकृति ही जसजशी निर्माण होऊन रूप धरूं लागते तसतशी तिच्या निर्मात्याला तिची कल्पना येत जाते. सुनीतरचनेचे निरनिराळ्या रीतींनी करून पाहिलेले प्रयोग म्हणून हीं सुनीतें स्वतंत्रपणें अभ्यासून पारखतां येतील; पण एकाच शृंखलेंतील दुवे या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहिल्यास कांहीं अधिक रहस्य गावेल आणि व्यक्ति नि प्रसंग यांच्या विविधतेंतहि एक प्रकारचा कौटुंबिक संबंध दृग्गोचर होईल.×

* "माधव जूलियन् यांच्या सर्व प्रकाशित काव्यसंग्रहांत गुणानें श्रेष्ठ, पण

× तुटलेले दुवे; प्रस्तावना.

* तुटलेले दुवे, समीक्षण, के. नारायण काळे, लोकशिक्षण, फेब्रु–मार्च १९४०.

लोकप्रियतेच्या दृष्टीनें कनिष्ठ असा हा काव्यसंग्रह आहे. अर्थगांभीर्य, रसवत्ता व भावनोत्कटता या दृष्टींनीं या संग्रहांतील जितक्या कविता संस्मरणीय आहेत, तितक्या त्यांच्या दुसऱ्या एखाद्या काव्यसंग्रहांत क्वचितच आढळतील.

" असें असलें तरी 'सुनीत' या काव्यप्रकाराच्या गेयताविषयक अननुकूलतेमुळें यांमधील सर्वोत्कृष्ट गीतेंहि वाचनीय व स्मरणीय असलीं तरी तीं लोकप्रिय होण्याचा संभव फार कमी! पण या उणेपणामुळें त्यांचें साहित्यिक महत्त्व व वैशिष्ट्य कमी होतें असें थोडेंच आहे? कारण, कोणत्याहि कवीच्या भावनोर्मींचा उद्रेक त्याच्या वैणिक गीतांतून प्रकट होत असला, तरी त्याच्या वैचारिक व भावनात्मक संघर्षाचा परिपाक, गाढ स्वरूपांत, त्याच्या सुनीतांमधूनच प्रकट झालेला आढळतो. स्वाभाविकच, सुनीतें हीं जरी भावगीतांप्रमाणें रसिकांच्या तोंडीं घोळत राहिलीं नाहींत, तरी त्यांच्या अंतःकरणांत तीं पुनः पुन्हा वाचण्याची इच्छा उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं, आणि प्रत्येक वाचनाच्या वेळीं दृष्टि अधिकाधिक अंतर्मुख होऊन वाचकाला वाचीत असलेल्या सुनीतांतील विचारांचा, भावनांचा व अर्थाचा अधिकाधिक प्रत्यय आल्याशिवाय राहत नाहीं.

"सुनीतलेखकाची जीवनविषयक दृष्टि ज्या मानानें अधिक सार्वत्रिक व सार्वजनिक स्वरूपाची, त्याच्या अनुभवाच्या क्षेत्राच्या मर्यादा ज्या मानानें अधिक विस्तृत, त्याच्या सहानुभूतीची कक्षा ज्या मानानें अधिक व्यापक, त्या मानानें त्याच्या सुनीतांना अधिकतर वाचकांचीं अंतःकरणें आकृष्ट करून घेऊन त्यांना अंतर्मुख व समरस बनविण्याची शक्यता व पात्रता अधिक प्राप्त होते. या दृष्टीनें पाहतां, ज्या कवीविषयीं त्याच्या वाचकांना तो आपल्यापैकींच एक होता, त्याला आपल्याप्रमाणेंच भावना, विचार व अनुभव होतें असें आढळून येईल, तो कवि त्यांजकडून विशेष आपुलकीनें जवळ केला जाईल. बुद्धीला नावीन्याच्या दर्शनानें दोलायमान करणारा, भावनेला चमत्कृतीच्या चकचकाटानें चकविणारा, विवेकाला कल्पनेच्या कसरतीनें थक्क करून सोडणारा कवि, रसिकांच्या मनांत कौतुक, आदर, आश्चर्य उत्पन्न करूं शकेल; परंतु तो आत्मीयता उत्पन्न करूं शकणार नाहीं.

"माधव जूलियन हे या दोहोंपैकीं पहिल्या प्रकारचे कवि आहेत. ते प्रतिभासंपन्न आहेत, कल्पक आहेत, भावना-प्रधान आहेत; पण त्यांची प्रतिभा, त्यांची कल्पना, त्यांची भावना, लोकविलक्षण नाहीं. ज्यांच्यासाठीं ते लिहितात, त्यांच्या अनुभवापेक्षां, त्यांच्या आकांक्षा– अपेक्षांपेक्षां, त्यांच्या भावविचारांपेक्षां सर्वस्वी भिन्न स्वरूपाचें असें त्यांच्या काव्याचें अंतरंग नाहीं. त्यांच्याकडून काव्यस्वरूप पावलेल्या जीवनांतील उत्कटता व उदात्तता आणि सर्व सामान्य वाचकांच्या पार्थिव जीवनांतील औदासीन्य व व्यवहारी वृत्ति, यांत परिमाणात्मक भेद बराच असला तरी गुणधर्मात्मक भेद फारच थोडा आहे. यामुळें माधव जूलियन् यांच्या सुनीतांत सामान्यांतल्या सामान्य वाचकालाहि आपल्याला अनुभवाला न आलेली अशी एकहि अनोळखी भावना किंवा कल्पना भेटावयाची नाहीं. आरशांत आपलें रूप पाहावें त्याप्रमाणें त्यांच्या सुनीतांत ज्याला त्याला आपलेंच अंतरंग, त्याच्या विविध रंगांत अधिक सुस्पष्ट स्वरूपांत उमटलेलें दिसेल. आपल्या मनाचें व हृदयाचें जें चित्र त्याला रंगवितां आलें नसतें, तें त्याला यथार्थ रीतीनें चितारलेलें आढळेल—पण माधव जूलियन्‌ची कविता किंवा सुनीतें वाचतांना आपण कधींच न पाहिलेली, न ऐकलेली, न अनुभविलेली सृष्टि पाहत, ऐकत, अनुभवीत आहोंत, असें मात्र त्याला कधींच वाटावयाचें नाहीं. हें सामान्यत्व माधव जूलियन् व त्यांची कविता यांचें एक असामान्य वैशिष्ट्य आहे, आणि या वैशिष्ट्याचें प्रत्यंतर 'तुटलेले दुवे' वाचतांना विशेष येतें.

"शृंगार ही मानवी जीवनांतील प्रधान प्रेरकशक्ति असल्यामुळें या काव्य-संग्रहांतील बहुसंख्याक सुनीतें प्रेमविषयक असावीं हें स्वाभाविकच आहे. पण जीवन हें केवळ स्त्री–पुरुषांच्या प्रेमाचें एकजिनसी प्रदर्शन नसल्यामुळें, जीवनाप्रमाणेंच या सुनीतसंग्रहांतहि विषयांचें वैचित्र्य व भिन्न भिन्न वैयक्तिक संबंधांतील अनुभवांची विविधता, हीं भरपूर अनुभवावयाला मिळतात. सामान्य माणसाच्या आयुष्यांत तारुण्यापासून परिपक्व प्रौढावस्थेपर्यंत सामान्यतः ज्या घटना आणि त्याच्यामधून उत्पन्न होणारे जे भाव–विचारांचे संघर्ष निर्माण होतात, त्यांचीं प्रतिबिंबें या संग्रहांतील सुनीतांतून पडलेलीं आढळतात. यामुळें प्रत्येक वाचकाला आत्मौपम्यानें त्यांच्याशीं सहज समरस होतां येतें.

" सरंजामी समाजपद्धतीचा अस्त व औद्योगिक युगाचा आरंभ या संधि-कालांतील संघर्षामध्यें जुनीं ध्येयमूल्यें अविश्वसनीय व शंकास्पद वाटूं लागलीं, पण नवीन मूल्यें मात्र प्रस्थापित झालीं नाहींत, अशा अनिश्चित परिस्थितींत विचारवंत व्यक्तीच्या आयुष्यांत जे संदेहाचे तरंग व वैफल्याचे अनुभव उद्-भूत होणें स्वाभाविक आहे, त्यांचे पडसाद या संग्रहांतील सर्व सुनीतांतून ऐकूं येतात. या परिस्थितींत समाजांतील बुद्धिजीवी वर्गाच्या मानसिक व पार्थिव जीवनक्रमांत सर्वांत अधिक खळबळ उडते. ' माधव जूलियन् ' यांच्या अनेक सुनीतांमधून सभोंवारच्या सामाजिक परिस्थितीच्या अनुभवामुळें उद्रेक पावलेलीं आंतरिक आंदोलनें आणि तत्संबंधीं विचक्षणा व विचार हीं प्रकट झालेलीं आढळतात. पण तीं आंदोलनें, ती विचक्षणा व ते विचार जर समी-क्षिलीं तर त्यांतून द्रष्टयाची किंवा मार्गदर्शक तत्त्वज्ञाची विशिष्ट दृष्टि प्रतीत न होतां केवळ प्रकृतीनें पुरोगामी असलेल्या विचारशील सज्जनाचे प्रवृत्तिप्रवाह मात्र दृष्टोत्पत्तीस येतील. तडजोडीचें व समन्वयी युक्तिवादाचें क्रांतिविरोधी सुधारणावादी धोरण त्यांत प्रामुख्यानें अनुसरलेलें आढळेल. कोणत्याहि समाजांत क्रांतीच्या कालांत त्यांतील सुबुद्ध व सुप्रतिष्ठित शिष्ट वर्गाची विचारसरणी अशीच असंतुष्ट पण गतिविरोधी, आणि यामुळेंच अंतर्विरोधी व विसंगतियुक्त राहते. ' माधव जूलियन् ' यांचें त्यांच्या सुनीतांमधून प्रकट होणारें तत्त्वज्ञान या वर्गाच्या मनोवृत्तीचें काव्यात्मक मूर्तीकरण आहे—तिच्या संक-लित स्वरूपाचें सौंदर्यपूर्ण व्यक्तीकरण आहे, असें म्हणतां येईल. एका बाजूला त्यांचा व्यक्तिनिष्ठ राष्ट्राभिमान, धर्माभिमान, भाषाभिमान, प्रांताभिमान, इतिहासाभिमान, कलाभिमान, आणि दुसऱ्या बाजूला बदलती भौतिक परि-स्थिति व तज्जन्य नवीन सामाजिक मूल्यें, यांच्यामध्यें जेव्हां त्यांना आपल्या मानसिक व पार्थिव जीवनांत संगर उद्भवलेला दिसतो, तेव्हां ते दिङ्मूढ होऊन जातात; आणि प्राणिमात्राच्या आत्मसंरक्षणाच्या स्वाभाविक बुद्धीनें ते क्रांतिपराङ्मुख होऊन जुन्या पारंपरिक मूल्यांचें नव्या शब्दांनीं व नव्या उदा-हरणांनीं समर्थन करीत असलेले आढळतात.

" माधव जूलियन् यांच्या प्रेमविषयक काव्यांचें—सुनीतांचें—विश्लेषण केलें असतां आपणाला तेथेंहि हाच अनुभव येईल. वातावरणाच्या तपशिलांतील

व्यावहारिक यथार्थता, स्वभावोक्त भावाविष्कार, भाषेचें साधें सौंदर्य, रचनेंतील सुलभ सुबकपणा इत्यादि वैशिष्टयामुळें त्यांचीं प्रेमगीतें इतर अनेक कवींच्या कृतींपेक्षां वेगळीं आहेत यांत वाद नाहीं. प्रेम हा मराठी कवितेंतील एक संकेत होता त्याला त्यांनीं वास्तव सृष्टींत आणिलें. मराठी काव्यांतील 'प्रेम' ही एक विकृति आहे, असें कवि नसणाऱ्यांना वाटावयाला लावण्यासारखी जी एक कृत्रिम अवस्था 'प्रेमा'ला प्राप्त झाली होती, तींतून त्याची सुटका करून, मनुष्याच्या निरोगी प्रकृतींतलीच ती एक प्रवृत्ति आहे हें कोणासहि पटावें, अशा साध्या, सुबोध, नैसर्गिक रीतीनें त्यांनीं त्यांचें आपल्या कवितांतून आविष्करण केलें. प्रेमकाव्याच्या प्रांतांतील त्यांची ही कामगिरी बहुमोल व निःसंशय पुरोगामी आहे, परंतु 'प्रेम' या भावनेविषयींची आधुनिक शास्त्रीय दृष्टि त्यांच्याकडून आत्मसात् झालेली नसल्यामुळें, दोन भिन्नलिंगी जीवांतील नैसर्गिक आकर्षणामधील उत्कटतेच्या प्रकटनापेक्षां, त्या विशिष्ट संबंधाशीं संलग्न असलेली सामाजिक परिस्थिति व सामाजिक कल्पना यांच्या गुंतागुंतीवर, कार्यकारणभावावर अथवा हेतुपरिणामावर त्यांनीं अधिक भर दिलेला आढळतो. स्वाभाविकच, त्यांच्या प्रेमगीतांतून रसरसणाऱ्या वैयक्तिक विकारांच्या अग्निरसाचे धगधगीत कढ दिसण्याऐवजीं जीवनांतील विशिष्ट घटनांमधून उद्भूत झालेल्या खाजगी वैयक्तिक भावनांच्या वर्णनाचे सामाजिक दृष्टीनें लिहिलेले अस्सल ऐतिहासिक लेखी पुरावे मात्र आढळतात.

" अर्थात् यांत कांहीं कमीपणा आहे असें नाहीं. कारण ज्या कालांत, ज्या परिस्थितींत, ज्या मनःस्थितींत हीं काव्यें लिहिलीं गेलीं त्या कालांत, त्या परिस्थितींत, ही प्रवृत्ति अगदीं सहज व सामान्य होती. किंबहुना स्वतःच्या वैयक्तिक भावना देवादिकांवर—राधाकृष्णांवर लादून त्यांना प्रकट स्वरूप देण्याच्या प्रवृत्तीच्या ती पुढचीच पायरी होती. कारण, त्या भावना माणसाच्या आहेत एवढें उघडपणें सांगण्यापुरता निर्भय प्रामाणिकपणा तरी त्यांत व्यक्त होऊं लागला होता.

" माधव जूलियनांचीं प्रेमगीतें आजच्या समाजांतील बुद्धिजीवी वर्गांतील घटकांच्या खऱ्याखुऱ्या प्रेमभावनेचीं प्रतिकें नसलीं, तरी त्यांच्या प्रेमकल्पनांचीं व प्रेमसंबंधविषयक सामाजिक अनुभवांचीं ती प्रतीकें आहेत यांत संशय नाहीं.

"तात्त्विक भूमिका, स्त्रीविषयक प्रेम, स्नेहसंबंध या तीनहि महत्त्वाच्या संबंधांत माधव जूलियन यांची कविता अधिक उदात्त व अधिक सुंदर स्वरूपांत उमटलेलें प्रतिबिंब आहे; आणि 'तुटलेले दुवे' या त्यांच्या सुनीतसंग्रहांत या प्रतिबिंबांतील वेगवेगळया अंगांच्या तपशिलाचा स्पष्टपणा व ठळकपणा प्रामुख्यानें दिसून येतो. स्वाभाविकच, माधव जूलियन् यांचें स्वतःचें व्यक्तिमत्त्व व कवि या नात्यानें वैशिष्ट्य, या दोनहि दृष्टींनीं 'तुटलेले दुवे' ही त्यांची प्रातिनिधिक कृति आहे, असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं.

"सुनीत या नवागत लेखनप्रकाराला अधिकांत अधिक प्रकटनक्षम व परिणामकारक करण्यासाठीं, माधव जूलियन् यांनीं सुनीतरचनेचे केलेले अनेक भिन्न भिन्न प्रयोग, या संग्रहांत अंतर्भूत झालेले आहेत. कवीचें मानसिक आत्मचरित्र त्यांत प्रकट झालेलें आहे. विशिष्ट कालखंडामधील समाजांतील प्रतिष्ठित प्रवृत्तीचा इतिहास त्यांत इतस्ततः विखुरलेला आहे.

मधुलहरी : पटवर्धन यांच्या मृत्यूनंतर एक वर्षानें हा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. यांत फित्झेरल्डच्या 'उमरखय्यामकृत रुबायांच्या' चौथ्या आवृत्तीचें भाषांतर व कांहीं अप्रसिद्ध कविता प्रसिद्ध करण्यांत आल्या आहेत. पटवर्धन अखेरच्या काळांत चिंतनशील व अंतर्मुख बनत चालले होते. एकेकाळीं जनसंमर्दाचे भुकेले असलेले पटवर्धन त्यापासून शक्य तितकें दूर राहूं लागले होते. या त्यांच्या बदललेल्या मनःप्रवृत्तीची दाट छाया त्यांच्या या संग्रहांतील कवितांवर पसरलेली दिसते.

छंदोरचना : पटवर्धनांचा हा ग्रंथ एक प्रकारें कळसग्रंथच आहे. त्यांची चिकित्सक बुद्धी, सूक्ष्म अभ्यासू वृत्ती, त्यांचें सृजनशील पांडित्य हीं यांत कळसाला पोंचलेलीं आढळतात. त्यांचा लौकिकहि याच ग्रंथानें कळसाला पोंचला. या ग्रंथाच्या विषयाच्या अभ्यासाकडे आपली प्रवृत्ति कशी वळली व हा ग्रंथ कसा निर्माण झाला याची माहिती स्वतःच पटवर्धनांनी ग्रंथारंभींच्या सिंहावलोकनांत पुढीलप्रमाणें दिली आहेः "२०–२१ वर्षांपूर्वी बी. ए. ची परीक्षा आटोपल्यावर पुढील अभ्यासासाठीं म्हणून मी स्वकष्टानें फार्सी

छन्दःशास्त्राचा अभ्यास आरंभिला. छन्दःशास्त्राशीं असा हा माझा पहिलाच परिचय होता. तत्पूर्वीं मी पद्यरचना केली होती पण छन्दःशास्त्राकडे ढुंकूनहि पाहिलें नव्हतें. फार्सी छन्दःशास्त्र म्हणजे निष्कारण कठिण करून ठेविलेला एक विषय आहे. मी प्रत्येक वृत्ताचे चार चार चरण तोंडपाठ करावे, पुनः पुन्हा म्हणून त्यांना कांहीं तरी एक गोड पण साधी चाल लावावी. आणि दोन वृत्तांतील साम्यभेद ओळखण्याइतका कान सुसंस्कृत झाल्यावर अंधुकपणें प्रतीत होणारा हा साम्यभेद पृथक्करण आणि तुलना करून स्पष्ट दृग्गोचर करून घेण्याचा प्रयत्न करावा. अशा रीतीनें अभ्यास करीत असतांना फार्सी छन्दःशास्त्रांतील कित्येक दोष उघडकीस आले. परंतु त्या शास्त्राची मी म्हणजे एका परकीयानें केलेली पुनर्घटना ही इराणांतील लोकांना मान्य होण्याचा संभव नसल्यानें त्या दिशेनें इंग्रजींत एक पुस्तिका लिहिण्यापलीकडे कांहीं प्रयत्न केला नाहीं.

"परंतु हा अभ्यास करितांना पृथक्करण आणि तुलना करून शोध करण्याची जी संवय मला लागली ती फार हितकर ठरली. मराठी पद्यरचना मी अनेक वर्षांपासून करीत असल्यानें माझें लक्ष जातींकडे म्हणजे मात्रा-वृत्तांकडे वळलें. विविध जातींत रचना प्राचीन काळापासून होत आली होती; पण दिण्डी, साकी इत्यादि चार पांच प्रकारांपलीकडे छन्दःशास्त्रकारांची दृष्टि गेलेली नव्हती. चरणांतील मात्रांची संख्या मोजण्यापलीकडे त्यांनी कांहींहि केलें नव्हतें. चरणाच्या अंतर्गत घटनेचा विचार केला पाहिजे, दोन चरण सममात्रक असूनहि अन्तर्गत घटनाभेदामुळें भिन्न होऊं शकतात या गोष्टीचा कोणाला पत्ता लागलेला नव्हता. मी या जातिरचनेचा अभ्यास आरंभिला आणि ख्रिस्त शके १९२२ जानेवारी ८ या दिवशीं पुणें येथील शारदामंदिरांत 'नवीन चलनी वृत्तें' या विषयावर एक निबंध वाचला. तो नंतर मी विविधज्ञानविस्तार मासिकाकडे पाठविला असतां संपादकांनीं त्याला स्थान देऊन मला उत्तेजन दिलें. ज्ञानकोशकारांनीहि हा लेख आपल्या ज्ञानकोशांत समाविष्ट करून माझा एकप्रकारें गौरवच केला. पुढें छंदांचाहि मी थोडा अभ्यास केला आणि डॉ. केतकर यांच्या अध्यक्षतेखालीं पुणें येथें (१९२७) भरलेल्या शारदोपासक संमेलनांत छंदावर एक

निबंध वाचला, तोहि अध्यक्षांना मनोरंजक आणि उत्तेजनार्ह वाटला. परंतु ग्रंथनिर्मितीच्या दृष्टीनें खरें उत्तेजन अकल्पितपणें निराळ्याच ठिकाणाहून मिळालें. फर्ग्युसन कॉलेजांतील संस्कृत विषयाचे प्राध्यापक डॉ. वासुदेव गोपाळ परांजपे यांनीं आर्यसंस्कृति मुद्रणालय नुकतेंच स्थापिलें होतें. आणि त्या मुद्रणालयांतून गंभीर विषयांवरील पुस्तकें त्यांना प्रकाशित करावयाचीं होतीं. मी असें एखादें पुस्तक लिहून देऊं शकेन का म्हणून त्यांनीं प्रश्न टाकितांच मी छंदःशास्त्रांतील जातिविचार हा विषय चालेल का म्हणून उलट प्रश्न केला. त्यांच्याकडून होकारार्थी उत्तर तत्काळ येतांच मी कार्याला आरंभ केला. पुस्तक इतर दृष्टींनीहि विद्यार्थ्यांच्या आणि कर्त्यांच्या उपयोगीं पडावें म्हणून त्यांत वृत्तविचारहि समाविष्ट केला, अरबी फार्सी वृत्तेंहि घालण्यांत आलीं आणि शेवटीं, ज्याचा छन्दःशास्त्राशीं कांहीं संबंध नाहीं पण काव्याशीं आहे अशा ' पद्याची भाषा ' या विषयाचीहि चर्चा करण्यांत आली. एक वर्षाच्या अवधींत पुस्तक लिहून छापून होऊन तें खिस्त शके १९२७ मध्यें प्रकाशित झालें! प्रकाशनाचें आश्वासन न मिळतें तर ही ग्रंथनिर्मिति न होती.

" पण या ग्रंथांत अनेक उणीवा राहून गेल्या होत्या. प्राकृत पैङ्गलाचा उपयोग करून घेण्यांत आला असला तरी प्राचीन संस्कृत छन्दःशास्त्रकारांनी वृत्तांची चर्चा कशी केली आहे आणि संस्कृत कवींनी त्यांची संभावना कशी केली आहे याचा विचार करण्यांत आलेला नव्हता. पुन्हा जाति आणि छंद यांत आढळणारी आवर्तनात्मकता वृत्तांत कोठें आणि कशी आढळते याचाहि शोध घेण्यांत आला नव्हता. म्हणून छंदोरचना प्रकाशित झाल्यानंतर २-३ वर्षांनींच मी पुन्हा या विषयाचा अभ्यास आरंभिला. भरत पिङ्गलादि संस्कृत छंदःशास्त्रकारांचे ग्रंथ अभ्यासून आणि संस्कृत नि मराठी प्राचीन-अर्वाचीन वाङ्मय डोळ्यांखालीं घालून, पुष्कळच नवीन सामग्री मिळवून, जुळवून आतां ( १९३७ ) छंदोरचना हा ग्रंथ अथपासून इतिपर्यंत नवीनच लिहून काढलेला आहे.

" पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय हें साधें तत्त्व जें पूर्वीच्या छंदःशास्त्रकारांना सांपडलें नाहीं आणि एका आधुनिकाला अगदीं पुसट-पुसटच दिसलें तें मला परिश्रमांतीं हळू हळू स्पष्ट होत गेलें. या

तत्त्वाप्रमाणें, पद्यरचना ही वृत्तस्वरूप असो, वा जातिस्वरूप असो, वा छन्दस्वरूप असो, ती कशी सम, अर्धसम आणि विषम असूं शकते हें या ग्रंथांत विस्तारानें दाखविलेलें आहे. छन्दःशास्त्राची कांहींतरी व्यापक आणि पायाशुद्ध घटना आतां निश्चित केलेली आहे. अश्वघोषापासून जगन्नाथरायापर्यंतचे संस्कृत आणि अद्ययावत् मराठी प्रसिद्ध अप्रसिद्ध कवि यांचा योग्य तो परामर्श घेण्यांत आला आहे. ”

गेल्या दीड हजार वर्षांत छंदःशास्त्रविषयक जे ग्रंथ झाले त्यांहून वेगळें असें आपल्या ग्रंथाचें कसें स्वरूप आहे, हें त्यानीं ग्रंथाचे शेवटीं छंदःशास्त्राचा इतिहास सांगतांना उत्तमरितीनें थोडक्यांत पुढीलप्रमाणें दिग्दर्शिलें आहे. छन्दःशास्त्राचा गेल्या १५०० हून अधिक वर्षांचा इतिहास पाहिला कीं एक प्रकारचें असमाधानच वाटतें. पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय या मूलभूत सिद्धान्ताच्या जवळ येऊन छन्दःशास्त्रकार पुन्हा रुळलेल्या मार्गानें जातात. छन्दःशास्त्राची पुनर्घटना करण्याचा प्रयत्न कोणी करित नाहीं. कोणी थोडीं वृत्तें देतो, कोणी पुष्कळ वृत्तें देतो. लक्षण सांगण्याची कोणी त्रिकावलंबी पद्धत घेतो तर कोणी विशिष्ट परिभाषा निर्माण करून त्या भाषेनें सांगतो, या पलीकडे त्याच्या कृतींत भेद नाहीं. कोणी दुसऱ्यांनी रचिलेलीं उदाहरणें देतात, कोणी स्वतः रचून तीं घालतात. पण वाङ्मयाचें मंथन करून छन्दःप्रकार कसे परिणत होत आले याचें विवेचन कोणी करीत नाहीं. आधार देण्याची बुद्धि तर कोणालाच होत नाहीं. ज्या सामग्रीवरून एखादा सिद्धांत ठरवायचा वा दुसऱ्याचा सिद्धांत पारखायचा तीच पुढें नसल्यानें त्या सिद्धांताची चर्चा होऊं शकत नाहीं.

“ प्रस्तुत ग्रंथानें वर दाखविलेल्या उणीवा दूर करण्याचा प्रयत्न केलेला आहे. पद्यरचना ही वृत्त जातिछन्दःस्वरूप अशी त्रिविध आहे हें मी शोधून विस्तारानें दाखवून दिलें आहे, आणि पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय हा छन्दोलंकारकारास प्रथम सांपडलेला पण मलाहि स्वतंत्रपणें सुचलेला सिद्धांत मी सर्वत्र लावून दाखविला आहे. यासाठीं पद्याचे पद्यावर्तनी, अग्न्यावर्तनी, भृङ्गावर्तनी, आणि हरावर्तनी असे चार भेद कल्पिण्यांत आले आहेत. वृत्तप्रकरणीं प्राचीन छन्दःशास्त्रकारांनीं दिलेल्या वृत्तांचा आणि

लक्षणसूत्रांचा या ग्रंथांत समावेश आणि उल्लेख केलेला असून त्यांचें वर्गीकरण प्राचीन पद्धतीनें केलेलें आहे. नांवांचा माजलेला घोटाळा जवळ जवळ नाहींसा केला असून वाङ्मयाचें मंथन करून वृत्तांचीं प्राचीन आणि दुर्मिळ अशीं उदाहरणें दाखवून दिलीं आहेत. या मंथनांत जीं वृत्तें नामनिर्देशानें प्रसिद्ध नव्हतीं पण प्रयोगरूपानें आढळलीं त्यांचा पूर्ण परामर्श घेतला आहे."

या ग्रंथाची रचना निर्दोष व्हावी यासाठीं पटवर्धनांनीं अलोट परिश्रम केले. छंदःशास्त्रावरील संस्कृत, प्राकृत, मराठी भाषांतील एकूण एक उपलब्ध ग्रंथ त्यांनीं सूक्ष्मपणें वाचून काढले, त्याचप्रमाणें सर्व मराठी काव्यग्रंथ छंदःशास्त्राच्या दृष्टीनें नजरेखालून घातले. या वाचनाचा 'अर्वाचीन मराठी काव्याचा इतिहास' लिहिण्याकडे उपयोग करण्याचें त्यांच्या फार मनांत येई. आणि 'रस व अलंकार' यांच्या अभ्यासाकडे ते न वळते तर हेंहि काम त्यानीं आपल्या नेहमींच्या धडाडीनें पुरें केलें असतें. समकालिनांसंबंधीं प्रांजळपणें मत व्यक्त करणें पुष्कळदां तापदायक होत असल्याचे कांहीं अनुभव आल्यामुळेंहि हा काव्येतिहास लिहिण्याचा विचार मूळ धरूं शकला नाहीं.

प द्य प्र का श : प्राथमिक व दुय्यम शाळांतील विद्यार्थ्यांसाठीं वृत्त, अलंकार वगैरेंची थोडक्यांत माहिती यांत दिली आहे.

भा षा शु द्धि वि वे क : कांहीं वर्षांपूर्वीं 'भाषाशुद्धि' संबंधींचें एक जोराचें आंदोलन होऊन गेलें. या आंदोलनाचे प्रमुख जनक वीर विनायकराव सावरकर व डॉ. माधवराव पटवर्धन हे होते. जवळ जवळ एक तप या दोघांनींहि खूप चळवळ उडवून दिली. वीर सावरकरांचा मुख्य रोख मराठींत घर करून बसलेल्या अरबी–फार्सी शब्दांविरुद्ध होता तर माधवरावांना मराठी भाषेंत कोणताहि अ-मराठी शब्द नको होता. सावरकरांहून आपली भूमिका पुढील-प्रमाणें भिन्न असल्याचें ते सांगत, " सावरकर यांची चळवळ हिंदुसंघटने-साठीं हिंदुधर्माभिमानावर उभारलेली आहे; आणि ते त्या चळवळीला मराठी भाषेचें शुद्धीकरण म्हणतात. माझी खटपट स्वत्वसंरक्षणासाठीं असून ती स्वभाषाभिमानावर उभारलेली आहे; म्हणून मी माझ्या उद्योगाला स्वकीयांचा

पुरस्कार आणि उद्धार म्हणतों. भाषांचे हिंदु आणि अहिंदु असे वर्ग मी करीत नाहीं, तर मराठी आणि अमराठी असे दोन वर्ग कल्पितों. मला 'मुसुल्मानी शब्दांची घाण' येत नाहीं......मला सर्वच विदेशी शब्दांचा स्वीकार हा प्राणघातक वाटतो......मराठी भाषेचें स्वरूप......केवळ हिंदूंनींच ठरवावयाचें नाहीं......इतर धर्मांतील व प्रांतांतील लोकांना मराठीला मातृभाषा मानून, तिच्याविषयीं स्वाभिमान ममत्व बाळगून, तिची सेवा करायला यत्किंचित् आडकाठी नाहीं."

वरील भूमिका स्वीकारून माधवरावांनीं जो स्वभाषाविषयक उद्योग आरंभिला होता त्याचें स्वरूप हा ग्रंथ दाखवितो. यांत त्यांचे भाषाशुद्धिविषयक लेख व व्याख्यानें मिळून अकरा विषय आले आहेत. त्याशिवाय भाषाशुद्धीला अनुकूल असलेल्या मंडळींना बहिष्कृत शब्दांच्या जागीं शुद्ध शब्दांची योजना करण्यास मदत व्हावी या हेतूनें पर्याय शब्दांसह सुमारें १२०० बहिष्कार्य शब्दांचा कोश जोडला आहे.

सार्वजनिक चळवळींपासून नेहमींच दूर राहणारे माधवराव, भाषाविषयक जागृतीचें शिंग फुंकल्यापासून, भाषाशुद्धीचे कडवे प्रचारक बनून आपल्या लेखणीप्रमाणेंच वाणीचाहि उपयोग करूं लागले. मराठी समाज जेथें जेथें असेल तेथें तेथें व्याख्यान देण्याची आलेली संधि त्यांनी न गमवितां या विषयाच्या प्रचारार्थ कामीं आणली. काव्यकलेइतकीच त्यांच्यांतील वक्तृत्व-कलाहि मोहिनी घालणारी होती. विद्वत्त्व, तर्कशुद्धता, प्रतिष्ठित वादकुशलता व ठांशीवपणा हे त्यांच्या वक्तृत्वाचे विशेष होते. या गुणांच्या जोरावर त्यांनीं आपल्या चळवळीकडे सहानुभुतीचा ओघ बऱ्याच मोठ्या प्रमाणांत वळवून घेतला. तत्त्वाबद्दल मतभिन्नता असतांहि, त्यांच्यांतील स्वभावविषयक तळमळ पाहून, त्यांच्या चळवळीबद्दल पुष्कळांना सहानुभूती व आदर वाटे. त्यांचे सर्वच विचार सर्वांना पटण्यासारखे नसले तरी त्यांच्या स्वभाषाविषयक आकांक्षा विचार करण्यासारख्या व आचारांत आणण्यासारख्या खास वाटत.

**संकीर्ण लेख :** पटवर्धनांचें बरेंचसें गद्य लेखन कवि, काव्यशास्त्र, लेखन-सुधारणा, लिपीसुधारणा, भाषाशुद्धी यांवरच विशेष आहे. केशवसुत, चंद्रशे-

खर, तांबे, दत्त, बालकवि ठोमरे यांवरील त्यांचे लेख; त्याचप्रमाणें ' काव्य-चिकित्सा' या सदराखालीं, केशवसुत, यशवंत, गिरीश, टिळक, तांबे, मायदेव, केशवकुमार, दत्त, अज्ञातवासी यांच्या एकेका लोकप्रिय कवितेची केलेली चिकित्सा; 'कांहींतरी' 'झेंडूची फुलें,' 'सुकलेलें फूल,' 'चांदरात,' 'शिशिरागम,' यावरील परीक्षणात्मक लेख विशेष महत्वाचे आहेत. या लेखांत त्यांच्यांतील व्यासंगशीलता, निःपक्षपातीपणा, सत्यान्वेषण व सहानुभूति हे त्यांचे वाङ्मयीन गुणविशेष उत्कटत्वानें प्रगट झालेले आहेत. त्यांच्या कवितेच्या भाषेंतील लालित्य या त्यांच्या गद्यलेखनांत दिसत नसलें तरी विचारांचें नाविन्य व पृथगात्मत्व, त्याचप्रमाणें ओज व रेंखीवपणा ठायीं ठायीं आढळून येतात. या संकीर्ण लेखांपैकीं कांहीं लेख ' काव्यविहार ' या नांवानें त्यांचे पश्चात् प्रसिद्ध करण्यांत आले.

**वाङ्मय :**

(१) छन्दोरचना; प्रथमावृत्ती १९२७; द्वि. आ. १९३७, कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई.

(२) फार्शी–मराठी कोश, १९२५; भारत इतिहास संशोधक मंडळ स्वीय ग्रंथमाला, पुणें.

(३) विरहतरंग, [ सामाजिक खंड काव्य ], १९२६;१९३३; आर्यसंस्कृति, पुणें.

(४) सुधारक, [ सामाजिक, उपरोधगर्भ काव्य ], १९२८, आर्यसंस्कृति, पुणें.

(५) गज्जलाञ्जलि, [ गज्जलसंग्रह ], १९३३; आर्यसंस्कृति, पुणें.

(६) स्वप्नरंजन [ स्फुट कवितासंग्रह ], १९३४; आर्यसंस्कृति, पुणें.

(७) मधुलहरी [स्फुट कवितासंग्रह] १९४०; व्हीनस बुक स्टॉल, पुणें.

(८) उमरखय्यामकृत रुबाया; [ उमरखय्यामच्या मूळ रुबायांचें समवृत्त भाषांतर ], १९२९, आर्यसंस्कृति, पुणें.

(९) द्राक्षकन्या [ Edward Fitggerald कृत Rubaiyat of Omar Khayyam चें भाषांतर ], १९३१; आर्यसंस्कृति; पुणें.

(१०) भाषाशुद्धिविवेक, १९३८; आर्यसंस्कृति; पुणें.
(११) तुटलेले दुवे; ( सुनीतसंग्रह ); १९३८; पुणें.
(१२) नकुलालङ्कार; ( उपरोधगर्भकाव्य ); १९३९; पुणें.
(१३) पद्यप्रकाश; १९३८; कर्नाटक पब्लिशिंग हाउस; मुंबई.
(१४) काव्यविहार; [ दोन काव्यविषयक व्याख्यानें, कवि व कविता यांवरील चर्चात्मक लेख यांचा संग्रह ] १९४७; मनोहर ग्रंथमाला पुणें.
संपादन : तांबे यांची कविता.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

१ आमचीं अकरा वर्षें, १९४५; लीलाबाई पटवर्धन; प्र. य. गो. जोशी, पुणें.

विरहतरंग :

१ परीक्षण, वि. स. खांडेकर; रणगर्जना १८ आक्टोबर १९२६
२ पुस्तकपरिचय, गो. रा. हिंगणेकर, ज्ञानप्रकाश, १९२६
३ परीक्षण, प्रो. वा. म. जोशी, विविधज्ञानविस्तार १९२७
४ 'माधव जूलियनचें प्रेमचित्र,' लेखांक १, डॉ. श्री. व्यं. केतकर, विद्यासेवक, जून १९२८
५ परीक्षण, बा. अ. भिडे; रत्नाकर, मार्च १९२७
६ समीक्षण, डॉ. रा. ग. हर्षे; लोकशिक्षण, फेब्रु-मार्च १९४०
७ एका अनामिकाचें पत्र, लोकशिक्षण, फेब्रु-मार्च १९४०
८ विरहतरंगावरील विचारतरंग, प्रो. रा. श्री. जोग, ज्योत्स्ना, मे १९४०
९ विरहतरंगांतील विरह, मानसशास्त्रीय चर्चा; ना. मा. सन्त; सत्यकथा, डिसेंबर १९४५
१० विरहतरंगांतील नायिकेचें गूढ; रा. व्यं. जोशी; सत्यकथा, मे १९४६
११ मेघदूत आणि विरहतरंग, प्रो. रा. श्री. जोग; धनुर्धारी, दिवाळी अंक १९४५
१२ परीक्षणात्मक लेख, प्रो. शं. के. कानेटकर, काव्यकला.

१२ डॉ. माधवराव पटवर्धन यांचें 'विरहतरंग,' रसग्रहण, प्रतिभा (औरंगाबाद); एम. रघुनाथ; डिसेंबर, १९४७

सुधारक

१ परीक्षण, बा. अ. भिडे; विविधज्ञानविस्तार, जून, जुलै, आगष्ट, सप्टेंबर १९२८

२ माधवजूलियनचें प्रेमचित्र, लेखांक २; डॉ. श्री. व्यं. केतकर, विद्यासेवक, जून १९२८

३ समीक्षण, गं. भा. निरंतर; लोकशिक्षण, फेब्रु-मार्च १९४०

४ परीक्षण, ग. त्र्यं. माडखोलकर, वाङ्मयविलास, पृ. ५५-७५

५ परीक्षण, केसरी, ३ एप्रील १९२८

६ परीक्षण, प्रो. द. सी. पंगु, मासिक मनोरंजन,

द्राक्षकन्या

१ परीक्षण; प्रा. श्री. के. क्षीरसागर, लोकशिक्षण, मे १९३२

२ ,, ; अ. ज. करंदीकर, लोकशिक्षण, फेब्रु-मार्च १९४०

गज्जलांजलि

१ समीक्षण, के. ग. उमराणी; लोकशिक्षण, फेब्रु-मार्च १९४०

स्वप्नरंजन

१ परीक्षण, नी. म. केळकर, प्रतिभा, १५ फेब्रुवारी १९३५

२ ,, , प्रो. रा. श्री. जोग, सह्याद्रि, एप्रिल १९३५

३ ,, , प्रो. भ. श्री. पंडित; विहंगम, मे, १९३५

४ ,, , डॉ. रा. चिं. श्रीखंडे; लोकशिक्षण, डिसेंबर १९३५

५ (डॉ. श्रीखंडे यांच्या वरील लेखाबाबत); उत्तर नव्हे थोडें स्पष्टीकरण, प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन, लोकशिक्षण, जाने-फेब्रुवारी १९३६

६ (डॉ. श्रीखंडे यांचें प्रो. पटवर्धनांच्या लेखाला उद्देशून); पुनश्च थोडें; डॉ. रा. चिं. श्रीखंडे, लोकशिक्षण, मार्च १९३६

७ परिचय, रा. रा. नातू, सहविचार द्वैमासिक; डिसेंबर १९३५; वर्ष १४ अंक ३

तुटलेले दुवे

१ परीक्षण, ना. ग. जोशी; महाराष्ट्रसाहित्यपत्रिका, वर्ष १२, अं. ४.
२ परीक्षण, के. ना. काळे, सह्याद्रि, मार्च १९३९
३ परिचय, के. ना. काळे; लोकशिक्षण, फेब्रु–मार्च १९४०

नकुलालंकार

१ परीक्षण, ना. ग. जोशी; महाराष्ट्र साहित्यपत्रिका, वर्ष १२, अंक ६
२ समीक्षण, वि. अ. कुळकर्णी; लोकशिक्षण, फेब्रु–मार्च १९४०
३ 'नकुलालंकार' आणि आर्याछंद, चर्चा; य. ग. फफे; सह्याद्रि, एप्रिल १९४०

मधुलहरी

१ परीक्षण, ना. ग. जोशी; महाराष्ट्रसाहित्य पत्रिका, वर्ष १२, अं. ६.

फार्शी–मराठी कोश

१ समीक्षण, ग. ह. खरे, लोकशिक्षण, फेब्रु–मार्च, १९४०

छंदोरचना

१ समालोचन, न. चिं. केळकर; सह्याद्रि, जानेवारी १९३७
२ परीक्षण, ग. रा. हवालदार; विविधज्ञानविस्तार, डिसेंबर १९३७
३ ,, , ना. ग. जोशी; महाराष्ट्रसाहित्यपत्रिका, वर्ष ११, अंक ४
४ छंदोरचनेंतील स्वकृत पद्यें, रसग्रहण; गो. ग. तळवलकर; सह्याद्रि, आक्टोबर १९३७
५ समालोचन, बाळाचार्य खुपेरकर; लोकशिक्षण, एप्रिल १९३९
६ छंदोरचनेचें समर्थन, [ खुपेरकरांना उत्तर ], प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन; लोकशिक्षण, जुलै १९३९
७ [ खुपेरकरांचें प्रत्युत्तर ], समर्थनसमीक्षा, बाळाचार्य खुपेरकर; लोकशिक्षण, सप्टेंबर १९३९
८ समीक्षण, प्रो. के. ना. वाटवे; लोकशिक्षण, फेब्रु–मार्च १९४०
९ परीक्षण, ( प्रथमावृत्तीचें ), बा. अ. भिडे, रत्नाकर, जुलै १९२८

भा षा शु द्धि

१ खरी भाषाशुद्धि व तिचे खरे वैरी : अर्थात् सावरकर, पटवर्धन; श्री. के. क्षीरसागर; सह्याद्रि, फेब्रु–मार्च १९३६
२ भाषाशुद्धीकरणांतील तारतम्य, न. चिं. केळकर; सह्याद्रि, जानेवारी १९३७
३ तारतम्यांतील तारतम्य, न. चिं. केळकर; सह्याद्रि, एप्रिल १९३८
४ सिंहाचें कातडें पांघरलेलें गाढव अर्थात शब्दशुद्धि कीं भाषाशुद्धि ? ना. वि. चौकर; सह्याद्रि, आगष्ट १९३८
५ शब्दशुद्धि कीं भाषाशुद्धि ?—ना. वि. चौकर, सह्याद्रि, डिसेंबर १९३८
६ आमचा साहित्यसंसार [भाषाशुद्धीवरील प्रो. बनहट्टी यांच्या 'विहंगम' मासिकांतील लेखाला उत्तर ]; लोकशिक्षण, आक्टोबर १९३७
७ माधवरावांची भाषाशुद्धि, प्रो. द. वा. पोतदार, लोकशिक्षण, फेब्रु–मार्च १९४०
८ भाषाशुद्धिविवेवक आणि माधवराव, प्रा. न. रा. पारसनीस; ज्योत्स्ना, मे १९४०

मा ध व जू लि य न यांची क वि ता

१ कवि माधव जूलियन यांची कविता; गो. गं. तळवलकर; सप्टेंबर १९२९
२ माधवरावांची काव्यसृष्टि, प्रो. द. के. केळकर, ज्योत्स्ना, मे १९४०
३ कविवर्य माधव जूलियन, प्रो. रा. श्री. जोग, सह्याद्रि; मे १९४०
४ माधव जूलियन्, प्रो. रा. श्री. जोग; 'अर्वाचीन मराठी काव्य', पृष्ठें १७६–१९५; प्र. नवभारत प्रकाशनसंस्था, मुंबई.

सं की र्ण

१ डॉ. माधवराव पटवर्धन–सामाजिक टीकाकार; प्रो. मा. दा. अळतेकर; ज्योत्स्ना, मे १९४०
२ प्रेम आणि माधवराव, विठ्ठलराव घाटे; ज्योत्स्ना, मे १९४०
३ एक क्रांतिकारक कवि माधव जूलियन्; ना. म. भिडे, ज्योत्स्ना, मे १९४०

४ माधवराव : काव्य आणि जीवन; वि. स. खांडेकर; ज्योत्स्ना, मे १९४०
५ माधवरावांचीं प्रेमगीतें; गं. भा. निरंतर; ज्योत्स्ना, मे १९४०
६ थोडक्यांत माधव जूलियन; श्री. यशवंत, ज्योत्स्ना, मे १९४०
७ जळगांव संमेलनाचे अध्यक्ष प्रो. माधवराव पटवर्धन; ग. त्र्यं. माडखोलकर; ज्योत्स्ना, नोव्हेंबर १९३६
८ जीविताशीं समरस होणारा कवि, माधव जूलियन; प्रो, शं. के. कानेटकर, नोव्हेंबर १९३६
९ मी व माझे टीकाकार, प्रो. माधवराव पटवर्धन; ज्योत्स्ना, एप्रिल १९३७
१० पटवर्धन व त्यांचे कांहीं टीकाकार, डॉ. रा. चिं. श्रीखंडे; ज्योत्स्ना, मे १९३७
११ मराठीचे पहिले 'डी. लिट्' प्रो. माधवराव पटवर्धन; वि. वा. पत्की, मनोहर, फेब्रुवारी १९३९
१२ माधव जूलियन यांची स्त्रीसृष्टि; सौ. मुक्ताबाई दीक्षित; लोकशिक्षण, फेब्रु-मार्च १९४०
१३ गद्यलेखक व टीकाकार पटवर्धन; प्रो. कृ. पां. कुळकर्णी; लोकशिक्षण, फेब्रु-मार्च १९४०
१४ माधव जूलियन् : नांवाचें कूळ व कवितांचें मूळ; गंगाधरराव खानोलकर; सह्याद्रि, जानेवारी, १९४०
१५ माधव जूलियन् आणि मुलें; प्रो. श्री. बा. रानडे; सह्याद्रि, जानेवारी १९४०
१६ माधव जूलियन् यांच्या स्त्रीजातीविषयीं भावना; सौ. शालिनीबाई रानडे, सह्याद्रि, जानेवारी, १९४०
१७ माधव जूलियन् आणि गूढवाद; प्रा. गं. भा. निरंतर; प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७
१८ माधवराव पटवर्धनांची पृथगात्मता; यशवंत कानिटकर; प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७

आठवणी, व्यक्तिचित्र

१ प्रो. माधवराव पटवर्धन; श्री. के. क्षीरसागर; लोकशिक्षण, आक्टोबर १९३६

२ माधवराव पटवर्धन, मा. के. काटदरे; ज्योत्स्ना, मे १९४०

३ माधवरावांच्या आठवणी; ज्योत्स्ना, मे १९४०

४ माझी स्मृति-सुमनांजली; लीलाबाई पटवर्धन, सह्याद्रि, जानेवारी १९४०

५ माझा बालमित्र गेला! वि. द. घाटे, सह्याद्रि, जानेवारी १९४०

६ गुरुवर्य डॉ. माधवराव पटवर्धन; गोपीनाथ तळवलकर, सह्याद्रि, जानेवारी १९४०

७ कांहीं आठवणी; सौ. वत्सलाबाई घाटे; सह्याद्रि, जानेवारी १९४०

८ सर्वां खल्विदं माया! प्रो. शं. के. कानेटकर; सह्याद्रि, जानेवारी १९४०

९ माधवराव–प्रेम आणि मरण; श्री. के. क्षीरसागर; सह्याद्रि, जानेवारी १९४०

१० डॉ. पटवर्धन यांचे तीन विशेष; ग. त्र्यं. माडखोलकर, सह्याद्रि, जानेवारी १९४०

११ डॉ. पटवर्धन यांचें कोल्हापुरांतील जीवन; प्रो. द. सी. पंगु; सह्याद्रि, जानेवारी १९४०

१२ आणखी कांहीं आठवणी; लीलाबाई पटवर्धन; रोहिणी, आगष्ट १९४७

**पठ्ठे बापूराव** [ १८६८–१९४६ ] तमाशाचार्य; जुनी परंपरा निष्ठेनें चालविणारे लावणीकार. यांचें संपूर्ण नांव श्रीधर कृष्णाजी कुळकर्णी. यांचा जन्म सातारा जिल्ह्यांतील हरणाक्ष रेठरें या गांवीं झाला. बालवयापासूनच यांना कवनें रचण्याचा नाद लागला. बायका जात्यावर गाऊं लागल्या कीं या बालकवीनें त्याच चालींवर सुंदर गीतें स्त्रियांना रचून द्यावीत व स्त्रियांनींहि तीं आनंदानें गात जावीं गुणी माणसास कालयोगेंकरून प्रोत्साहन मिळतेंच. त्यास अनुसरून श्रीमंत औंधचे महाराज यांनीं श्रीधरास आपल्याकडे शिक्षणास बोलावून ठेवून घेतलें. पुढें श्रीमंत सौभाग्यवती राणीसाहेब यांनीं या मुलास

आपणाबरोबर बडोद्यास नेलें. बुद्धि तल्लख असल्यानें हा मुलगा मराठी सहावी (हल्लींची सातवी) व इंग्लिश सहावी इतकें शिकला आणि आपल्या गावीं येऊन आपलें वतनदारी कुळकर्णीपणाचें काम करूं लागला. हें काम चोखपणें त्यानीं १५-१६ वर्षें केलें. जोशीपणाचेंहि काम त्यांच्याकडे असल्यानें तेंहि त्यानीं कांहीं वर्षें केलें. रेठऱ्यास महार मंडळी लावण्या म्हणण्यांत पटाइत होती. श्रीधरपंत रोज लावण्या ऐकण्यास जात व चाली ऐकून गुंग होत. परंतु लावणींतील शब्द त्यांना गोड वाटेनात, म्हणून ते त्यांना स्वतः चांगलीं पदें रचून देऊं लागले. महारमंडळीसुद्धां त्यांचें कवन पाठ करून गांवोगांवीं जाऊन गाऊं लागली आणि वाहवा मिळवूं लागली. बापूरावजी लावणी करीत तिच्या शेवटच्या चरणास ‘कवि बापूराव कुळकर्णी’ हे शब्द असत. कवि बापूरावांचें नांव तमाशाच्या क्षेत्रांत चमकूं लागतांच तमासगीर मंडळींत मत्सर उत्पन्न होऊं लागला. एकदां रेठरें गांवचे महार बापूरावांची लावणी गात असतां प्रतिस्पर्धी मंडळीनी, ‘तुमच्या गुरूला पुढं घेऊन या. तुमच्या गुरूनं स्वतः लावणी म्हटली पाहिजे’ असा आग्रह धरून त्यानीं अडवणूक केली. त्यावेळीं बापूरावांनींहि पुढें होऊन लावणी स्वतः गाऊन प्रतिस्पर्ध्यावर मात केली. ते अशा रीतीनें तमाशाच्या पीठावर चढले ते कायमचेच चढले. यावेळेस त्यांचें वय तेवीस वर्षांचें होतें.

तमासगिरांच्या अंगीं वास्तविक प्रेक्षकांची उत्कृष्ट करमणूक करण्याजोगे गुण असले म्हणजे झालें. परंतु एवढ्यानें त्यांचें समाधान होत नाहीं. एकमेकांचा पाडाव करण्यासाठीं व प्रश्नोत्तरांचीं कोडीं घालून प्रतिस्पर्ध्याला निरुत्तर करण्यासाठीं त्यांची सारखी धडपड चालू असते. कोणी शिवाची बाजू घेतो, तर कुणी शक्तीची बाजू घेतो. यालाच ब्रह्म-माया, पुरुष-प्रकृति अगर कलगी-तुरा म्हणतात. या उद्योगासाठीं तमासगिरांना आपल्या ताफ्यामध्यें शीघ्र कवन करणारा कवि सांभाळावा लागतो व त्यालाच ते गुरु म्हणतात. बापूराव स्वतःच कवि व गायक असल्यानें त्यानीं अशा सामन्यांत कोणासहि पुढें उभें राहूं दिलें नाहीं. त्यानीं कैक पैजा जिंकून जरीपटके, चांदीचे तोडे—इतकेंच काय, पण प्रतिस्पर्ध्यांच्या ताफ्यांतील पणास लावलेल्या नाचणाऱ्या नामवंत पवळी आणि चंद्रावळी या दोन बाया मिळविल्या.

तमाशांतील प्रश्नोत्तरांच्या लावण्या बहुधा ब्रह्म–माया अशा विषयांवर पौराणिक ग्रंथाधारें रचलेल्या असतात. त्यांना भेदीक लावण्या म्हणतात. बापूरावांनीं अशा तऱ्हेच्या लिहिलेल्या लावण्यांचा संग्रह बराच मोठा आहे. ते स्वतःच म्हणतातः—"दोन लक्ष आम्ही केली लावणी, केवढी म्हणावी मात बडी। दुसरें रामायण, भारत बनलें, ग्रंथ रचिले अचल थडी॥" त्यांच्या कवितांमध्यें सहजप्रसवता, स्पष्टपणा, अनुप्रास, अर्थमाधुरी आणि अस्सल मराठी धाटणी हे गुण दिसतात.

बापुरावांनीं तमासगिरी करून अमाप पैसा मिळवला व खर्च केला. त्यांचे अखेरचे दिवस दैन्यांत गेले. त्यांचे चरित्रलेखक रा. नानिवडेकर हे त्यांस १९४२ सालीं भेटावयास गेले असतां, येरवड्यास अस्पृश्यांच्या घाणेरड्या वस्तींत एका पडक्या सडक्या खोपटांत ते राहत असलेले त्यांना आढळले. तमासगिरी करूं लागल्यापासून त्यांचा आपल्या घराशीं संबंध सुटला. त्यांना अस्पृश्याप्रमाणें लेखण्यांत येऊं लागलें.

**वाङ्मय :**

(१) पठ्ठे बापूराव यांच्या लावण्या व गवळणी—भाग पहिला; १९२८; संग्राहक, गो. गो. अधिकारी, हनुमानप्रेस, पुणें.

(२) पठ्ठे बापूराव यांच्या ढोलकीवरील दिलखूष लावण्या; १९४२; प्रकाशक, बी. एम. जिंतीकर, पुणें.

**पडवळ, तुकाराम तात्या** [ १८३१ — ३ जून १८९८ ] ब्रह्मविद्येचा उपासक; संतवाङ्मयाचा संपादक व प्रकाशक; मुंबईतील तत्त्वविवेचक छापखान्याचा संस्थापक. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील वडावरें या गांवीं झाला. मुळची अत्यंत गरीबी असल्यामुळें त्यानीं स्वकष्टानें मुंबईच्या रॉबर्ट मनी स्कूलमधून इंग्रजीचें शिक्षण घेतलें. विद्यार्थिदशेंत असतां त्यांची धर्मावरील श्रद्धा उडून ते नास्तिक बनूं लागले होते. शिक्षण संपल्यावर ते प्रथम मुंबई म्युनिसिपालिटींत नोकरीला लागले. परंतु 'जी हुजुर'वृत्ती नसल्यामुळें त्यांना नोकरीला लवकरच रामराम ठोकावा लागला. सत्यवादी व स्पष्टवक्ते असे हे होते. मिशनरी मंडळी त्यांना खिस्ती धर्माची दीक्षा देण्याच्या

चेतांत होती, इतक्यांत थिऑसॉफीचे प्रवर्तक कर्नल आल्कॉट यांची भेट घडून आली. त्यांचीं व्याख्यानें ऐकून हे थिऑसॉफिस्ट बनत चालले. १८८० चे सुमारास मॅडम ब्लॅव्हेट्स्की यांनीं त्यांना थिऑसॉफिकल सोसायटीचे सभासद करून घेतलें. सोसायटीचे ते एक मंत्री होते. थिऑसॉफिकल सोसायटीच्या प्रचारासाठीं यांनीं बेझंटबाईबरोबर पुष्कळ प्रवास केला. काशी येथें स्थापन झालेल्या हिंदु कॉलेजच्या आधारस्तंभांपैकीं ते एक होते. आपलें उर्वरीत आयुष्य काशींत ब्रह्मचिंतनांत घालविण्याचा त्यांचा विचार होता. ग्रंथ वाचून त्यांनीं आर्यवैद्यकाचा उत्तम अभ्यास केला होता. या विद्येचा उपयोग यांनीं गरीब-गुरीबांसाठीं केला. कोटांत एक दवाखाना उघडून, तेथें ते १०॥ ते १॥ पर्यंत बसत व मोफत औषधोपचार करीत. हजारो लोकांना त्यांनीं व्याधिमुक्त केलें. आर्यवैद्यकाप्रमाणेंच होमोपथी व क्रोमोपथी यांचा त्यांनीं चांगला अभ्यास केला होता. त्यांनीं संपादित केलेला 'तुकारामबावाचा गाथा' प्रसिद्ध आहे. आपल्या तत्त्वविवेचक छापखान्यांतून यांनीं अनेक पुस्तकें प्रसिद्ध केलीं. १८६१ सालीं यांनीं आपल्या दोन तीन मित्रांच्या सहाय्यानें 'जातिभेदविवेकसार' या नांवाचा ग्रंथ 'एक हिंदू' या नांवानें प्रसिद्ध केला. या पुस्तकाच्या दोन आवृत्त्या निघाल्या. पहिली आवृत्ति प्रसिद्ध प्रार्थनासमाजी वासुदेव बाबाजी नवरंगे यांनीं प्रसिद्ध केली असून दुसरी आवृत्ति सत्यशोधक जोतिराव फुले यांनीं प्रकाशित केली.

**वा ङ्म य :**

( १ ) श्रीएकनाथ महाराजांच्या अभंगांची गाथा; १९०३; तत्त्वविवेचक छापखाना; मुंबई.

( २ ) तुकारामबावा आणि त्यांचे शिष्य यांच्या अभंगाची गाथा. भाग १ ला, १८८९, भाग २ रा, १८८९; सुबोधप्रकाश प्रेस, मुंबई.

( ३ ) जातिभेदविवेकसार, 'एक हिंदू' या टोपण नांवानें; प्रथमावृत्ति १८६१, द्वि. आ. १८६५, गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

**पंडित, विष्णु परशुरामशास्त्री** [ १८२७-१८७६ ] ग्रंथकार, वृत्तपत्रकार, समाजसुधारक. सातारा येथें यांचा जन्म झाला. यांच्या घराण्याचें

मूळ गांव सातारा जिल्ह्यांतील बावधन. यांचे वडील सातारकर महाराजांच्या आश्रयास येऊन राहिले होते. विष्णुशास्त्र्यांनीं वयाच्या एकोणीसाव्या वर्षापर्यंत साताऱ्याचे प्रसिद्ध विद्वान संस्कृतज्ञ राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर व त्यांचे चिरंजीव नारायणाचार्य यांजकडे व्याकरण व न्याय या शास्त्रांचें अध्ययन केलें. हें अध्ययन आटोपल्यावर इंग्रजीचें शिक्षण घेण्याच्या इच्छेनें १८४५ सालीं ते पुण्यास आले व त्यानीं सरकारी पाठशाळेच्या इंग्रजी वर्गांत नांव दाखल केलें. दोन वर्षें त्यानीं येथें अध्ययन केलें. या पाठशाळेंत महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री तळेकर, कृष्णशास्त्री चिपळोणकर वगैरे पुढें उदयास आलेले विद्वान त्यांचे सहाध्यायी होते. १८४८ त त्यांनीं सरकारी शाळाखात्यांत नोकरी धरली. या खात्यांत असतां त्यांस शिक्षकाचें, त्याचप्रमाणें भाषांतरकाराचें व भाषांतरपरीक्षकाचें काम करावें लागे.

पंडितांचा पहिला ग्रंथ 'नाना फडनवीस ह्यांची संक्षिप्त बखर' हा होय. तदनंतर त्यांनीं मरेकृत हिंदुस्थानच्या इतिहासाच्या तिसऱ्या भागाचें भाषांतर केलें. या भाषांतराची न्यायमूर्ति रानडे यांनीं मराठी वाङ्मयावरील आपल्या अहवालांत फारच प्रशंसा केली आहे. १८६४ सालीं त्यानीं सरकारी नोकरीचा राजीनामा दिला व मुंबईस त्यावेळीं नुक्तयाच (१८६२) निघालेल्या 'इंदुप्रकाश' पत्राच्या संपादकाची जागा पत्करली. 'इंदुप्रकाश' हें त्यावेळच्या सुधारणावाद्यांचें महत्त्वाचें मुखपत्र होतें. पंडितांच्या हातांत तें येतांच आपल्या निर्भीड लेखनाच्या जोरावर त्यांनीं तें बरेंच भरभराटीस आणलें. "सेवानिवृत्त झाल्यानंतर स्त्रीजातीच्या उद्धारासाठीं प्राणपणें झगडण्याचा त्यांनीं निर्धार केला, व त्या धोरणानेंच इंदुप्रकाशांत ते आपलीं मतें निर्भीडपणें मांडूं लागले. प्राचीन धर्मग्रंथांचें त्यांनीं स्वतंत्र दृष्टीनें आलोडन केलें; आणि त्यांच्या पाठबळावरच नवीन सुधारणांचा पुरस्कार करण्यास ते पुढें सरसावले. लेखन, भाषण, चर्चा, कीर्तन इत्यादि साधनांच्या द्वारा आपले विचार लोकांच्या गळीं उतरविण्याच्या ते प्रयत्नाला लागले. 'इंदुप्रकाशां'त बालविवाह, पुनर्विवाह, केशवपन, जरठकुमारीविवाह इत्यादि प्रश्नांची सांगोपांग चर्चा करून विरोधकांच्या आक्षेपांचें सप्रमाण खंडन करण्याचा त्यांनी परिपाठ पाडला. प्राचीन काळीं समाजजीवनांत स्त्रियांचें स्थान फार मोठें होतें हें त्यानीं

लोकांच्या निदर्शनास आणून दिलें. स्त्रियांना ज्ञानाचा अधिकार आहे किंवा नाहीं ? आजन्म अविवाहित राहण्यास त्यांना शास्त्राची कांहीं हरकत आहे काय ? लग्नाच्या वयासंबंधीं कांहीं किमान मर्यादा ठरवितां येईल किंवा नाहीं ? विधवाविवाह सशास्त्र किंवा अशास्त्र आहे ? इत्यादि अनेक गोष्टींचा उहापोह करून आपलीं निर्णायक मतें लोकांना पटवून देण्याची त्यांनीं अविश्रांत खटपट केली." [ गं. भा. सरदार; म. उ. मा. ] पंडितांची, प्राचीन टीकाकारांच्याच ठराविक मार्गानें अंधपणें न जातां, स्वतंत्र मार्गानें जाऊन शोध घेण्याकडे प्रवृत्ति असे.

पंडित हे केवळ बोलके सुधारक नसून कर्ते सुधारक होते. 'जसें बोलावें तसें वागावें' असा त्यांचा बाणा होता. लोकनिंदेची किंवा सामाजिक छळाची त्यांनीं कदर केली नाहीं. प्रखर तत्त्वनिष्ठा, निःस्वार्थी वृत्ती व निष्कलंक चारित्र्य यांमुळें त्यांच्या कट्टया शत्रूलाहि त्यांच्याबद्दल आदर वाटे. १८७४ चे सुमारास त्यांची प्रथम पत्नी वारली. त्यांच्या खऱ्या कसोटीची ही वेळ होती. न्याय-मूर्ति रानड्यांसारख्या प्रमुख सुधारकाग्रणीनेंहि ज्या प्रसंगीं कच खाल्ली, तसाच प्रसंग पंडितांवर आल्यावर ते कसे वागतात याकडे लोकांचें लक्ष लागणें साह-जिक होतें. आपल्या तत्त्वापासून पंडित ढळले नाहींत. कुसाबाई पटवर्धन या गतभर्तृकेशीं यथाविधी जाहिरपणें त्यानीं विवाह केला. पंडितांच्या चाहात्यां-बरोबरच छलकांच्या तोंडूनहि क्षणभर धन्योद्गार निघाल्यावांचून राहिले नाहींत.

पंडितांचें बोलणें व लिहिणें नेहमीं तर्कशुद्ध, साधार, अंतःकरणाच्या तळ-मळीनें भरलेलें, आत्मविश्वासपूर्ण व सडेतोड असे. इ. स. १८७० सालीं पुणें येथें शंकराचार्यांशीं 'पुनर्विवाह प्रकरणीं' झालेला त्यांचा वादविवाद त्यांच्या या वैशिष्ट्याची उत्तम साक्ष पटवितो.

पंडितांच्या हातून मराठी वाङ्मयाच्या दृष्टीनें एक महत्त्वाची गोष्ट घडली आहे, ती म्हणजे, तुकारामाच्या गाथेचें त्यानीं रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांच्या सहकार्यानें केलेलें संपादन होय. तळेगांव, देहू, पंढरपूर, कडूस येथील प्रती ताडून पाहून त्यांनीं पाठ निश्चित केले.

पंडितांचें बरेंचसें लेखन स्त्रियांच्या प्रश्नासंबंधींच जरी झालेलें असलें तरी, समाजाच्या सर्वांगीण उन्नतीसंबंधींहि त्यांनीं बरेंच, विशेषतः इंदुप्रकाशांत-लिहिलें आहे. समाजाची प्रगति कशी घडेल, तो अंतर्बाह्य सुखी कसा होईल याखेरीज अन्य ध्यास त्यांना नव्हता. त्यांनीं आपलें शरीर, मन व धन पूर्णपणें समाजाला वाहिलें होतें.

**वा ङ्म य :**

( १ ) आयुष्यवर्तनक्रमाविषयीं श्रुतिस्मृतींच्या आज्ञा, [ उपयुक्त ज्ञान-प्रसारक सभेपुढें ता. १३ मार्च १८७४ रोजीं दिलेलें व्याख्यान ], १८७५, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

( २ ) वेदांतील सूर्यासावित्रीचा विवाह, [ मूळ मंत्र, त्यांचा भाष्याच्या आधारानें मराठींत अर्थ व टीपा यांसहित ], १८७४; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

( ३ ) जाति अथवा वर्ण ( अनुलोमप्रतिलोमसहित ), १८७६; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

( ४ ) पंचद्राविडांतर्गत महाराष्ट्र ब्राह्मणांतील देवरुख्यांविषयीं शास्त्रसंमत विचार आणि त्यांजविषयींच्या खोट्या प्रवादांचें खंडन; १८७४; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

( ५ ) पुनर्विवाह सशास्त्र असल्याविषयीं पुणें व नासिक येथें विष्णु परशरामशास्त्री पंडित यांनीं चार व्याख्यानें दिलीं तीं.; १८७०; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

( ६ ) विधवाविवाह [ पं. ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या ग्रंथाचें भाषांतर ]; प्र. आ. १८६५; द्वि. आ. १८७०; इंदुप्रकाश छापखाना; मुंबई.

( ७ ) पुष्पमाला, ( पद्यसंग्रह )—विनायक यशवंत बेडें यांच्या कांहीं कवितांसह; १८७४; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

( ८ ) स्त्रीगायनसंग्रह अथवा बायकांचीं गाणीं [ जुनीं गाणीं ], १८८२, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(९) आर्य लोकांच्या प्राचीन व अर्वाचीन रीति आणि त्यांची परस्परांशीं तुलना. [ 'फ्रेंडली मीटींग' पुढें दिलेलीं व्याख्यानें: वानप्रस्थ, संन्यास, राजव्यवहार व द्विजांनीं नावेंतून जाणें निर्दोष आहे. ], १८७१; मुंबई.

(१०) हिंदुस्थानचा इतिहास, [ मरेकृत 'History of British India' च्या १० ते १४ प्रकरणांचे आधारें; ह्यांत इंग्लिशांस कर्नाटकांत, म्हैसूर प्रांतांत, बंगाल्यांत वगैरे जय कसे मिळाले त्याचें वर्णन आहे. ], १८६१, एक्सचेंज प्रेस, मुंबई.

(११) नाना फडनवीस ह्यांची संक्षिप्त बखर [ मॅक्डोनाल्डकृत Chronicle of Nana Faranvis चे आधारें ] १८५९; थॉमस ग्रॅहॅम यांचा छापखाना, मुंबई.

(१२) इंग्रेजी आणि मराठी कोश, [ क्रमिक इंग्रजी पुस्तकांतल्या शब्दांचा ] १८६४; सरकारी विद्याखातें; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.

(१३) संस्कृत आणि महाराष्ट्र धातुकोश; १८६५; इंदुप्रकाश छापखाना; मुंबई.

(१४) तुकारामबावाच्या अभंगांची गाथा—भाग १ ला [ तुकारामबावाचें इंग्रजी व मराठी चरित्र आणि २२४७ अभंग ]; साहाय्यक–शंकर पांडुरंग पंडित; १८६९; इंदुप्रकाश छापखाना; मुंबई.

(१५) तुकारामबावाच्या अभंगांची गाथा–भाग २ रा [ अभंग २२४८ ते ४५०३, अनुक्रमणिका व शब्दकोश व ओंव्या यांसह. ]; सहाय्यक–शंकर पांडुरंग पंडित; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

(१) मृत्युलेख, नेटिव्ह ओपिनिअन, व. १३, अं. २०, इ. स. १८७६

(२) विष्णु परशुरामशास्त्री पंडित यांचें चरित्र; १९३६; ले. श्री. स. पंडित.

( ३ ) विष्णुशास्त्री पंडित, ले. गं. बा. सरदार, 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी'.

**पंडित, शंकर पांडुरंग** [ १८४०–१८९४ ] वेदाभ्यासक व संशोधक. यांचा जन्म सावंतवाडी संस्थानांतील बांबुळी या गांवीं झाला. मुन्सफाच्या कचेरींत कारकुनाची जागा मिळण्यासाठीं अर्ज केला असतां, वशिल्याच्या अभावीं मोडी अक्षर चांगलें असूनहि 'मोडी अक्षर वाईट' असा शेरा मारून फेटाळून लावला गेल्यामुळें, तो मोठा अपमान वाटून संस्थान सोडून शंकरराव बेळगांवास गेले, व तेथें अत्यंत हालअपेष्टेंत त्यांनीं इंग्रजीचा अभ्यास आरंभिला. यावेळीं त्यांचें वय अठरा वर्षांचें होतें. १८५८ सालीं इंग्रजीचा गंधहि नसलेल्या या तरुणानें १८६१ सालीं प्रवेशपरीक्षा दिली व तींत ते उत्तम गुण मिळवून उत्तीर्ण झाले; त्यामुळें त्यांस शिष्यवृत्त्या मिळून उच्च शिक्षण घेण्यास उमेद वाटूं लागली. ते १८६५ सालीं बी. ए. झाले. बी. ए. झाल्यावर त्यांस दक्षिणा फेलो नेमण्यांत आलें व तेथपासून त्यांच्या सरकारी नोकरीस प्रारंभ झाला. ह्याच वेळीं एका जर्मन सोल्जर स्नेह्यापाशीं त्यांनीं जर्मन भाषेचा अभ्यास केला. त्यांचें इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व पाहून त्यांस पुणें येथील डेक्कन कॉलेजांत इंग्रजी भाषेचा उप-अध्यापक नेमण्यांत आलें. पुढें १८६८ मध्यें लॅटिन व इंग्रजी घेऊन ते एम्. ए. झाले. पुण्यास नोकरीनिमित्त आल्यानंतर म्हणजे १८६५ सालानंतर त्यांनीं संस्कृत भाषेचें अध्ययन सुरू केलें. मध्यंतरीं त्यांनीं एम्. ए. ची परीक्षा दिली. हें संस्कृत भाषेचें अध्ययन त्यांनीं इतकें उत्तम प्रकारें केलें कीं १८७१–७२ सालीं त्यांच्यावर कॉलेजांत संस्कृत विषय शिकविण्याचें कामहि सोंपविण्यांत आलें.

१८७९ सालीं सरकारनें त्यांची ओरिएंटल ट्रॅन्स्लेटरच्या जागीं नेमणूक केली. ह्या जागेवर सहा वर्षें त्यांनीं मोठ्या निस्पृहतेनें काम केलें. हें काम करीत असतांनाच सरकारची त्यांचेवर इतराजी झाली व त्यांस कांहीं दिवस घरीं बसावें लागलें. नंतर न्यायमूर्ति माधव गोविंद रानडे व सर रेमंड वेस्ट ह्यांच्या खटपटीमुळें त्यांच्यावरील सरकारचा राग गेला व त्यांस डिस्ट्रिक्ट डेप्युटी कलेक्टर करण्यांत आलें व नंतर नगर येथें कांहीं वर्षें हुजुर डेप्युटी कलेक्टर

असतांनाच त्यांस पोरबंदरचे ॲडमिनिस्ट्रेटर नेमलें. या कामावर असतांनाच त्यांचा अंत झाला.

सरकारी नोकरी करीत असतांनाहि शंकररावांनीं विद्याव्यासंग व लेखन-व्यवसाय सतत चालू ठेविला होता. कॉलेजांतील विद्यार्थ्यांसाठीं 'रघुवंश' व 'मालविकाग्निमित्र' हीं पुस्तकें शुद्ध करून त्यांवर टीपा देऊन तीं त्यानीं प्रसिद्ध केलीं. १८७६ सालीं त्यांनीं '**वेदार्थयत्न**' नांवाचें मासिक पुस्तक सुरू केलें. त्यांत ऋग्वेदसंहितेचें मराठी व इंग्रजी भाषांतर दिलेलें असून त्यासंबंधींच्या भरपूर टीपाहि दिलेल्या आहेत. हें काम १८८२ पर्यंत चाललेलें होतें. या मासिकास हिंदुस्थानापेक्षां जर्मनींतच अधिक वर्गणीदार होते ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. पंडितांच्या या 'वेदार्थयत्ना' विषयीं 'ज्ञानकोश'-कारांनीं पुढीलप्रमाणें अभिप्राय व्यक्त केला आहे : "वेदार्थयत्नकारांची दृष्टि उत्तरकालीन क्रियांशीं वेदाची संगति किंवा असंगति शोधण्याकडेसच विशेष होती. शं. पां. पंडित यांच्या अंतःकरणांत चिकित्सक बुद्धीपेक्षां श्रद्धेचा विकास अधिक झाला होता असें दिसतें. यज्ञकर्म विधीपूर्वक करतां न आल्यामुळें यज्ञ करतेवेळेस जी कामना मनांत असेल तिची प्राप्तीहि होत नाहीं, अशी या भोळया ब्राह्मणाची समजूत 'वेदार्थयत्नांत व्यक्त होते' (ज्ञा. को. खं. १.; पृ. ८९) पंडितांनीं 'अथर्ववेदां'चेंहि संपादन केलें आहे.

शंकरराव अनेक भाषाकोविद होते. गुजराथी, कानडी, लॅटीन, जर्मन व फ्रेंच या भाषा त्यांना चांगल्या येत असत. १८७४ सालीं डॉक्टर भांडारकर यांस ओरिएंटल इंटरनॅशनल कॉंग्रेसला जातां आलें नाहीं म्हणून सरकारनें यांना धाडलें होतें. त्यावेळीं परिषदेसमोर '**कालिदासाचा काळ**' हा निबंध त्यांनीं वाचला. या निबंधाची त्या ठिकाणीं फार प्रशंसा झाली.

शंकररावांनीं मराठी वाङ्मयाच्या दृष्टीनें केलेली महत्त्वाची कामगिरी म्हणजे विष्णुशास्त्री पंडितांच्या सहाय्यानें केलेलें तुकारामाच्या गाथेचें संशोधन होय. ही गाथा 'इंदुप्रकाश गाथा' म्हणून प्रसिद्ध आहे. "ह्या गाथेनें तुकारामाची सुशिक्षित लोकांस ओळख करून देण्याच्या कामीं मोठीच कामगिरी बजाविली आहे. माधव चंद्रोबा यांनीं प्रसिद्ध केलेला, शिळाछापावर छापलेला व शब्द न तोडलेला असा तुकोबांच्या अभंगांचा संग्रह तत्पूर्वी होता; परंतु शंकररावांनीं

अतिशय श्रम करून तयार केलेल्या दोन भागांशीं त्याची तुलना करतां याव-याची नाहीं. अनेक प्रती जवळ घेऊन, त्यांतील जी अधिक विश्वसनीय प्रत अशी अंतःप्रमाणांवरून ठरली ती मूळ घेऊन सांपडलेल्या सर्व प्रतींत जेथें जेथें महत्त्वाचे पाठभेद आढळले तेथें तेथें ते पाठभेद व अवांतर माहिती देण्यांत आली!" (द्वा. गो. वैद्य; प्रार्थनासमाजाचा इतिहास)

इ. स. १८६३ त पंडित यांनीं मयूरकृत–कवि मोरोपंत–' बृहद्दशम अथवा कृष्णविजय ' या अवघड ग्रंथावर इंग्रजींत क्लासिकल कवितेवर जशा टीका असतात तशा सविस्तर टीकांच्या धर्तीवर एक टिप्पण पुस्तक समूळ छापलें.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

(१) चरित्र (लेख) त्र्यं. ग. धनेश्वर, मनोरंजन, पु. २०, पूर्वार्ध अंक २, १९१४.

(२) रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित (विस्तृत चरित्र), ले. कर्नाटकी,

**पंडित, हरि माधव** [ १८४९–१८९९ ] निबंधलेखक व ग्रंथपरीक्षक. जन्म सांगलीजवळ कृष्णाकांठावरील हरिपूर या गांवीं झाला. मराठी शिक्षण हरिपूर येथें पुरें केल्यावर बी. ए. पर्यंतचें शिक्षण त्यानीं मुंबई येथें घेतलें. १८७२ सालीं डॉ. भांडारकर यांच्या शिफारशीवरून नागपूर येथील सिटी स्कूलवर मुख्याध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली. कांहीं दिवसांनीं सिटी स्कूलमधील नोकरी सोडून ते नागपूरकर भोंसल्यांचे दुय्यम कारभारी झाले. याच जागेवर ते अखेरपर्यंत होते. मुंबईस विद्यार्थी म्हणून असल्यावेळेपासून ' विविधज्ञान-विस्तारा'शीं त्यांचा संबंध जडला होता. या मासिकांतील ग्रंथपरीक्षणाची बाजू त्यांच्याचकडे सोंपविलेली असे. या मासिकांत ' टेंपेस्ट ', ' गंगावर्णन ', ' गणेशपुराण आर्या ', ' मौजेच्या चार घटका ', ' सौ. आनंदीबाईचें चरित्र ' या पुस्तकांवर त्यांनीं लिहिलेले परीक्षणात्मक निबंध सरस असून त्यांच्या परीक्षण-शैलीचे उत्तम नमुने आहेत. 'बालबोध'कार ओक हे यांच्या परीक्षणात्मक निबंधां-विषयीं लिहितात, "ग्रंथपरीक्षणांत त्यांचा मोठा हातखंडा असे. ग्रंथांतल्या चांगल्या अल्पहि गुणांबद्दल पुष्कळ शाबासकी द्यावयाची, दोष मोठे असले तरी ते अशा रितीनें दाखवावयाचे कीं त्याविषयीं ग्रंथकारास वाईट न वाटतां,

त्यावरून आपल्या सुधारणेची दिशा त्यास कळून, टीकाकाराविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि उत्पन्न व्हावयाची, आणि लिहिणारास ती टीका वाचतांना गुदगुदल्या व्हावयाच्या हा एक वर्णनीय गुण त्यांचे ठायीं होता. म्हणजे त्यांच्या टीकेपासून ग्रंथकाराची कंबर बसावयाची नाहीं, उलट उत्तेजन यावयाचें."

पंडित यांचा जुन्या मराठी कवितेवरील व्यासंगहि दांडगा व अतिसूक्ष्म होता. 'काव्यसंग्रह'कर्ते ओक यांस त्यांच्या या व्यासंगाचा फारच उपयोग होत असे. 'काव्यसंग्रहां'तील बऱ्याच दुर्बोध स्थळांवरील विवेचनात्मक टीपा पंडित यांच्या आहेत.

नागपूर येथें असतां दोन वर्षे 'देशसेवक' (१८९२) नांवाचें एक साप्ताहिकहि पंडित चालवीत असत.

यांनीं लिहिलेल्या निबंधांची संख्या बरीच आहे. थोडीशी काव्यरचनाहि यांचे हातून घडलेली आहे.

**वाङ्मय :**

१ चार चरित्रात्मक निबंध; १९०८; नाडकर्णी आणि मंडळी; कर्नाटक छापखाना; मुंबई.

२ नागपूरकर भोंसले यांचा इतिहास; १८७७; विविधज्ञानविस्तार, मुंबई.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

१ चरित्र, बळवंत, विविधज्ञानविस्तार, डिसेंबर १९०१

२ चरित्र, 'काव्यरत्नावलि'; जून १८९९

३ चरित्र, 'शाळापत्रक', एप्रिल-मे १८९९

४ चरित्र, 'बालबोध'; एप्रिल १८९९

**पंडिता रमाबाई** [१८५८–१९२२] स्त्रीशिक्षणसुधारक व वक्त्री. दक्षिण कानडा प्रांतांतील मंगळूर जिल्ह्यांत माळहेरंबी म्हणून एक गाव आहे. त्याचे शेजारील गंगामूल अरण्यांत यांचा जन्म झाला. पंडिता रमाबाईचे वडील अनंतशास्त्री डोंगरे होत. श्री आणि सरस्वती यांचा अपूर्व संयोग यांच्या ठिकाणीं झाला होता. शेवटचे बाजीराव पेशवे यांचे गुरु

वे. शा. सं. रामशास्त्री साठे यांजकडे यांचें शास्त्राध्ययन झालें होतें. रामशास्त्री बाजीरावाची पत्नी वाराणशीबाई हिला संस्कृत शिकवीत असत तेंव्हां अनंतशास्त्र्यांस तेथें जाण्याचा पुष्कळ वेळां योग येई. वाराणशीबाईची संस्कृत विषयांतील गति पाहून अनंतशास्त्र्यांना समाधान वाटे, व त्या समाधानाचें पर्यवसान घरच्या स्त्रियांनाहि संस्कृत शिकविण्याबद्दलच्या त्यांच्या प्रतिज्ञेंत झालें. इ. स. १८१८ त पेशवाई बुडाल्यावर अनंतशास्त्री परत घरीं आले. अनंतशास्त्र्यांच्या विद्वत्तेची कीर्ति कर्णोपकर्णी म्हैसूरच्या महाराजांनीं ऐकिली होती. त्यांनीं त्यांस मोठ्या आग्रहानें बोलावून घेऊन, आश्रयास ठेविलें. सुमारें दहा वर्षें ते म्हैसूरास होते. एवढ्या अवधींत त्यांनीं बराच द्रव्यसंचय केला. खुद्द महाराजांनींच त्यांस पंचवीस हजारांची देणगी दिली होती. पुढें महाराजांचा आश्रय सोडून ते घरीं परत आले व वडील व कुटुंब यांस बरोबर घेऊन ते काशीयात्रेस निघाले. वाटेंत त्यांची पत्नी संग्रहणीनें प्रवासांत वारली. यात्रेहून परत येत असतांना पैठण मुक्कामीं माधवराव अभ्यंकर या नांवाच्या गृहस्थाच्या अंबाबाई नामक कन्येशीं त्यानीं विवाह केला. अंबाबाईच्या पोटीं अनंतशास्त्र्यांना सहा अपत्यें झालीं. त्यांपैकीं शेवटचें अपत्य पंडिता रमाबाई या होत.

पहिल्या पत्नीच्या हटवादीपणामुळें, तिला संस्कृत शिकविण्याचें काम अनंतशास्त्र्यांना करतां आलें नाहीं, तरी आपल्या दुसऱ्या पत्नीला त्यांनीं संस्कृत विद्या उत्तम तऱ्हेनें शिकविली होती. अंधश्रद्धा त्यांच्या ठायीं मुळापासूनच नव्हती. यात्रा, पर्यटनें व शास्त्रांचें डोळस अध्ययन यांमुळें त्यांचे विचार प्रगल्भ बनले होते. समाज व धर्माधिकारी यांच्या जुलमाची पर्वा न करतां त्यानीं आपलीं मतें आचरणांत आणलीं.

आप्तांच्या छळामुळें गांवांत राहाणें अशक्य झाल्याबरोबर त्यांनीं गांवा-शेजारील गंगामूल नामक अरण्यांत झोंपडी उभारली; व तेथेंच निराळें टुमदार गांव वसवून पन्नास माणसांची वस्ती करविली. आई व पिता यांच्यांतील या निर्भिडतेचा व बुद्धिमत्तेचा रमाबाईमध्यें योग्य मिलाफ झाला होता असें त्यांच्या पुढील चरित्रावरून म्हणावयास हरकत नाहीं. मात्र विद्वान पिता, प्रेमळ माता, सरळ बंधु आणि रसिक पति लाभूनहि रमाबाईचें उभें

आयुष्य खरखरीत राहावें हा केवळ दैवदुर्विलासच म्हटला पाहिजे. त्यांच्या वडील बहिणीचा नवरा व सावत्र भाऊ यांच्या उधळेपणामुळें व व्यसनामुळें अनंतशास्त्र्यांना वृद्धापकाळीं दारिद्य, अशी उलटी स्थिती प्राप्त झाली. त्यांच्या मानसन्मानांत एकेकाळीं 'एक लक्ष पंचाहत्तर हजार रुपयांची' झालेली मिळकत कोठच्या कोठेंच गेली; व अखेर झाडाचा पाला, खजुराच्या थोड्या बिया व पाणी यांवर अकरा अहोरात्री काढण्याइतकी अन्नान्नदशा या कुटुंबास आली. अशा कष्टमय अवस्थेंतच अखेर रमाबाईच्या मातापितरांचें निधन झालें. नंतर रमाबाई आपले वडिल बंधु श्रीनिवासशास्त्री यांच्यासमवेत उपास-तापासांत प्रवास करित कलकत्त्याला आल्या. परंतु त्यांची संकटपरंपरा एवढ्यावरच थांबावयाची नव्हती. श्रीनिवासशास्त्र्यांचा कलकत्यांत थोडा जम बसतो तोंच त्यांची प्रकृति प्रवासाच्या श्रमानें ढांसळली व अखेर त्या आजारांतच त्यांचा अंत होऊन रमाबाई पूर्णपणें उघड्या पडल्या.

कलकत्त्याच्या या मुक्कामापासून रमाबाईंचा एक मात्र मोठा फायदा झाला; तो म्हणजे प्रसिद्धि. सन. १८७८ च्या सुरवातीस त्या आपल्या बंधुसमवेत कलकत्त्याला आल्या. ह्या भावंडांच्या विद्वत्तेच्या प्रकाशानें कलकत्ता शहर कसें उजळलें होतें याची माहिती पुढील उताऱ्यावरून होईल. हा उतारा मुंबईतील एका वृत्तपत्रांत आला होता.

" हल्लीं कलकत्त्यास कोणी एक रमाबाई नांवाची, मराठा ( महाराष्ट्रीय ) बावीस वर्षांची अविवाहित तरुण स्त्री कर्नाटक प्रांतांतून आली असून जगन्नाथपुरीकडे जात असतां तिनें कलकत्त्याला कांहीं दिवस मुक्काम करून तेथील विद्वान पंडितांस चकित करून सोडलें आहे. बाई संस्कृत भाषा बोलते, संस्कृतामध्यें जागच्या जागीं काव्य रचते." यानंतर मुंबईतील लोकांनी जास्त माहिती काढण्याचा प्रयत्न केला त्यांत "ह्या बाईला भागवतांतील १८ हजार श्लोक मुखोद्गत आहेत. पाणिनीचा पहिला भाग बाई चांगली पढली आहे, बाई सुंदर, सतेज, विनयशील व दिसावयास हुशार आहे." अशी माहिती मिळाली. कलकत्त्याच्या सेनेटमधील प्रो. टॉने, प्रो. गौ, न्यायरत्न पं. रमेशचंद्र यांच्यासारख्या संस्कृतज्ञांनीं व ज्योतींद्रमोहन टागोर सारख्या महाभागांनींही रमाबाईंचा गौरव करून तिची असाधारण विद्वत्ता, समयसूचकता, विनोद व

शुद्ध स्पष्टोच्चार पाहून आनंद प्रकट केला. देशभक्त आनंदमोहन बोस याच्या नेतृत्वाखालीं कलकत्त्यांतील स्त्रियांनीं पंडिता रमाबाईंचा गौरव करून त्याना बंगाली भाषेंत मानपत्र अर्पण केलें.

स्वतः महाराष्ट्रीय असतांहि पं. रमाबाईंचें आजवरचें आयुष्य बंगालसारख्या परप्रातांतच व्यतीत होत होतें; परंतु त्यांचा महाराष्ट्राबद्दलचा ओढा रतिमात्रहि कमी नव्हता. महाराष्ट्राच्या चळवळींकडे त्यांचें बारीक लक्ष असून इंदुप्रकाशसारखीं पत्रें त्या नेमानें वाचीत असत. आपल्या बंधूंच्या मृत्युचे वेळींच त्यांनीं स्त्रीसुधारणेच्या कामीं स्वतःस आजीव वाहून घेण्याची शपथ घेतली होती. या संधीचा फायदा घेऊन मुंबईंतील कांहीं पुढारी मंडळींनीं रमाबाईच्या निर्वाहाची तरतूद करण्याची व्यवस्था करून त्यांना मुंबईस आणण्याची व्यवस्था केली. परंतु इतक्यांतच त्यांचा सिल्हट येथील वकील बाबू बिपीन बिहारीलाल मेधावी, एम्. ए., बी. एल्. यांच्याशीं विवाह झाला व मुंबईकरांच्या आशा तात्पुरत्या तरी मुळांतच थंडावल्या.

लग्नानंतर कांहीं महिन्यांनीं रमाबाईंना एक कन्या झाली व सिल्हट येथें त्या चांगल्याच लोकप्रिय झाल्या. परंतु पंडिता रमाबाईंच्या संसारकुंडलींतील ग्रहच असे चमत्कारिक पडले होते कीं हा नवीन नात्याचा जडलेला जिव्हाळाहि त्यांना फार दिवस लाभला नाहीं. लग्नानंतर एकोणीस महिन्यांनीं बाबू विपिन बिहारी मेधावी हे अकस्मात मृत्यु पावले व पुन्हा रमाबाई एकट्या पडल्या. तथापि परमेश्वरावर अढळ भरंवसा असल्यामुळें मन घट्ट करून त्यांनीं सारें दुःख गिळलें व इ. स. १८८२ सालीं आपल्या अल्पवयी कन्येसह त्यांनीं पुण्यांत पाऊल ठेवलें.

पुण्यास आल्यावर पंडिता रमाबाईंनी केलेली पहिली सार्वजनिक कामगिरी म्हणजे 'आर्य महिला समाजाची' स्थापना ही होय. लवकरच मुंबई येथेंहि 'आर्य महिला समाज' उघडण्यांत आला. रमाबाईंची दुसरी महत्वाची कामगिरी म्हणजे हंटर कमिटीपुढें झालेली त्यांची साक्ष. या साक्षींत त्यांनीं हिंदी स्त्रियांची वकिली इतक्या उत्कृष्ट रितीनें केली कीं त्यांच्या या साक्षीचें इंग्रजी भाषांतर करवून तें कमिटीचे अध्यक्ष हंटरसाहेब यांनीं स्वतः छापून प्रसिद्ध केलें; व या विषयावर स्वतंत्र व्याख्यान देऊन रमाबाईंच्या उद्योगाचा

जाहीर गौरव केला. त्याच सुमारास (१८८२) त्यांचें 'स्त्रीधर्मनीति' हें महत्वाचें पुस्तक प्रसिद्ध झालें.

पुण्यास असतांच रमाबाईंच्या इंग्रजी शिक्षणाचा आरंभ झाला. आपल्याला जें कार्य करावयाचें आहे तें करतां येण्यास इंग्रजी भाषेचें उत्तम ज्ञान घेणें अवश्य आहे व असें ज्ञान इंग्लंडांतच उत्कृष्टपणें मिळवितां येईल असें त्यांच्या मनानें घेतलें होतें. याच सुमारास त्यांच्या धार्मिक मतांतहि महत्त्वाची क्रांति घडून येत होती. 'आर्यमहिला समाजा'च्या स्थापनेपासूनच त्यांचा ख्रिस्ती मिशनरी लोकांशीं संबंध येवूं लागून त्यांचीं मतें ख्रिस्ती धर्माकडे हळू हळू खेंचलीं जात होतीं. अशा स्थितींत त्या इंग्लंडांत गेल्यावर तेथील मिशनऱ्यांचीं आदर्श रुग्णालयें, परिचर्यागृहें व सुधारणालयें पाहून त्यांचा त्या धर्माविषयीं आदर दुणावला व त्यांनीं आपल्या अल्पवयी मुलीसह ख्रिश्चन धर्माची दीक्षा घेतली. रमाबाईंचें शिक्षण चालू असतांनाच त्यांना अमेरिकेंत जाण्याचा योग आला. सुप्रसिद्ध डॉ. आनंदीबाई जोशी या त्या वेळीं अमेरिकेंत होत्या त्यांच्याकडे रमाबाई उतरल्या. तेथील शिक्षणपद्धति, सुधारणा व हिंदु स्त्रियांच्या उद्धारासाठीं साह्य करण्याची तेथील लोकांची उत्सुकता पाहून रमाबाईंनीं तेथें चांगलें प्रचारकार्य चालविलें, व आपल्या भावी कार्याची आंखणी करून त्याला दहा वर्षेपर्यंत पैशाचें पाठबळ मिळेल अशी व्यवस्था केली. "High Class Hindu Woman" हें आपलें पुस्तक त्यांनी फिलाडेल्फिया येथें प्रसिद्ध करून हिन्दी स्त्रियांबद्दल सहानुभूति मिळवण्याचा यशस्वी प्रयत्न केला. अशा प्रकारें आपला प्रवास आटोपून रमाबाईंनीं हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर पाय ठेवला, व लागलीच मुंबई येथें 'शारदासदन' या इतिहासप्रसिद्ध संस्थेची स्थापना (१८८९) केली. पुढें खर्चाच्या व जागेच्या सोईसाठीं हें सदन पुण्यास (१८९१) नेण्यांत आले. दुर्दैवानें पुण्याची हवा या सदनास फारशी मानवली नाहीं. रमाबाई स्वतः ख्रिस्ती झाल्या असल्यामुळें त्यांच्याविषयीं अनेक आक्षेप निघूं लागले. ही ख्रिस्ती लोकांची संस्था आहे असे प्रवाद उठले व संस्थेंतल्या कांहीं विद्यार्थिनींनी याच सुमारास ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्यामुळें पालकांनी धडाधड आपल्या मुली सदनांतून काढून घेतल्या. अमेरिकेहून मदत

येण्याची दहा वर्षांची मुदत याच वेळीं संपल्यामुळें पंडिता रमाबाईंनीं यापुढें स्वतःच्या हिंमतीवर केडगांव येथें 'मुक्तिसदन' नांवाची नवी संस्था उभारली. या सदनासाठीं त्यांनी १८९८ सालांत पुन्हां अमेरिकेचा प्रवास केला. व पूर्वीच्या रमाबाई असोसिएशनला अधिक व्यापक स्वरुप देऊन मुक्ति-सदनासाठीं सांपत्तिक मदत मिळविली.

इ. स. १८९७ सालीं मध्यप्रांतांत जो भयंकर दुष्काळ पडला त्या काळांत त्यांनीं स्वतः त्या त्या प्रांतांत जाऊन गरिब गुरीबांस अमोल मदत केली; व सुमारें तीन हजार आपद्ग्रस्तांना मुक्तिसदनाच्या द्वारें आश्रय दिला. मात्र ही मदत पूर्वींच्या शारदासदनाप्रमाणें निरपेक्ष नसून खिस्ती धर्माच्या स्वीकारानंतरच देण्यांत आली होती. या प्रकारावर त्यावेळीं पुढारी वर्गाकडून मोठाच गहजब उडवण्यांत आला होता. त्यांची मुक्तिसदन ही संस्था यापुढें सर्वस्वी खिस्ती मिशनरी स्वरूपाची बनल्यामुळें हिंदु लोक तिला पाण्यांत पाहूं लागले तरी अनाथ अपंग मुलें, असहाय्य दलित व पीडित स्त्रिया यांना तें खात्रीचें आश्रयस्थान वाटूं लागलें होतें यांत शंका नाहीं.

पंडिता रमाबाईंचा यापुढील काल मुक्तिसदनाच्या जोपासनेंतच गेला. महाराष्ट्रीय समाजानें त्यांना खड्यासारखें वगळून टाकल्यामुळें त्यांच्या विद्वतेचा जो लाभ त्यांच्या पुढील आयुष्यांत वस्तुतः महाराष्ट्रीय स्त्रियांना झाला असता तो झाला नाहीं. वैयक्तिक महत्वाकांक्षेच्या भरीं न पडतां व्यापक दृष्टी ठेवून पक्षरहित राहून बाई कार्य करत्या, तर स्वसमाजापासून दूर होऊन परित्यक्तेप्रमाणें आयुष्य घालविण्याचा प्रसंग त्यांजवर आला नसता. बाई जें कार्य करूं इच्छित होत्या तेंच कार्य पुढें प्रो. अण्णासाहेब कर्व्यांसारख्यांनीं समाजाला हळु हळु आपणाकडे वळवून करूनहि दाखविलें. मुक्तिसदनाच्या स्थापनेपासून आपल्या आयुष्याची अखेर होईपर्यंत त्यांनीं सदनाच्या कार्यालाच केवळ स्वतःस वाहून घेतलें. आपल्या एकुलत्या एक कन्येला बी. ए., एल्. टी. पर्यंत शिक्षण देऊन आपल्या मागें ती आपल्या कार्याची धुरा वाहील या आशेवर त्या काळ कंठीत होत्या. मुक्तिसदनाच्या व्हाईस् प्रिन्सिपॉलशिपचा अधिकारहि त्यांच्या कन्येनें-मनोरमाबाईंनी-घेतला होता. पण तिच्या या अकालीं निधनामुळेंच त्यांचे हे बेत जागच्या जागींच

राहिले. वार्धक्याच्या भरांत शेवटचा उरलेला हा आशातंतू नष्ट होतांच पंडिता रमाबाईंच्या अंतःकरणाला जबर धक्का बसला, व त्यांतच त्या अखेर (१९२२) खिस्तवासी झाल्या.

पंडिता रमाबाईंचें लौकिक चरित्र येथेंच संपलें. तथापि आपल्या ज्या साहित्याच्याद्वारें त्यांनीं मराठी भाषेंत चिरंजीवित्व प्राप्त करून घेतलें तें साहित्य, त्या काळाची कल्पना करतां, आजहि अपूर्व वाटल्याखेरीज राहाणार नाहीं. त्यांचें पहिलें पुस्तक 'स्त्रीधर्मनीति' हें १८८२ सालीं प्रसिद्ध झालें. एकोणिसाव्या शतकांत एका स्त्रीनें लिहिलेलें पुस्तक या दृष्टीनें या पुस्तकाचें महत्व आहेच, परंतु त्यांतील विचार आजच्याहि स्त्री-समाजानें मनन करण्यासारखे आहेत. स्वावलंबन, शिक्षण, धारिष्ट इत्यादि गुणांत स्त्रियांनीं कां पुढें यावयास पाहिजे याचें सुंदर विवेचन या पुस्तकांत केलेलें सांपडतें. रमाबाईंचें दुसरें पुस्तक 'युनायटेड् स्टेट्सची लोकस्थिति आणि प्रवासवृत्त' (१८८९). हा ग्रंथ दोन भागांत प्रसिद्ध झालेला आहे. पं. रमाबाई अमेरिकेंत प्रवासांत असतांनाच या पुस्तकाचा बराचसा भाग लिहून झाला होता. पुढें बाकीचा भाग येथें आल्यावर लिहिण्यांत आला. प्रवासाहून परत आल्यावर पुण्याच्या व येथील प्रार्थना-समाजमंदिरांत पंडिता रमाबाईंचीं याच विषयावर ८।९ व्याख्यानेंहि झालीं होतीं. प्रवासवर्णनांतील स्त्रियांची स्थिति, स्त्रियांच्या जुटी, स्त्रियांच्या कुवेडस इत्यादि प्रकरणावरून बाईंचें प्रवासांतहि आपल्या चळवळीकडे कसें सूक्ष्म लक्ष होतें याचा पडताळा पाहावयास सांपडतो. या प्रवासवर्णनात्मक पुस्तका-प्रमाणेंच 'इंग्लंडचा प्रवास' या नांवाचें बाईंचें आणखी एक छोटेसें पुस्तक प्रसिद्ध आहे. रमाबाई १८८३ सालीं इंग्लंडांत गेल्या असतां त्यांनीं आपल्या प्रवासाचें वृत्त मुंबईतील एका स्नेह्यास पत्ररुपानें लिहून कळविलें. हींच पत्रें त्यांच्या स्नेह्यानें पुढें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलीं. पुस्तकरूपानें प्रसिद्ध करावी या हेतुनें किंवा प्रवासवर्णन करण्यासाठींच म्हणून बसून तीं लिहिलीं गेलीं नसल्यानें नेहमींच्या प्रवासवर्णनांत आढळणारी औपचारिकता किंवा बुद्ध्याच वाङ्मयदृष्ट्या केलेली सजावट यांत दिसत नाहीं. पण त्यामुळेंच तें अधिक स्वाभाविक, किंचित् चिंतनात्मक पण हृद्य असें झालेलें आहे. बाई स्वतः

संस्कृत सारस्वताच्या उत्तम पंडिता असूनहि पंडितांच्या लेखनांत आढळणारें संस्कृतप्राचुर्य व जडत्व यांत कोठेंहि आढळत नाहीं. या प्रवासवर्णनांतील त्यांनी सागराचें रेखाटलेलें शब्दचित्र पाहिलें, म्हणजे बाईंची सौंदर्यग्रहणशक्ति व तें लीलया विविध रंगछटांनीं शब्दद्वारा रेखाटण्याचें कौशल्य याबद्दल कौतुक वाटूं लागतें. बाईंच्या सौंदर्यासक्ततेबरोबरच, त्यांच्या चिंतनशीलतेचा त्यांत प्रत्यय येतो. 'प्रभू येशूचें चरित्र' व 'बायबलचें भाषांतर' हीं दोन पुस्तकेंहि बाईंच्या लेखनांत महत्वाचीं आहेत. आजपर्यंतच्या मिशनरी मराठीची खडबडीत पाळंद सोडून बाईंनीं सुबक मराठी लेणें या दोनहि पुस्तकांना लेवविलें आहे. मिशनरी मराठीच्या इतिहासांत ही सुधारणा घडवून आणण्याचा पहिला मान पंडिता रमाबाईंसच दिला पाहिजे.

वाङ्मय :

(१) स्त्रीधर्मनीति; प्र. आ. १८८२; वा. गो. रानडे, ज्ञानप्रकाश प्रेस, पुणें; द्वि. आ. १८८३, पुणेंवैभव प्रेस, पुणें.
(२) पंडिता रमाबाई यांचा इंग्लंडचा प्रवास–भाग १ ला, [इंग्लंडास जाण्याचीं कारणें व तेथपर्यंतच्या प्रवासाची हकीगत]; १८८३; सदाशिव पांडुरंग केळकर, इंडियन प्रेस, मुंबई.
(३) युनायटेड स्टेट्सूची लोकस्थिति आणि प्रवासवृत्त–भाग १ ला, २ रा; १८८९, निर्णयसागर छापखाना; मुंबई.
(४) देवलोक आणि मृत्युलोक यांचें दर्शन, १९०४
(५) मी किती सोसूं ? १९०४
(६) उद्यां येणार आहेत, १९०५
(७) आमचा प्रभु आणि तारणारा येशु ख्रिस्त यांचा करार, १९०४
(८) प्रभु येशूचें चरित्र; १९०६, १९०७, १९१३
(९) नवा करार, १९१२
(१०) इब्री (भाषेचें) व्याकरण, १९०८
(११) पवित्रशास्त्र म्हणजे जुना व नवा करार; १९२४; रमाबाई मुक्तिमिशन; मुक्तिमिशन प्रेस, केडगांव.

(१२) गीतें, पुस्तक दुसरें; १९१७; मुक्तिमिशन प्रेस, केडगांव.

(१३) मत्तयानें सांगितलेली सुवार्ता; आ. ४ थी १९३२; मुक्तिमिशन प्रेस; केडगांव.

(१४) भविष्यकथा; आ. २ री १९१७; केडगांव.

(१५) देव प्रीति आहे; आ. ५ वी १९३४; मुक्तिमिशन प्रेस, केडगांव.

(१६) पाहिजे; आ. ९ वी १९२९; केडगांव.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

१ थोर पंडिता रमाबाई; १९२२; कृष्णबाई गद्रे; मनोरंजन प्रेस, मुंबई.

२ पंडिता रमाबाई यांचें चरित्र; १९३१; बॉम्बे रिप्रेझेंटेटिव्ह चर्च कौन्सिल लिटरेचर कमिटी; मुंबई.

३ पंडिता रमाबाई ह्यांचें पद्यात्मक लघुचरित्र; १९०४; शंकर बळवंत कुळकर्णी, निर्णयसागर छापखाना; मुंबई.

४ पंडिता रमाबाई मेधावी; गो. म. ठेंगे; मनोरंजन, मे, १९२२

५ पंडिता रमाबाई; द्वा. गो. वैद्य; नवयुग, एप्रिल-मे, १९२२

६ पंडिता रमाबाई; श्री, के. नाईक; नवी गृहलक्ष्मी, जुलै १९३४

७ पंडिताबाईचें पांडित्य; बा. गं. टिळक, टिळकांचे केसरींतील लेख. भा. ४ था. पृ. ३७५ ते ३७८

८ पंडिता रमाबाई सरस्वती; चरित्रात्मक लेख, बालबोध पु. ४०, अंक ५, ६.

९ पंडिता रमाबाई, ( चरित्रात्मक लेख ); थोर स्त्रियांचीं चित्रें आणि चरित्रें, पृ. ७०; प्र. ख्रिश्चन लिटरेचर सोसायटी.

**परांजपे, नरहर रामचंद्र** [ १८९२–१९३४ ] चरित्रकार. मध्यप्रांत शाळाखात्यांत नोकर होते. उमरावती येथें अखेरपर्यंत वास्तव्य. निष्णात शिक्षक म्हणून प्रसिद्ध होते. बंगाली भाषेचा अभ्यास करून ' भगवान श्रीरामकृष्ण परमहंस ' यांचें विस्तृत चरित्र यांनीं लिहिलें.

वा ङ्म य :

(१) श्रीभगवान रामकृष्ण परमहंस देव यांचें चरित्र, भाग पहिला, १९२३; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

(२) श्रीभगवान रामकृष्ण परमहंस देव यांचें चरित्र, भाग दुसरा, १९२५; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

**परांजपे, हरी माधव** [ १८४२–१९०० ] वृत्तपत्रकार. 'नेटिव्ह ओपिनियन' पत्राचे संपादक. मुळचे खानदेशमधील. अगदीं मुळचे कोंकणांतील. यांचे आजोबा पहिल्यानें खानदेशांत आले. वडील शिरपूर येथें फौजदार होते. यांचें प्राथमिक शिक्षण धुळें येथें व माध्यमिक व उच्च शिक्षण मुंबईस विल्सन हायस्कुल व विल्सन कॉलेज यांत झालें. कांहीं दिवस विल्सन हायस्कुलांत शिक्षक म्हणून काम केल्यावर 'नेटिव्ह ओपिनियन' पत्रांत ते लिहूं लागले. १८७६ सालीं त्यांचे वडील बंधू नारायण माधव यांजकडे हें पत्र मालकी हक्कानें आलें व १८७७ च्या आरंभीं नेटिव्ह ओपिनीयन छापाखानाहि त्यांनीं सुरू केला. नारायणराव १८८० सालीं वारले. त्यांचे पश्चात् हरिभाऊ यांजकडे 'नेटिव्ह ओपीनियन'ची मालकी आली. हरीभाऊ इंग्रजी व मराठी हे दोन्ही मजकूर या पत्रासाठीं लिहीत.

**पवार, शिवराम गणपत** [ १८६७—१९३९ ] ज्योतिर्गणितज्ञ. अहमदनगर जिल्ह्यांतील, राहुरी तालुक्यांतील सडें या गांवचे राहणारे. पुणें मराठी ट्रेनिंग कॉलेजांतून तिसऱ्या वर्षाची परीक्षा देवून शिक्षणखात्यांत यांनी नोकरी धरली. या खात्यांत ते असिस्टंट डेप्युटी एज्युकेशन इन्स्पेक्टरच्या हुद्यापर्यंत चढले होते. पेन्शन घेतल्यावर आपल्या गांवीं राहून त्यानीं आपला व्यासंग अखेरपर्यंत अखंड चालू ठेविला. संस्कृत व इंग्रजी या भाषांचें त्यांचें ज्ञान मर्यादित असतांहि ज्योतिषाचें ज्ञान त्यानीं चांगल्या प्रकारें संपादन केलें होतें. हा विषयहि सुबोध रीतीनें मांडण्याची त्यांची हातोटी मोठी अपूर्व होती. त्यांच्या खालील प्रकाशित ग्रंथांखेरीज 'ग्रहगतिसिद्धान्त', 'ग्रहस्थविज्ञानपंचांग कल्पतरू' व 'उपरागविज्ञान' असे तीन ग्रंथ लिहून ठेविलेले पण अप्रकाशित असे आहेत.

**वाङ्मय :**

(१) करणकौमुदी (म्हणजे) कर्तव्य ज्योतिःशास्त्र; [ पंचांगकर्त्यांसाठीं ] शके १८२९; चित्रशाळा छापखाना, पुणें.
(२) रेवतीयोगतारेचा शोध आणि अयनांशांची सिद्धता; १९२६; इंदिरा प्रेस, पुणें.
(३) लग्नसाधनसारण्या आणि दशमस्थान साधन; [ शालिवाहन शके १८०१ ते शके १९१० पर्यंत इष्ट मितीचें लग्नसाधन. अक्षांश १२ ते ३५ पर्यंत ], १९३७; मराठा प्रेस; पुणें.
(४) सूर्येन्दु-स्थानमान रीति, उदाहरणें व कोष्टकें यांसहित; १९३७; दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई.
(५) भूमितीचीं मूलतत्त्वें—भाग १ ला—पहिलें व दुसरें पुस्तक; १९२४; हनुमान प्रिंटिंग प्रेस; पुणें.

**पळसुले, गोपाळ सदाशिव** [ १८८०-१९४६ ] होमिओपाथीवरील पुस्तकांचे लेखक. जन्म कोल्हापूर येथें झाला. मुंबई विद्यापीठाची मॅट्रिकची परीक्षा कोल्हापूर येथील हायस्कुलांतून दिल्यावर राजाराम कॉलेजांत त्यांनीं एक वर्ष शिक्षण घेतलें. नंतर वैद्यकीय शिक्षणासाठीं ते कलकत्त्यास गेले. तेथें त्यानीं नॅशनल मेडिकल कॉलेजांत वैद्यकीचा अभ्यास करून एल्. एम् ॲण्ड एस् व एल्. एम्. एच्. एस्. या पदव्या संपादन केल्या व पुण्यास 'आनंदाश्रमाच्या' दर्शनी बाजूच्या जागेंत 'श्रीकृष्ण होमिओपाथी दवाखाना' सुरू केला. होमिओपाथीचा प्रसार सर्वत्र व्हावा इतकेंच नव्हे तर हीं औषधें परदेशाहून आणविण्यापेक्षां येथेंच तयार करावींत म्हणून त्यानीं त्यासाठीं एक कारखानाहि काढला. 'रसायन-चिकित्साशास्त्र,' 'होमिओपाथी,' 'बारा क्षार' अशीं तीन पुस्तकें त्यानीं लिहिलीं आहेत. लो. टिळकपक्षाचे हे एकनिष्ठ अनुयायी असून, राष्ट्रीय चळवळींत स्वार्थत्यागपूर्वक लक्ष घालीत असत.

**वाङ्मय :**

(१) जीवन-रसायन-चिकित्साशास्त्र अर्थात् बाराक्षार चिकित्सापद्धति १९२७; गोवर्धन प्रेस, चित्रशाळा प्रेस, पुणें.

(२) होमिओपाथीचा छोटा निघंटु म्हणजेच होमिओपाथिक औषधांचे गुणधर्म, १९३७; महाराष्ट्र छापखाना, पुणें.

(३) इन्फ्लुएन्झा अथवा शैत्यज्वर [ होमिओ व जीवनरसायनचिकित्सा ] १९१८,१९३५; चित्रशाळा छापखाना, पुणें.

(४) बालरोग व त्यांची होमिओपाथिक चिकित्सा [ विषयसूचीसह ], १९३६; महाराष्ट्र छापखाना; पुणें.

**पांगळ, तात्या नेमिनाथ** [ १८८५–१९४७ ] लेखक व प्रकाशक. बार्शी येथें जन्म. प्राथमिक व दुय्यम शिक्षण तेथेंच झालें. १९०३ सालीं, बार्शीत प्लेग सुरू झाल्यामुळें, हे सोलापुरास रहावयास आले. यांचा संस्कृतचा, त्याचप्रमाणें जैन धर्माचा चांगला अभ्यास होता. मुंबईचे शेठ माणिकचंद पानाचंद या श्रीमंत व्यापाऱ्याच्या साहाय्यामुळें व प्रेरणेमुळें जैनधर्मविषयक जुने लेख व हस्तलिखितें मिळविण्यासाठीं यानीं हिंदुस्थानांत बराच प्रवासहि केला होता. या प्रवासाचा व अभ्यासाचा त्यांनीं जैनधर्मविषयक लेख व पुस्तकें लिहिण्यांत चांगलाच उपयोग करून घेतला. १९१३ सालीं सोलापूरचे एक प्रसिद्ध जैन लेखक वालचंद रामचंद्र कोठारी यांच्या सहकारितेनें ' सरस वाङ्मयरत्नमाला ' या नांवाची, ललित वाङ्मयाच्या प्रकाशनाला वाहिलेली एक ग्रंथमाला त्यानीं पुणें येथें सुरू केली. या मालेंतून १५०–१७५ पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांतील बहुसंख्य कथाकादंबऱ्या असून, बहुतेक देशी व विदेशी भाषांतून रूपांतरित केलेल्या आहेत. बहुजनसमाजांत वाचनाची आवड मोठ्या प्रमाणांत उत्पन्न करण्यास ज्या कांहीं ' ग्रंथमाला ' कारण झाल्या त्यांपैकीं ' सरस वाङ्मयरत्नमाला ' ही एक होय.

**वाङ्मय :**

(१) श्रीमान् गुणभद्राचार्यप्रणित उत्तर पुराणाचें सुरस मराठी भाषांतर [ तीर्थंकर चरित्रें ]

(२) श्रीमान् कुंदकुंदाचार्य यांचें चरित्र व जैनांचा पांचशें वर्षांचा संक्षिप्त इतिहास; वीरसंवत् २४३४; श्रीदत्तप्रसाद, सोलापूर.

(३) कट्टा राजनिष्ठ-देशभक्त राठोड वीर दुर्गादास; ऐ० सचित्र गद्य

नाटक [ द्विजेंद्रलाल रॉयकृत ' दुर्गादास'चे आधारें ]; १९१६; सरसवाङ्मयरत्नमाला; पुणें.

(४) ब्रह्महत्या; ऐ० कादंबरी; [ 'महाराज नंदकुवरकी फाँसी' या हिंदी कादंबरीचा अनुवाद. ] १९२४; सरसवाङ्मयरत्नमाला, पुणें.

(५) राजसंसार अथवा शहाजादा खुसरु, [ बाबू हरिसधन मुकर्जीकृत ' खुसरु'चें रूपांतर ]; ऐ० कादंबरी; १९१९; सरसवाङ्मयरत्नमाला; पुणें.

(६) लाल गुलाब; ऐ० कादंबरी; १९२२; सरसवाङ्मयरत्नमाला; पुणें.

(७) साठ वर्षांपूर्वी अर्थात् १८५७ सालचें कानपूर येथील बंड; ऐ० कादंबरी; १९१७; सरसवाङ्मयरत्नमाला; पुणें.

(८) सुलतान रझिया; ऐ० कादंबरी; १९२३; सरसवाङ्मयरत्नमाला; पुणें.

(९) कुमुदचंद्र अथवा वटसंशोधन; सा० कादंबरी; १९२२; सरसवाङ्मयरत्नमाला; पुणें.

(१०) नीरजा व भुताटकी; सा० कादंबरी; १९१४; सरसवाङ्मयरत्माला; पुणें.

(११) परकायाप्रवेश, सा० कादंबरी; १९३०; सरसवाङ्मयरत्नमाला; पुणें.

(१२) प्रभुपाठिराखा अथवा एकनिष्ठ प्रेमाची कसोटी; १९१८; सरसवाङ्मयरत्नमाला; पुणें.

(१३) नरवीर नेपोलियन–गोष्ट ३ री; ऐ० कथा; १९२१; सरसवाङ्मयरत्नमाला; पुणें.

(१४) महात्मा गांधी यांनीं लिहिलेला ' स्वतःचा कारागृहवास, ' भाषांतर १९१७; सरसवाङ्मयरत्नमाला पुणें.

**पांगारकर, लक्ष्मण रामचंद्र** [ १८७२–१९४१ ] प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहासकार, संतचरित्रलेखक, भागवतधर्मप्रचारक, रसाळ वक्ता. चिपळूण येथें जन्म. सोलापूर जिल्ह्यांतील बार्शी तालुक्यांत पांगरी या नांवाचें गांव आहे, तें यांच्या घराण्याचें मूळ ठिकाण. प्रस्तुत चरित्रनायकाचे आजे नारायण हे, व्यंकटेश, रामचंद्र, कृष्ण, सदाशिव व बापू या आपल्या पांच पुत्रांसह पुणें प्रांतीं आले व पुढें पौड येथें

कायमचे राहिले. वरील बंधूंपैकीं कृष्णाजीपंत यांस दोन पुत्र व एक कन्या झाली. वडील पुत्र सखाराम व धाकटा लक्ष्मण. लक्ष्मण यांस त्यांचे चुलते रामचंद्र यांनीं दत्तक घेतलें. लक्ष्मणरावांचें प्राथमिक मराठी शिक्षण पौड येथें झालें. माध्यमिक व उच्च शिक्षण पुणें येथें न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन कॉलेज यांत झालें. प्रो. वामन शिवराम आपटे, प्रो. वासुदेवराव केळकर, प्रो. गोपाळ कृष्ण गोखले, प्रि. गोपाळ गणेश आगरकर यांच्यासारख्या नामवंत अध्यापकांच्या हाताखालीं त्यांचें अध्ययन झालें. घरची अत्यंत गरिबी असून, स्वावलंबनानें, काबाडकष्ट करून यांनीं शिक्षण संपादन केलें. १८९९ सालीं ते मुंबई विश्वविद्यालयाची बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाले. एम्. ए. च्याहि परीक्षेला ते पुढें बसले होते, परंतु शेक्सपिअरच्या एका उत्तरपत्रिकेमध्यें चार गुण कमी पडल्यामुळें ते ती उत्तीर्ण होऊं शकले नाहींत. पुन्हां परीक्षेच्या नादास ते लागले नाहींत. बी. ए. झाल्यावर पंढरपूर हायस्कुलांत त्यांस पन्नास रुपये पगाराची फर्स्ट असिस्टंटची जागा मिळाली. पंढरपुरीं असतां, तेथें असलेल्या कवि मोरोपंत यांच्या वंशजांशीं त्यांची ओळख होऊन, त्यांच्या संग्रहीं असलेलें पंतांचें दप्तर व त्यांची स्वहस्तलिखित कविता त्यांस पहावयास मिळाली, हा त्यांना मोठाच लाभ झाला. शिवाय, पंढरपुरांत होणारे निरनिराळे उत्सव, भजन, कीर्तन वगैरे भक्तिवर्धक प्रकारांचा त्यांच्या मनावर फार परिणाम झाला व ते श्रीपांडुरंगाचे निस्सीम उपासक झाले. ते जरी सर्वच साधुसंतांचे चाहते होते तरी ज्ञानदेव-तुकोबांच्या वारकरीसंप्रदायाकडेच त्यांची विशेष प्रवृत्ति होती व ते स्वतःस वारकरी म्हणवून घेत असत.

१९०४ ऑक्टोबरमध्यें पांगारकरांनीं पंढरपूर सोडलें व पुणें येथील भावे स्कूलमध्यें ते शिक्षक म्हणून काम करूं लागले. तेथें ते आठ महिने होते. नंतर कै. दादासाहेब खापर्डे यांच्या बोलावण्यावरून ते उमरावतीस, तेथील राष्ट्रीय शाळेच्या मुख्याध्यापकाच्या जागेवर गेले. उमरावतीस त्यांचें वास्तव्य एक वर्ष झालें. पुढें १९०७ सालीं धुळ्यास येऊन तेथें त्यानीं आपलें प्रसिद्ध 'मुमुक्षु' साप्ताहिक सुरू केलें; परंतु प्रकाशनाच्या दृष्टीनें धुळें गैरसोयीचें वाटल्यामुळें 'मुमुक्षु'ची कचेरी त्यांनीं चार महिन्यांनीं पुण्यास आणली. 'मुमुक्षु' साप्ताहिक

त्या वेळीं बरेंच लोकप्रिय झालें होतें. तरी पण पहिलीं पांच वर्षें पांगारकरांस फार कष्टाचीं गेलीं. 'जमाखर्चाची तोंडमिळवणी न होतां कर्ज वाढतच चाललें.' राजकारणांत पांगारकर हे लो. टिळकांचे अनुयायी होते व टिळकांचीहि त्यांच्यावर कृपा असे. १९०७ सालच्या चळवळीच्या वेळीं 'रामदासी बोवा' या नांवाची एक लेखमाला पांगारकरांनीं मुमुक्षूंत लिहिली, त्यांतील विचार जहाल असल्यामुळें सरकारचा त्यांच्यावर रोष झाला, व त्यांना पकडणार अशीहि बातमी पुण्यांत उठली होती. परंतु ती खोटी ठरली, मात्र 'रामदासीबोवा' हें पुस्तक सरकारानें जप्त केलें. तेव्हांपासून पांगारकरांनीं राजकारणाचा नाद सोडून दिला. १९१६ सालीं इंदूरचे त्या वेळचे महाराज सर तुकोजीराव होळकर यांनीं त्यांस इंदुरास बोलावलें व तेथें त्यांची दरमहा अडीचशें रुपये पगारावर परमार्थशिक्षक म्हणून नेमणूक केली. इंदूरशीं हा त्यांचा संबंध तीन वर्षें टिकला, त्यांपैकीं सरासरी दीड वर्षेच त्यांचें वास्तव्य इंदुरांत झालें. इंदुरास जाण्यापूर्वी, त्यांच्या तुकारामचरित्राच्या छपाईखर्चासाठीं सर तुकोजीराव महाराज होळकर यांनीं त्यांस तीन हजार रुपये दिले होते. पांगारकरांनीं इंदूर सोडल्यावर महाराजांनीं त्यांस बक्षिसादाखल पंधराशें रुपये पाठविले. पांगारकरांचा मुक्काम इंदुरास असतांना पुण्यांत 'मुमुक्षू'चें काम त्यानीं श्री. माधव गोविंद भिडे यांजकडे सोंपविलें होतें. पगाराशिवाय इंदुराधिपति सर तुकोजीराव होळकर यांजकडून पांगारकरांस १९२३ सालीं एकंदर एकतीस हजार रुपये मिळाले !

'मुमुक्षु' पत्र आरंभीं पुष्कळ वर्षें साप्ताहिक होतें, तें पांगारकरांनीं पुढें मासिक केलें. 'मुमुक्षू'च्या या व्यवहारांत पांगारकरांस द्रव्यलाभ फारसा झाला नाहीं, उलट पांच–सहा हजार रुपये नुकसानच सोसावें लागलें, असें त्यानीं आत्मचरित्रांत लिहिलें आहे. शेवटचीं कांहीं वर्षें ते नासिक येथें जाऊन राहिले होते. त्यांच्या आयुष्याचीं शेवटचीं दोन तीन वर्षें अनेक भयंकर रोगांशीं झगडण्यांत गेलीं व शेवटीं वर्धा येथें ता. १० नोवेंबर १९४१ रोजीं ते दिवंगत झाले. त्यांच्या मृत्यूनें, ज्याची जागा पुढें कधींहि भरून येणार नाहीं असा जुन्या मराठी वाङ्मयाचा एक निस्सीम उपासक नाहींसा झाला यांत मुळींच संशय नाहीं.

पांगारकरांची पहिल्या प्रतीच्या मराठी लेखकांत गणना होते. वक्ता या नात्यानेंहि, गेल्या पन्नास वर्षांत होऊन गेलेल्या वक्त्यांत त्यांची गणना प्रमुख स्थानीं करावी लागेल. त्यांची मराठी भाषा शुद्ध, सुसंस्कृत, वक्तृत्वपूर्ण आणि इंग्रजीचा संस्कार न झालेली अशी अस्सल मराठी आहे. सुमारें ४५ वर्षांच्या कालांत त्यानीं २५००० पृष्ठें भरतील इतका मजकूर लिहिला यावरून त्यांचें लेखनप्रभुत्व व लेखनप्राचुर्य सिद्ध होतें. संतवाङ्मयावर व्याख्यान देतांना ते त्या विषयाशीं इतके तादात्म्य पावत कीं पुष्कळ वेळां प्रेमाश्रूंनीं त्यांचे डोळे भरून येत व तासचे तास श्रोतेहि त्यांच्या भक्तिरंगांत दंग होऊन जात. जुन्या कवितेचें त्यांचें पाठांतर दांडगें होतें. जुन्या कवितेचें संशोधनहि त्यानीं बरेंच केलें. परंतु हें त्यांचें संशोधन, स्वतः त्यानींच एके ठिकाणीं म्हटलें आहे त्याप्रमाणें "दुधावरची साय जशी दुधांतच मिसळावी तद्वत् त्यांच्या ग्रंथांतच मिसळून गेलें आहे." आरंभीं आरंभीं त्यांचे अनेक संशोधनपर लेख 'केसरी' पत्रांत प्रसिद्ध झाले होते. नोकरी, तीर्थयात्रा, व्याख्यानें इत्यादिकांच्या निमित्तानें बृहन्महाराष्ट्रांतील अनेक स्थलीं त्यांना जावें लागलें व त्यामुळें त्या त्या ठिकाणीं किंवा त्याच्या आसमंतात् भागीं होऊन गेलेल्या संतकवींच्या चरित्रांविषयींचें व कवितेविषयींचें संशोधन करण्याची संधि त्यांस मिळाली. मुक्तेश्वराचें सौप्तिक पर्व मावळांत त्यांनींच शोधून काढलें. मोरोपंतांविषयीं त्यांनीं केलेलें संशोधन तर प्रसिद्धच आहे. निरंजन माधव कवीची बरीचशी अप्रसिद्ध कविता त्यांनींच प्रकाशित केली.

पांगारकरांनीं आपल्या वाङ्मयाच्या व वक्तृत्वाच्या जोरावर महाराष्ट्र ग्रंथकारांत एक स्वतंत्र स्थान मिळविलें. त्यांची जागा, तितक्या पूर्णत्वानें यापुढें कधींहि भरून निघणार नाहीं; कारण पांगारकरांसारखे पुरुष निर्माण होण्यास भावी काल अत्यंत प्रतिकूल आहे. पांगारकरांच्या संतविषयक वाङ्मयांत जेवढा श्रद्धेचा व भाविकपणाचा भाग आढळतो तेवढा चिकित्सकपणाचा आढळत नाहीं असा त्यांच्या वाङ्मयावर कांहीं लोकांचा आरोप आहे, परंतु माझ्या मतें, तो आरोप बहुतांशीं निराधार आहे. त्यांच्या मोरोपंतचरित्रांत, तुकारामचरित्रांत, मुक्तेश्वरावरील निबंधांत, आणि त्यांच्या महाराष्ट्र वाङ्मयाच्या इतिहासाच्या तीन्ही खंडांत कवींच्या स्थलकालादिकांच्या निर्णयार्थ त्यांनीं

पुष्कळ चर्चा आणि चिकित्सा केली आहे. मात्र चिकित्सेसाठीं चिकित्सा त्यांनीं फारशी केलेली नाहीं, हें खरें. तरी 'महाराष्ट्र सारस्वत'कारांप्रमाणें निराधार विधानेंहि त्यानीं फारशीं केलेलीं नाहींत. त्यांच्या संतविषयक वाङ्मयांतले ठळक दोष म्हटले म्हणजे पाल्हाळ, पुनरुक्ति, आणि वर्ण्य-विषयाशीं संबद्ध नसलेल्या गोष्टी विस्तारपूर्वक सांगण्याची प्रवृत्ति. या शेवटल्या दोषाचें ठळक उदाहरण म्हणजे मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या पहिल्या खंडांत जुन्या तामिळ वाङ्मयाची त्यानीं दिलेली माहिती हें होय. या अप्रस्तुत व अनावश्यक माहितीनें त्या ग्रंथाचीं कितीतरी पृष्ठें विनाकरण अडविलीं आहेत.

आतां, पांगारकरांच्या ग्रंथनिर्मितीकडे वळूं.

मुमुक्षु ह्या साप्ताहिकांत व मासिकांत पांगारकरांचे शेंकडो लेख येऊन गेले आहेत व त्यांतील बहुतेक लेख पारमार्थिक आहेत. कांहीं थोडेसे लेख राजकीय व सामाजिक विषयांवर आहेत. या लेखांपैकीं कांहीं निवडक लेख **'मुमुक्षूंतील निवडक निबंध'** या नांवानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले आहेत. पांगारकरांचें खरें हृद्गत व त्यांचीं मतें या त्यांच्या स्फुट लेखांतच व्यक्त झालीं आहेत. या लेखांवरून ते पक्के सुधारणाविरोधी आणि कट्टर सनातनी दिसतात, परंतु वय-परत्वें, कै० वामनशास्त्री लेल्यांप्रमाणें, त्यांच्या सामाजिक मतांत पुढें थोडासा बदल झाला होता. मुमुक्षूंत संशोधनपर लेखहि पुष्कळ आले आहेत. 'साप्ताहिक मुमुक्षु'च्या पहिल्या दोन वर्षांतील कांहीं लेख पुस्तकरूपानें छापले होते ते सरकारनें जप्त केले. **'रामदासी बोवा'** हेंहि पुस्तक जप्त झाल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. यांशिवाय, पहिल्यानें मुमुक्षूंत लेखरूपानें प्रसिद्ध होऊन मागाहून पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेले ग्रंथ, १ पारिजातकाचीं फुलें, २ सार्थ व सटीप नारदभक्तिसूत्रें, ३ नवविधा भक्ति, ४ संतचरित्रमाला, ५ भक्तिमणिमाला हे होत. मासिक मुमुक्षूंतील निवडक लेखांचेहि तीन भाग त्यानीं प्रसिद्ध केले आहेत. **'पारिजातकाचीं फुलें'** या पुस्तकांत लेखकानें स्वतःचे व इतरांचे पारमार्थिक स्फुट विचार ग्रथित केले आहेत. कांहीं आंग्ललेखकांचेहि विचार यांत सांपडतात हें विशेष. या पुस्तकाच्या तीन आवृत्त्या निघाल्या यावरून त्याची लोकप्रियता व्यक्त होते. **'सार्थ व सटीप नारदभक्तिसूत्रें'** या

पुस्तकाच्याहि चार आवृत्त्या निघाल्या. नारदांनीं ८४ सूत्रांत भक्तिमार्गाचें जें सूत्ररूपानें विवेचन केलें आहे त्याचें मराठी स्पष्टीकरण पांगारकरांनीं या पुस्तकांत फार विस्तारपूर्वक केलें आहे. भक्तिमार्गाची माहिती करून घेऊं इच्छिणाऱ्या मुमुक्षुजनांस हें पुस्तक अत्यंत उपयुक्त आहे. '**नवविधा भक्ति**' —श्रीमद्भागवतांत व भगवद्गीतेंत सांगितलेले भक्तीचे नऊ प्रकार—यांत सोदाहरण व साधुसंतांच्या अनेक आधारात्मक वचनांसह रसाळ भाषेंत वर्णिले आहेत. '**भक्तिमणिमाला**' हें पुस्तक बरेंच मोठें म्हणजे सुमारें २५५ पृष्ठांचें असून श्रीमद्भागवतांतील निवडक भक्तिविषयक श्लोक यांत सार्थ दिले आहेत. '**संतचरित्रमाला**' यांत ४३ प्राचीन व अर्वाचीन संतांचीं चरित्रें दिलीं आहेत. यांतील कांहीं चरित्रें अगदींच त्रोटक आहेत. प्रसिद्ध बंगाली वैज्ञानिक सर जगदीशचंद्र बोस यांचेंहि चरित्र या संतचरित्रमालेंत पांगारकरांनीं गोंवलें आहे !

पांगारकरांचें लेखन बव्हंशीं पारमार्थिक स्वरूपाचें आहे. त्यांचा पहिला मोठा ग्रंथ '**मोरोपंतचरित्र**' हा होय. त्यांच्या सर्व ग्रंथांत हाच ग्रंथ फार चांगला उतरला आहे. मोरोपंतांच्या वंशजांपाशीं व इतरत्र मिळालेल्या पंतचरित्रविषयक कागदपत्रांचा व पंतकाव्यांचा पूर्ण अभ्यास करून पांगारकरांनीं हा ग्रंथ मोठ्या रसिकतेनें लिहिला असल्यामुळें मराठींतील चरित्रग्रंथांत फार वरचें स्थान देण्याच्या लायकीचा तो उतरला आहे. याची पहिली आवृत्ति डेमी अष्टपत्री सांचाच्या ६२५ पृष्ठांची १९०८ सालीं निघाली. तिचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग असून, ९ प्रकरणांच्या पूर्वार्धांत, १८४ पृष्ठांत मोरोपंतांचें विस्तृत चरित्र दिलें आहे व पुढें उत्तरार्धांत, १० ते २१ प्रकरणांत पंतकाव्याचें विस्तृत विवेचन केलें आहे. पंतांचें चरित्र पांगारकरांनीं आपल्या रसाळ भाषेंत इतक्या सहृदयपणें लिहिलें आहे कीं तें वाचीत असतांना पंतांची मूर्ति आपल्या डोळ्यांपुढें सारखी वावरत असल्याचा भास होतो. दीडशें वर्षांपूर्वीच्या एका गृहस्थी बाण्याच्या मुमुक्षु कवीचें हें चरित्रचित्र पांगारकरांनीं फार कुशलतेनें आणि हळुवार हातानें रंगविलें आहे. या ग्रंथाचा उत्तरार्ध लक्षपूर्वक वाचल्यानें पंतकाव्याची चांगलीच ओळख वाचकास होईल यांत संशय नाहीं. आश्चर्याची गोष्ट ही कीं पांगारकरांनीं हें पंतचरित्र डेक्कन

व्हर्न्याक्युलर ट्रॅन्स्लेशन सोसायटीकडे पाठविलें असतां तिनें तें पारितोषिकास अपात्र ठरविलें! पांगारकरांनीं त्यांत जें पाध्येप्रकरण घातलें आहे, त्यामुळें पेशव्यांस कमीपणा आला, ही गोष्ट परीक्षकांस रुचली नाहीं!! या चरित्राची द्वितीयावृत्ति बरोबर २५ वर्षांनीं, १९४३ सालीं, निघाली. ह्या आवृत्तीची मुद्रणप्रत पांगारकरांनीं तयार केली त्या वेळीं अनेकप्रकारच्या आधिव्याधींनीं ते इतके पीडले होते कीं त्यांची मनःस्थिति नीट नव्हती. त्यामुळें प्रथमावृत्तींतला एकतृतीयांश मजकूर या द्वितीयावृत्तींत त्यांनीं गाळून टाकला होता. वादविवादास कारणीभूत झालेलें पाध्येप्रकरण तर त्यांनीं अजिबाद काढून टाकलें! परंतु गाळलेल्यापैकीं कांहीं मजकूर महत्त्वाचा व आवश्यक असतांहि केवळ ग्रंथविस्तारभयास्तव त्यांनीं तो गाळला आहे असें प्रस्तुत लेखकास दिसून आल्यामुळें, या आवृत्तीच्या संपादनाचे वेळीं संपादक या नात्यानें, त्यानें तो मजकूर कायम ठेवला.

पांगारकरांचें '**तुकारामचरित्र**' माहितीच्या दृष्टीनें वाचनीय आहे, परंतु मोरोपंतचरित्राची सरसता त्यांत नाहीं. तथापि पांगारकर हे वारकरी सांप्रदायी व संतभक्त असल्यामुळें तुकोबांचें हें चरित्र लिहितांना ते पुष्कळ ठिकाणीं तन्मय झाल्याचें दिसून येतें. तुकोबांचा गाथा व तुकोबांच्या चरित्रासंबंधानें उपलब्ध असलेलें बहुतेक सर्व जुनें नवें वाङ्मय यांचा चांगला अभ्यास करून हा चरित्रग्रंथ पांगारकरांनीं लिहिला आहे हें सकृद्दर्शनींच दिसून येतें. हा एक ग्रंथ वाचला असतां तुकारामबुवांसंबंधाची बहुतेक सर्व माहिती वाचकांस होईल. अनेक वादविषयक प्रश्नांचाहि ऊहापोह पांगारकरांनीं या ग्रंथांत विस्तारपूर्वक केला आहे. मात्र त्यानीं काढलेले सर्वच निष्कर्ष सर्वांसच मान्य होतील असें नाहीं. तुकोबांच्या वह्या पाण्यांत सुरक्षित राहिल्या, तुकोबा सदेह वैकुंठास गेले किंवा गुप्त झाले वगैरे अलौकिक चमत्कार पांगारकरांनीं खरे मानले आहेत. तुकोबांची पारमार्थिक उन्नति कसकशी होत गेली व तत्प्रीत्यर्थ त्यांनीं कोणकोणते उपाय योजले यासंबंधाचें त्यांनीं केलेलें विवेचन वाचनीय आहे. तात्पर्य, तुकारामचरित्रावर यापुढें जरी आणखी अनेक ग्रंथ झाले तरी हें पांगारकरकृत 'तुकारामचरित्र' मराठी वाङ्मयांत दीर्घकाल टिकून राहील यांत संशय नाहीं.

पांगारकरांचें '**ज्ञानदेवचरित्र**' हि बरेंच विस्तृत आहे, परंतु त्यांत दिलेली बहुतेक सर्व माहिती जुन्या संतकवींनीं पूर्वींच लिहून ठेवलेल्या पद्यात्मक ज्ञानदेवचरित्रांतून जशीचीतशी उतरून घेतलेली असल्यामुळें, त्यांत फारसें नावीन्य नाहीं. सश्रद्ध अंतःकरणानें, अत्यंत रसाळ आणि प्रेमळ भाषेंत कथाभाग खुलवून सांगण्याची त्यांची हातोटी मात्र अपूर्व आहे. उपलब्ध असलेल्या सर्व ज्ञानदेवचरित्रांत हें पांगारकरकृत चरित्रच, माहितीच्या व भाषेच्या दृष्टीनें, विशेष वाचनीय आहे यांत संशय नाहीं. त्यांच्या '**एकनाथचरित्रा**'-सहि हेंच वर्णन लागू पडण्यासारखें आहे. '**मुक्तेश्वरा**'वरील त्यांचा प्रबंधहि वाचनीय आहे. उपरिनिर्दिष्ट चारी चरित्रग्रंथ लिहितांना पांगारकरांनीं, चरित्रनायकांसंबंधाच्या दंतकथा आणि अलौकिक चमत्कारांच्या गोष्टी यांचा जरी भरपूर उपयोग केला आहे तरी अर्वाचीन संशोधनपद्धतीचा आणि चिकित्सकतेचा त्या ग्रंथांत अगदींच अभाव आहे असें नाहीं. उलट संशोधन आणि चिकित्सा यांचाच भाग त्यांत अधिक आहे. कवीचा काल, त्याची परंपरा, त्याचे समकालीन कवि वगैरे माहिती त्यानीं शक्य तितक्या प्रयत्नानें मिळवून दिली आहे. संतचरित्रलेखनाची महीपतिप्रभृति जुन्या लेखकांची तऱ्हा आणि आंग्लवाङ्मयाच्या परिचयामुळें अलीकडे रूढ झालेली चिकित्सकपद्धति यांचा सुंदर मिलाफ पांगारकरकृत संतचरित्रग्रंथांत झाला आहे. पांगारकर हे अगदीं जुन्या मताचे एक भाविक लेखक असल्यामुळें त्यांचीं संतचरित्रेंहि अगदीं जुन्या पद्धतीचीं आणि अंधश्रद्धेनें भरलेलीं भारुडें असतील अशी, पूर्वग्रहदूषिततेमुळें, जर कोणी स्वतःची समजूत करून घेतील तर ती त्यांची मोठी चुकी होईल.

'मोरोपंती वेंचे' या पुस्तकांत पांगारकरांनीं बहुतेक सर्व पंतकाव्यांतील सुंदर उतारे दिले आहेत. पंतांची समग्र कविता वाचणें हें हल्लींच्या काळीं जवळजवळ अशक्य आहे. अशा स्थितींत, निदान हे मोरोपंती वेंचे तरी सर्व साक्षर लोकांनीं एकवार अवश्य वाचावे. तसें केल्यानें पंतांच्या कवितेची माधुरी अल्प श्रमांत आणि कालांत त्यांस सुलभतेनें चाखतां येईल. आरंभींची ३४ पृष्ठांची विस्तृत प्रस्तावनाहि अवश्य वाचण्यासारखी आहे. कठिण शब्दांवर टीपा दिलेल्या असल्यामुळें अर्थबोध सुलभ झाला आहे.

'ज्ञानेश्वरांची प्रभावळ' या ग्रंथांत ज्ञानदेव आणि त्यांचे २९ समकालीन कवि यांच्या काव्यांतील निवडक उतारे दिले आहेत. ग्रंथाचा बराच भाग 'ज्ञानेश्वरी' व 'अमृतानुभव' यांतील वेंच्यानीं व्यापला असून, हे वेंचे फार कसोशीनें आणि सहृदयतापूर्वक निवडलेले आहेत. त्यानंतर, ज्ञानदेव व इतर कवि यांचे जे निवडक अभंग दिले आहेत त्यांतील कांहीं अभंगांचें कर्तृत्व खरोखरच त्या त्या कवींकडे देतां येईल कीं काय याची शंका वाटते. उदाहरणार्थ, प्रसिद्ध 'हरिपाठाचे अभंग' हे ज्ञानदेवांचे म्हणून दिले आहेत, परंतु ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेवांचे ते खरोखरच आहेत कीं दुसऱ्या एखाद्या अर्वाचीन कवीनें ज्ञानदेवांचें नांव घालून ते रचले आहेत, हा मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. ज्ञानेश्वरीच्या भाषेपेक्षां या अभंगांची भाषा इतकी सोपी आणि अर्वाचीन दिसते, आणि अभंगांची रचनाहि इतकी खडबडीत दिसते कीं त्यांचें जनकत्व ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानदेवांकडे देण्यास संशोधकांचें मन जरा कचरल्याशिवाय राहणार नाहीं. तथापि हा वादाचा व कदाचित् मतभेदाचाहि प्रश्न असल्यामुळें, ज्ञानदेवांचे म्हणून हे हरिपाठाचे अभंग या ग्रंथांत समाविष्ट केल्याबद्दल पांगारकरांस दोष देणें उचित होणार नाहीं. उलट त्यांनाच परंपरेचा पाठिंबा आहे. ज्ञानदेव व त्यांचे समकालीन २८ कवि यांच्या काव्योदधीचें मंथन करून हें जें नवनीत पांगारकरांनीं तयार केलें आहे तें त्या सर्व कवींच्या कवितेची थोडक्यांत ओळख करून घेण्यास फार उपयुक्त आहे, यांत संशय नाहीं. आरंभीं दिलेली ७१ पृष्ठांची प्रस्तावना म्हणजे एक स्वतंत्र पुस्तकच आहे, व त्यांत अनेक पारमार्थिक विषयांचें गोड भाषेंत विस्तृत विवेचन केलें आहे.

'कविरामायण': हें पद्यात्मक रामायण अनेक संस्कृत व प्राकृत रामायणें आणि रामायणांतील स्फुट आख्यानें यांतील वेंचे संगतवार देऊन मोठ्या खुबीनें तयार केलें आहे.

'श्रीतुकारामचरितामृत' हें अभंगबद्ध तुकारामचरित्र पांगारकरांनीं अगदीं रंगून लिहिलें आहे. अभंगांची रचना अगदीं थेट जुन्या कवींच्या अभंगांसारखी आहे.

'निबंधमालेचें स्वरूप व कार्य': हा पांगारकरांचा ६४ पृष्ठांचा सुंदर भाषेंत लिहिलेला निबंध वाचनीय आहे. निबंधमालाकारांविषयीं जरी अनेक लेखकांनीं अनेक लेख लिहिले आहेत तरी पांगारकरांच्या या निबंधाला एक प्रकारचें वैशिष्टय आहे. जुन्या पिढीच्या विद्वानांचें 'माला'करांविषयीं काय मत होतें हें या निबंधाच्या वाचनानें कळून येण्यासारखें आहे. 'माला'-कारांविषयींच्या अंधभक्तीनें पांगारकरांनीं हा निबंध लिहिलेला नाहीं; त्यांच्या लेखनांतील गुणदोषांचें दिग्दर्शन त्यांनीं समतोलपणानें केलें आहे. मालाकारां-विषयीं, निबंधाच्या शेवटीं, त्यांनीं जो अभिप्राय व्यक्त केला आहे, त्याच्या यथार्थत्वाविषयीं कोणाचा मतभेद होईल असें वाटत नाहीं. ते म्हणतात: "मालेंतले लेख अत्यंत खोल व गूढ विचाराचे आहेत असें नाहीं, मालाकारांचीं मतें व सिद्धांत सर्वच निरपवाद आहेत असेंहि नाहीं, तथापि त्यांची ईश्वरदत्त रसिकता, बहुश्रुतपणा, विनोदपरता या गुणांमुळें त्यांच्या वाणींत जो चटकदारपणा आला आहे, प्रतिपक्षाशीं झगडतांना शक्य तितका समतोलपणा व प्रांजळपणा संभाळून त्यांनीं जो विलक्षण कोटिक्रम उपयोजिला आहे, व सर्वांत मुख्य गोष्ट कीं आमूलाग्र प्रत्येक लेखांत त्यांचा उज्ज्वल देशाभिमान जो व्यक्त झाला आहे, त्यामुळें 'निबंधमाला' ही मराठी वाङ्मयांत आपलें शाश्वतपद संभाळील याविषयीं शंका नाहीं." शास्त्रीबुवांच्या कट्टर द्वेष्टयासहि पांगारकरांचा हा अभिप्राय मान्य करावा लागेल असें मला वाटतें.

'मराठी भाषेचें स्वरूप': हें पांगारकर यांचें अगदीं पहिलें पुस्तक; कोल्हापूर येथील 'ग्रंथमाला' मासिकांत हा निबंध पहिल्यानें प्रसिद्ध झाला व नंतर तो पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आला. यांत, निबंधलेखनकाला-पर्यंतच्या ६०० वर्षांत झालेल्या मराठी वाङ्मयाचें थोडक्यांत समीक्षण करण्यांत आलें आहे; व लेखकास जे ग्रंथ उत्कृष्ट वाटले त्यांची यादी त्यानें शेवटीं दिली आहे. पांगारकरांचे आवडते ग्रंथ कोणते होते हें या यादीवरून समजतें.

'महाभारताचे मराठी अवतार': या छोट्या निबंधांत, महा-भारतावर जुन्या मराठी कवींनीं केलेल्या ग्रंथरचनेची माहिती दिली आहे.

'मराठी वाङ्मयाचा इतिहास': या प्रचंड ग्रंथाचे तीन खंड पांगारकरांनीं लिहिले असून कालक्रमानें त्यांची विभागणी केली आहे. पहिल्या खंडांत ज्ञानदेव-नामदेव व त्यांचे समकालीन कवि, दुसऱ्या खंडांत एकनाथ–तुकाराम व त्यांचे समकालीन कवि यांची व तिसऱ्या खंडांत रामदासी कर्वींची माहिती दिली आहे. तिन्ही खंडांची पृष्ठसंख्या २४५० आहे. 'स्वराज्यांतील कवि' हा चौथा खंड लिहून हा प्रचंड ग्रंथ पुरा करण्याचा पांगारकरांचा विचार होता, परंतु तो सिद्धीस जाण्यापूर्वींच दुर्दैवानें त्यांस काळानें गांठलें. तिसरा 'रामदास' खंडदेखील त्यांस स्वतः पुरा करतां आला नाहीं; त्याचीं शेवटचीं १२९ पृष्ठें लिहून प्रस्तुत लेखकास तो पुरा करावा लागला. जुन्या कवींच्या चरित्रांची व त्यांच्या कवितेची इतकी विस्तृत माहिती देणारा दुसरा ग्रंथ मराठींत नाहीं. ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, मुक्तेश्वर यांचीं स्वतंत्र चरित्रें पांगारकरांनीं पूर्वींच लिहिलीं होतीं तीं, हा ग्रंथ लिहितांना आयतींच त्यांच्या उपयोगीं पडलीं. पहिल्या खंडांत, वेदविद्या, उपनिषदांतील ब्रह्मविद्या, भगवद्गीता, भक्तिमार्गाचें अनादित्व व शिव-विष्णु-संप्रदाय, मधल्या काळाचा थोडा इतिहास व तामीळ साम्राज्य व तामीळ संत या सकृद्दर्शनीं अनावश्यक वाटणाऱ्या विषयांनीं या खंडाचीं पहिलीं ३०० पृष्ठें अडविलीं आहेत. माहितीच्या दृष्टीनें हीं प्रकरणें उपयुक्त आणि वाचनीय आहेत यांत संशय नाहीं, परंतु मराठी वाङ्मयाशीं त्यांचा साक्षात् संबंध फारसा नाहीं. भगवद्गीता व भागवत यांवर जुन्या कवींनीं पुष्कळ ग्रंथरचना केली आहे म्हणून जर त्या ग्रंथांवर स्वतंत्र प्रकरणें लिहावयाचीं तर रामायण आणि महाभारत यांवर देखील जुन्या कवींनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत, मग त्यावर स्वतंत्र प्रकरणें कां नकोत? तामीळांचें साम्राज्य, तामीळ संत व तामीळ आचार्य हें या खंडांतलें ७२ पृष्ठांचें प्रकरण तर अगदींच अस्थानीं आणि अनावश्यक आहे. तामीळ कवींची माहिती जर मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत द्यावयाची तर हिंदी, बंगाली, गुजराथी, कानडी आणि आंध्र कवींचीहि माहिती देण्यास कोणती हरकत? तात्पर्य, तामीळ कवींचें हें प्रकरण पांगारकरांनीं या ग्रंथांत अगदीं विनाकारण घुसडलें आहे. अशा रीतीनें वरील सात अनावश्यक विषयांनीं या ग्रंथाचीं ३०० पृष्ठें

ग्रंथकारानें अडविलीं आहेत तीं त्यानें अडविलीं नसतीं तर या पहिल्याच खंडांत एकनाथ–तुकारामादि कवींची माहिती त्यांना देतां आली असती व त्यामुळें ग्रंथाचा एक खंड कमी झाला असता. आतां वरील प्रकरणांत देण्यांत आलेली माहिती पांगारकरांनीं फार परिश्रमपूर्वक दिली आहे व ती अवश्य वाचनीय आहे ही गोष्ट मात्र खरी. या पहिल्या खंडाच्या उत्तरार्धांत आलेल्या महाराष्ट्र देश व मराठे लोक, महाराष्ट्री उर्फ मराठी भाषा, आदिकवि मुकुंदराज, महानुभवी वाङ्मय, नाथपरंपरा, ज्ञानेश्वरदर्शन, भक्त नामदेव (पूर्वार्ध), संतमेळा व त्यांचें वाङ्मय, ज्ञानेश्वरीचें अंतरंग, ज्ञानेश्वरी सृष्टि व भक्त नामदेव (उत्तरार्ध) हीं प्रकरणें एकाहून एक सरस आहेत. परंतु ज्ञानेश्वरीचें अंतरंग व ज्ञानेश्वरी सृष्टि हीं प्रकरणें 'ज्ञानेश्वरी दर्शन' या प्रकरणापुढें क्रमानें द्यावयास पाहिजे होतीं. त्याचप्रमाणें भक्त नामदेव (पूर्वार्ध) ह्या प्रकरणानंतर मध्येंच संतमेळा व त्याचें वाङ्मय हें प्रकरण दिलें आहे, तें तेथें न देतां, भक्त नामदेव–पूर्वार्ध व उत्तरार्ध एकत्र देऊन, नंतर दिलें पाहिजे होतें. नामदेव व त्यांचे समकालीन संत यांचे जे थोडेसे अभंग पांगारकरांनीं या ग्रंथांत उद्धृत केले आहेत ते सर्व खरोखर त्यांचेच आहेत कीं मागाहून त्यांच्या नांवांवर ते कोणीतरी घुसडून दिले आहेत याचा फारसा विचार त्यांनीं केल्याचें दिसत नाहीं. 'ज्ञानेश्वरांचें' अंतरंग आणि 'ज्ञानेश्वरी सृष्टि' हीं या खंडांतलीं दोन प्रकरणें ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकांस उपयुक्त आहेत.

'मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड दुसरा' यांत एकनाथ, तुकाराम व त्यांचे समकालीन कवि यांची माहिती दिली आहे. मागें सांगितल्याप्रमाणें पांगारकरांनीं आपल्या एकनाथचरित्र, तुकारामचरित्र व मुक्तेश्वरचरित्र या तीन पुस्तकांतील बराचसा मजकूर या खंडांत समाविष्ट केला आहे. तथापि यांत नवीन माहिती मुळींच नाहीं असें नाहीं. इतर कविचरित्र लेखकांनीं सर्वच कवींच्या वास्तव्यस्थानीं स्वतः जाऊन संशोधन केलेलें नाहीं, परंतु पांगारकरांनीं मात्र तसें संशोधन केलें होतें व त्याचा भरपूर उपयोग मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे हे तीन खंड लिहितांना त्यांनीं केला आहे व त्यामुळें त्यांच्या या ग्रंथास एकप्रकारचें वैशिष्टय प्राप्त झालें आहे. अनावश्यक किंवा अप्रस्तुत विषयावर पाल्हाळात्मक लेखन हा जो पांगारकरी वाङ्मयाचा एक

ठळक दोष पूर्वी सांगितला आहे त्याचा आढळ या द्वितीय खंडांतहि झाल्या-शिवाय रहात नाहीं. उदाहरणार्थ, नृसिंहसरस्वती व दत्तसंप्रदाय हें प्रकरण पहा. माहितीच्या दृष्टीनें हेंहि प्रकरण वाचनीय आहे, परंतु वाङ्मयाच्या इतिहासापेक्षां महाराष्ट्राच्या धार्मिक इतिहासांत त्याचा समावेश विशेष शोभून दिसला असता. प्रस्तुत खंडांत एकनाथ, मुक्तेश्वर, त्र्यंबक, शिवकल्याण, दासोपंत आणि रमावल्लभदास या कवींच्या काव्याचें पांगारकरांनीं अत्यंत सहृदयतापूर्वक केलेलें रसाळ विवेचन आणि दिलेले निवडक उतारे वाचनीय आहेत. या कालांतल्या महानुभावी वाङ्मयावर, त्या विषयाचे तज्ञ श्री. यशवंत खुशाल देशपांडे यांनीं लिहिलेल्या ५४ पृष्ठांचा विस्तृत निबंध शेवटीं दिला आहे. त्यामुळें ग्रंथास पूर्णत्व आलें आहे. या खंडास पांगारकरांनीं ‘ एकनाथ–तुकारामांचा काल ’ असें नांव दिलें आहे, परंतु, महत्त्वाच्या मानानें, तुकोबांच्या वांट्यास आलेलीं ८० पृष्ठें जरा कमीच दिसतात.

‘ मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड तिसरा,’ यास ‘ रामदास खंड ’ असें नांव दिलें असून त्याचीं पृष्ठें सुमारें ८२५ आहेत ! आणि त्यांतलीं तीन चतुर्थांश पृष्ठें एकट्या समर्थांनीं व्यापलीं आहेत. तुकोबांस फक्त ८० पृष्ठें आणि समर्थांस ६०० हून अधिक ! ही प्रमाणविहीनता खरोखर असमर्थनीय आहे. तुकोबांचें स्वतंत्र मोठें चरित्र पांगारकरांनीं लिहिलें आहे तसें समर्थांचें त्यांनीं लिहिलेलें नाहीं हें याचें कारण असेल असें म्हणावें तर ज्ञानदेव आणि एकनाथ यांचीं स्वतंत्र चरित्रें त्यांनीं लिहिलेलीं असतांहि त्या दोन्ही कवींस त्यांनीं प्रस्तुत ग्रंथांत अनुक्रमें १८६ व २५५ पृष्ठें दिलीं आहेत. तेव्हां एकंदरींत तुकोबांच्या बाबतींत पांगारकरांनीं हा थोडासा अन्यायच केला आहे असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. मात्र ही गोष्ट त्यांनीं बुद्धिपुरस्सर केली असेल असें म्हणणें योग्य होणार नाहीं. त्यांचा गबाळेपणाच याला कारणीभूत झाला असला पाहिजे यांत संशय नाहीं. पांगारकरांचा हा रामदासखंड म्हणजे श्रीसमर्थ रामदास आणि त्यांच्या संप्रदायांत होऊन गेलेले कवि यांच्या चरित्रांचा आणि कवितेचा एक ज्ञानकोशच आहे. समर्थांच्या प्रमुख ग्रंथांचें विवरण या खंडांत पांगारकरांनीं इतक्या विस्तारानें आणि अधिकारयुक्त वाणीनें केलें आहे कीं श्रीसमर्थभक्त श्री. शंकर श्रीकृष्ण

देव यांचा याच विषयावरील ' श्रीसमर्थहृदय ' हा ग्रंथहि यापुढें थोडासा फिका वाटतो. प्रस्तुत खंडाचीं ६६३ पृष्ठें लिहून झाल्यावर पांगारकर इतके थकून गेले कीं ग्रंथाचा पुढील भाग लिहिण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं राहिलें नाहीं व म्हणून प्रकृत लेखकास, शेवटचीं १२९ पृष्ठें लिहून तो भाग पुरा करावा लागला. हा रामदासखंडच पांगारकरांचा शेवटचा ग्रंथ होय. ' स्वराज्यांतील कवि ' या नांवाचा चौथा खंड लिहून हा मराठी वाङ्मयाचा इतिहास पुरा करण्याची त्यांची इच्छा होती, परंतु त्यांच्या अकाल निधनामुळें, ती अपूर्ण राहिली.

पांगारकरांनीं लहानमोठीं तीस–चाळीस पुस्तकें लिहिलीं, परंतु त्यानींच, आपल्या आत्मचरित्रांत म्हटल्याप्रमाणें त्या पुस्तकांपैकीं, मोरोपंतचरित्र, ज्ञानेश्वरचरित्र, एकनाथचरित्र, तुकारामचरित्र, मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे तीन खंड व ' चरित्रचंद्र ' हें त्यांचें आत्मचरित्र हीं आठ पुस्तकें मराठी वाङ्मयांत दीर्घकाल टिकून राहतील.

' चरित्रचंद्र ' या नांवानें त्यांनीं जें आत्मचरित्र लिहिलें आहे त्याचीं सुमारें ५५० पृष्ठें असूनदेखील तें थोडेंसें त्रोटकच दिसतें; याचे कारणहि प्रस्तावनेंत त्यांनींच सांगितलें आहे. सुमारें ९०० पृष्ठें होतील येवढें मोठें हें आत्मचरित्र त्यांनीं लिहिलें होतें, परंतु त्यामुळें तें दोन भागांत छापावें लागेल अशी भीति उत्पन्न झाल्यामुळें सुमारें ४०० पृष्ठांचा मजकूर त्यांनीं कमी केला व तसें करतांना ठिकठिकाणचा बराच महत्त्वाचा मजकूर, विशेष काळजी न घेतां, एकदम छाटून टाकल्यामुळें, त्या सुंदर ग्रंथाला हा त्रोटकपणा आला आहे; व त्यामुळें कित्येक स्थलीं, सुसंगतपणाच्या अभावीं, वाचकांस थोडेंसें चुकल्या-चुकल्यासारखें वाटतें. हा दोष वजा केल्यास पांगारकरांचें हें आत्मचरित्र एखाद्या सुंदर सामाजिक कादंबरीसारखें मनोरंजक उतरलें आहे. 'कांहीं कांहीं सत्यकथा काल्पनिक कथांपेक्षांहि चमत्कृतिपूर्ण आणि मनोरंजक असतात ' अशा अर्थाचें इंग्रजींत जें एक वचन आहे त्याची यथार्थता पांगारकरांच्या या आत्मचरित्रांत पुष्कळ ठिकाणीं प्रतीत होते. ग्रंथाची भाषा खेळकर, प्रसन्न आणि अगदीं 'घरगुती' असल्यामुळें पुस्तक वाचतांना वाचक सहज रंगून जातो. आगरकर, टिळक, जिनसीवाले, प्रि. आपटे, प्रो. केळकर, खापर्डे, ना. गोखले, शिवरामपंत

परांजपे वगैरे तत्कालीन थोर पुरुषांशीं पांगारकरांचा साक्षात संबंध असल्या-मुळें, प्रसंगानुरोधानें, त्यांचीं जीं त्रोटक शब्दचित्रें त्यांनीं रेखाटलीं आहेत तीं नवीन पिढीच्या वाचकांस कुतूहलपूर्ण वाटतील. ग्रंथ वाचीत असतांना, पांगारकरांनीं सर्वत्र स्वतःचा मोठेपणाच सांगितला आहे असें वाटतें, परंतु सांगितलेल्या गोष्टी जर असत्य नसतील तर आत्मस्तुतीच्या दोषाची तीव्रता विशेष आहे असें मानण्याचें कारण नाहीं. आतां, आपण नवसास पावलों अशा प्रकारच्या सकृद्दर्शनींच हास्यास्पद दिसणाऱ्या ज्या थोड्याशा गोष्टी पांगारकरांनीं दिल्या आहेत, त्यामुळें हा चरित्रचंद्र जरा कलंकित झाला आहे यांत संशय नाहीं. पांगारकरांचें हें आत्मचरित्र लक्षपूर्वक वाचल्यावर एक गोष्ट मात्र ठळकपणें लक्षांत येते आणि ती ही कीं पांगारकर हे शेवटपर्यंत मुमुक्षु ते मुमुक्षूच राहिले, त्यांच्यापुढची पायरी त्यांना गांठतां आली नाहीं. या आत्मचरित्रांत कांहीं फेरफार करून त्याची पुनरावृत्ति काढण्याचा पांगार-करांचा विचार असावा असें वाटतें. अशा प्रकारचे फेरफार जींत केले आहेत अशी सदर ग्रंथाची एक प्रत, ते दिवंगत झाल्यावर, त्यांच्या चिरंजीवानीं मजकडे पाठविली होती व ती अद्याप माझ्या संग्रहीं आहे. 'चरित्रचंद्रा'चें 'मोरोपंतचरित्र व त्याचे टीकाकार' हें ९ वें प्रकरण, या दुरुस्त केलेल्या प्रतींत, पुरवणी म्हणून ग्रंथाच्या शेवटीं छापण्याची सूचना केली आहे ! मूळ चरित्राचीं जीं चारशें पृष्ठें ग्रंथविस्तारभयास्तव पांगारकरांनीं कमी केलीं तीं जर उपलब्ध होण्यासारखीं असतील तर त्यांतला महत्त्वाचा मजकूर घालून व त्यांनीं सुचविलेल्या दुरुस्त्या करून, शक्य झाल्यास, पुढें मागें, या चरित्र-चंद्राची द्वितीयावृत्ति प्रसिद्ध करण्याचा प्रस्तुत लेखकाचा विचार आहे.

पांगारकरकृत ज्या ठळक पुस्तकांचा पूर्वी उल्लेख केला त्यांशिवाय '**समर्थ-संजीवनी**', '**आनंदलहरी**' वगैरे आणखी त्यांचीं कांहीं पुस्तकें आहेत. समर्थसंजीवनींत रामदासी कवितेंतील वेंचे दिले असून, 'आनंदलहरी' हा पांगारकरकृत कवितांचा संग्रह आहे. एकनाथ स्वामींचें 'आनंदलहरी' या नांवाचें एक ओंवीबद्ध प्रकरण प्रसिद्ध आहे व तें पांगारकरांच्या अवलोकनांत आलेंच असलें पाहिजे. अशा स्थितींत स्वकृत कवितासंग्रहास 'आनंदलहरी' हें नांव देण्यांत पांगारकरांनीं दाखविलेलें अनौचित्य क्षम्य आहे असें म्हणवत नाहीं.

असो. पांगारकर हे एक चांगल्यापैकीं अर्वाचीन कवि होऊन गेले. त्यांनीं पुष्कळ कविता रचिली असून तींतली बरीचशी या 'आनंदलहरीं'त आली आहे. कविता प्रसादपूर्ण आहे. जुन्या कवितेच्या सतताभ्यासामुळें सुलभतेनें सुश्लिष्ट पद्यरचना करण्याचें सामर्थ्य त्यांना प्राप्त झालें होतें. वाटेल त्या वृत्तांत अगदीं अल्पावकाशांत शेंकडों पद्यें ते द्रुतगतीनें रचीत असत. पांगारकरांच्या आर्या बाह्यतः थेट अगदीं पंतांच्या आर्यासारख्या आहेत. ह्या पांगारकरी कवितांचा एकंदर थाट मात्र जुन्या पद्धतीचा.

'एकनाथी भागवत' ह्या ग्रंथावर पांगारकरांनीं विस्तृत टीपा दिल्या असून त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत. निरंजन माधव कवीची बहुतेक सर्व उपलब्ध कविता पांगारकरांनीं तीन भागांत छापली असून, आरंभीं कविचरित्र दिलें आहे. पांगारकरांचा 'भक्तिमार्गप्रदीप' इतका लोकप्रिय झाला आहे कीं त्याच्या दोन लक्ष प्रति आज महाराष्ट्रांत घरोघरीं सांपडतील. 'समर्थ ग्रंथभांडार' या ग्रंथांत समर्थ रामदासस्वामींची बहुतेक कविता सटीप छापली आहे. 'रामदासीबोवा' व 'टिळकचरित्र व उक्ति' हीं पांगारकरांचीं दोन वाचनीय पुस्तकें ब्रिटिशांच्या अमदानींत सरकारजमा झालीं होतीं; नव्या राष्ट्रीय सरकारनें तीं बंधमुक्त केलीं. 'सार्थ दासबोध' हा ग्रंथ पांगारकरांनीं फार परिश्रमपूर्वक तयार केला आहे. दासबोधाचा अर्थ समजून घेऊं इच्छिणारांस हा ग्रंथ फार उपयुक्त आहे.

ज. र. आजगांवकर

**वाङ्मय :**

(१) मराठी वाङ्मयाचा इतिहास–खंड १ ला–ज्ञानेश्वर नामदेवांचा काल; १९३२; मुंबईवैभव; मुंबई.

(२) ,, ,, ,, –खंड २ रा–तुकारामांचा काल; १९३५; हनुमान प्रेस, पुणें.

(३) ,, ,, ,, –खंड ३ रा–रामदासांचा काल; १९३९

(४) मराठी भाषेचें स्वरूप, 'ग्रंथमाला' मासिकांतून प्रसिद्ध झालेलें प्रकरण.

(५) मोरोपंत: चरित्र व काव्यविवेचन; प्र. आ. १९०८, हिंद एजन्सी, मुंबई; १९४३, कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई.

(६) श्री ज्ञानेश्वर महाराज–चरित्र आणि ग्रंथविवेचन; १९१२

(७) कविवर्य मुक्तेश्वर–चरित्र व काव्यविवेचन; १९२२

(८) एकनाथ महाराजांचें संक्षिप्त चरित्र, १९११

(९) श्री तुकाराम चरित्र, १९२०, १९२७; के. भि. ढवळे, मुंबई.

(१०) संतचरित्रमाला, १९२२; हनुमान प्रेस, पुणें

(११) चरित्रचंद्र, [ आत्मवृत्त ], १९३८; हनुमान प्रेस, पुणें.

(१२) टिळकांचें अल्पचरित्र आणि संस्मरणीय उक्ति, १९०८

(१३) महाभारताचे मराठी अवतार, 'सरस्वतिमंदिर' मासिकांत प्रसिद्ध झालेलें प्रकरण;

(१४) मुमुक्षूचे उद्गार; १९०८; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(१५) ,, ,, भाग २ रा; १९०९; वंदेमातरम् छापखाना, पुणें.

(१६) मुमुक्षूचें सिंहावलोकन म्हणजेच मुमुक्षूंतील निवडक निबंध, भाग १ ला; शके १८४५; हनुमान प्रेस, पुणें.

(१७) ,, ,, ,, ,, ,, , भाग २ रा; शके १८४५; हनुमान प्रेस, पुणें.

(१८) ,, ,, ,, ,, ,, , भाग ३ रा; शके १८५१; हनुमान प्रेस, पुणें.

(१९) पारिजातकाचीं फुलें; प्रथमावृत्ति १९१३; तृ. आ. १९२१; हनुमान प्रेस, पुणें.

(२०) नवविधा भक्ति; द्वि. आ. १९२६; मुंबई वैभव छापखाना, मुंबई.

(२१) भक्तिमणिमाला; १९२४; जगद्धितेच्छु छापखाना, पुणें.

(२२) रामदासीबोवा, [ समर्थांच्या शिकवणींतील तत्त्वें; गद्य संवादरूप ]; शके १८२९; जगद्धिच्छु छापखाना, पुणें.

(२३) श्री मारुति-उपासना, १९०८; शारदा मुद्रणालय; पुणें.

(२४) श्री तुकारामचरितामृत ( अभंगात्मक ); शके १८४२;

(२५) महाराष्ट्र महोदय ( स्तोत्र ), १९२०; सुधारक प्रेस, पुणें.

(२६) एकनाथी भागवत, [ अर्थनिर्णायक टीपांसह संपादित ] १९१०

(२७) श्रीसमर्थ ग्रंथभांडार; [ समर्थ रामदासस्वामींचे समग्र ग्रंथ ] पूर्वार्ध, उत्तरार्ध; १९२७

(२८) समर्थसंजीवनी म्हणजेच समर्थांच्या शिकवणी उर्फ रामदासी वेंचे; १९२४; पुणें.

(२९) सार्थ दासबोध-गद्य अनुवादासह संपादित; आ. दु. १९२९

(३०) निरंजन माधवांचा कवितासंग्रह-भाग १ ला [ स्तोत्रसंग्रह, सांप्रदायपरिमळ ]; १९१९; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(३१) निरंजन माधवांचा कवितासंग्रह-भाग २ रा व ३ रा; [ ज्ञानेश्वरविजय, चिद्बोधरामायण इ. ] हनुमान छापखाना, पुणें.

(३२) मोरोपंती वेंचे; १९०५, जगद्धितेच्छु, पुणें; १९२१, हनुमान प्रेस, पुणें.

(३३) ज्ञानेश्वरांची प्रभावळ, [ ज्ञानेश्वर व समकालीन संत यांच्या वाङ्मयांतील वेंचे ], १९२८.

(३४) भक्तिमार्गप्रदीप, १९०४

(३५) सार्थ व सभाष्य श्री मनोबोध अथवा मनाचे श्लोक; १८४६, श्रीगणेश प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(३६) निबंधमालेचें स्वरूप व कार्य,

(३७) मनाचे श्लोक-सार्थ व सभाष्य, १९२४

(३८) आनंदलहरी, [ स्तोत्रें व स्फुट कविता ]; १९२०

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

१ रामदासीबोवा; परीक्षण, 'प्रेषित'; विविधज्ञानविस्तार, आक्टोबर १९०९.

२ मोरोपंत चरित्र; परीक्षण, विविधज्ञानविस्तार, पु. ४१, अंक ४, ५.

३ पांगारकरकृत मोरोपंतांच्या चरित्रांत प्रतिबिंबित झालेली मराठेशाहीची स्थिति; बा. ना. देव; विविधज्ञानविस्तार, पु. ४२, अंक ५

४ ज्ञानेश्वर आणि एकनाथ यांचीं अल्पचरित्रें; विविधज्ञानविस्तार, जानेवारी १९१३.

५ ज्ञानेश्वरचरित्र—ज्ञानेश्वर एक कीं तीन ? ‘ भारद्वाज ’; विविधज्ञान-विस्तार, जानेवारी १९१४.

६ ज्ञानेश्वरांची प्रभावळ, परीक्षण, बा. अ. भिडे; ( नवें ) लोकशिक्षण, एप्रिल १९२८.

७ तुकारामचरित्र, परीक्षण; बा. आ. भिडे; विविधज्ञानविस्तार, जानेवारी १९२१.

८ श्रीतुकारामचरित्र; परीक्षण; डॉ. प्र. रा. भांडारकर; नवयुग, मार्च १९२१.

९ चरित्रचंद्र; परीक्षण, ‘ गजानन ’, महाराष्ट्रशारदा, वर्ष ४ थें, सप्टेंबर १९३८.

१० पांगारकरांची वाङ्मयतपस्या, मृत्युलेख; व्यक्तिरेखा, ग. त्र्यं. माडखोलकर.

११ लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, मृत्युलेख; शं. श्री. देव, ‘ रामदास-रामदासी’, वर्ष २०, अंक २३५.

**पाठारे, हरि केशवजी** [ १८०४—११ जुलै १८५८ ] भाषांतरकार. मुंबईतील सोमवंशी क्षत्रिय पाठारे ज्ञातींतील पुरव उपनांवाच्या घराण्यात यांचा जन्म झाला. यांच्या घराण्याची मुंबई येथें गिरगांवांत फार प्राचीन-पासूनची वस्ती होती. यांचे आजे गोपाळजी सोनजी गिरगांव येथें आपल्या शेतीभाती वतनवाडीवर निर्वाह चालवीत. हे भागवत सांप्रदायी वेदांती असून पुणें येथील प्रसिद्ध संत शामराजतात्या केसकर यांचे शिष्य होते. हरिजींचे वडील केशवजी शिल्पशास्त्रांत प्रवीण असून घरें बांधण्याचें काम करीत. पालवाचे रस्त्यावरील शेणव्यांचें टाकुरद्वार त्यांनीं बांधिलें आहे. त्याप्रमाणें गिरगांवांतील बरींचशीं घरें त्यानीं बांधिलीं. हरिजींचे एक चुलते माधवजी हे कांहीं वर्षें मुंबई कौरीयर प्रेसमध्यें मुख्य जुळारी होते.

हरिजींचें प्राथमिक शिक्षण-शाळेच्या अभावीं-आजोबांच्या देखरेखीखालीं घरींच झालें. फावल्या वेळीं मोरोपंताच्या आर्या, वामनी श्लोक वगैरे नेहमींच्या अभ्यासाशिवाय, त्यांजकडून पाठ करून घेतले जात. लहानपणीं त्यांस

पुष्कळ कविता मुखोद्गत असे. व पुढें तीच त्यांच्या अभ्यासक्रमास साधनीभूत झाली. कांहीं दिवसांनीं स्कॉटीश मिशनचे रेवरंड रॉबर्ट मनी व रेवरंड केनी यांनीं गिरगांवांत मराठी व इंग्रजी शाळा घातली. मराठी शाळेचे मुख्याध्यापक हरिजींचे मामा त्रिंबकजी हे होते. त्यामुळें हरिजी त्यांत जाऊं लागले. येथील शिक्षण झाल्यानंतर हरिजींची तैलबुद्धि व विद्याभ्यासंग पाहून रेवरेंड केनी यांनीं त्यांस फावल्या वेळीं उच्च प्रतीचें इंग्रजी शिक्षण देण्याचा क्रम ठेविला. पुढें इंजिनीयरिंग वगैरे शिल्पिक ज्ञानाचा मुंबईंत प्रसार व्हावा या उद्देशानें सरकारनें मुंबईंत कॅप्टन जर्विस ह्यांच्या देखरेखीखालीं एक इंजिनीयरिंग शाळा काढली. त्या शाळेंत हरि केशवजी यांस मुख्य कारकुनाची जागा दिली. त्या वेळीं बाबा व्यास या नांवाचे प्रसिद्ध शास्त्री होते. त्यांकडेस जाऊन, नोकरी संभाळूनहि, हरिजींनीं संस्कृताचा उत्तम अभ्यास केला.

सन १८२९ सालांत वरील इंजिनीयरिंग शाळेंतील मुख्य कारकुनाची जागा सोडून हरिजी यांनीं ठाणें अदालत कोर्टांत अव्वल कारकून व मराठी भाषांतरकाराची जागा पत्करली. त्या जागेवर ते १८३४ पर्यंत होते. नंतर त्यांची हुषारी, विद्वत्ता, व कामाची कर्तबगारी पाहून त्यांस सरकारनें सोलापूर येथील कोर्टांत मुख्य कारकुनाचे कामावर नेमिलें. परंतु आपले वृद्ध पिते व चुलते व इतर घरची मंडळी यांपासून दूर रहाणें त्यांस न आवडल्यामुळें त्यांनीं ती जागा लवकरच सोडून मुंबई येथें सदर दिवाणी अदालत कोर्टांत (हल्लींचें हायकोर्ट अपिलेट साइड) चीफ ट्रान्स्लेटरच्या जागीं आपली नेमणूक करवून घेतली. या जागेवर ते शेवटपर्यंत कायम होते.

मुंबईंत शिक्षणप्रसाराचा पद्धतशीर प्रारंभ 'नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी' या संस्थेच्या स्थापनेनें १८२२ सालापासून झाला. मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन हा त्या वेळेस मुंबईचा गव्हर्नर होता. या संस्थेनें शिक्षणोपयोगी अशीं बरींच पुस्तकें एतद्देशीय लेखकांकडून तयार करून घेतलीं. यांतील बहुतेक पुस्तकें भाषांतरित असत. या संस्थेच्या व्यवस्थापकमंडळींत (१८३१–५१) हरि केशवजी होते. जॉन बापेल व कॅप्टन जॉर्ज जर्विस हे या शाखेचे प्रमुख होते. त्यांनीं हरिजींस हाताशीं धरून कांहीं पुस्तकांचीं भाषांतरें करून घेतलीं. त्यांतील पहिलें पुस्तक 'Conversations on Natural philosa-

phy' या पुस्तकाचें भाषांतर 'सिद्ध पदार्थविज्ञानशास्त्रविषयक संवाद' ( १८३३ ) हें होय. पदार्थांचे सामान्य धर्म, गुरुत्वाकर्षकत्व, चलननियम, यांत्रिक शक्ति, ज्योतिषशास्त्र, ग्रह, पृथ्वी, सूर्य, चंद्र, प्रवाही पदार्थांचे धर्म, दर्शनानुशासन इत्यादिक अनेक विषयांचें विवेचन या ग्रंथांत केलें आहे. हें भाषांतर वाचतांना तें इंग्लिश ग्रंथाचें भाषांतर आहे असें मुळींच वाटत नाहीं. याची भाषा प्रौढ असून सोपी आहे. यानीं अनुवादिलेल्या पुस्तकांत 'यात्रिक-क्रमण' व 'नीतिग्रंथ' हीं विशेष नावाजलीं जातात. पहिलें 'Bunnyan's Pilgrim's Progress' चें भाषांतर असून, दुसरें 'Chamber's Moral Class Book' या पुस्तकाचें भाषांतर आहे.

हरि केशवजी नित्याचा व्यवसाय व लेखन हीं संभाळून सार्वजनिक कार्यांतहि भाग घेत. दादाभाई नौरोजी, डॉक्टर भाऊ दाजी, नारायण दिनानाथ माडगांवकर, रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक इत्यादि मंडळीनीं स्थापिलेल्या 'स्टुडन्टस् लिटररी ॲण्ड सायन्टिफिक सोसायटी'चे ते सभासद असून तिच्या 'मराठी ज्ञानप्रसारक सभा' या शाखेचे उपाध्यक्ष होते. 'बॉम्बे डिस्ट्रिक्ट बेनिव्हलंट सोसायटी', त्याचप्रमाणें स्वज्ञातीय संस्था यांचेशीं त्यांचा संबंध होता. स्वज्ञातींत उद्भवणारीं ग्रामण्यें मोडणें, ज्ञातींतील विघातक चाली व रिवाज बंद करणें इत्यादि कामांत ज्ञातींतील प्रमुख मंडळींत ते पुढें असून नेहमीं त्यांस सल्ला देत असत. यांच्याच खटपटीमुळें ज्ञातींत पुनर्विवाहाचा रिवाज सुरू झाला.

हरि केशवजींची, खिस्ती लोकांच्या सहवासामुळें, प्रारंभीं प्रारंभीं हिंदु-धर्मावरील श्रद्धा उडूं लागली होती. त्यांचे आजोबा गोपाळजी यांच्या लक्षांत ही गोष्ट येतांच त्यांनीं त्यांची आपले आध्यात्मिक गुरू शामराजतात्या केसकर यांबरोबर गांठ घालून दिली. शामराजतात्यांनीं धर्मसंबंधीं त्यांचे शंकांचें सप्रमाण समाधान करून त्यांचा धर्मविरुद्ध असलेला भ्रम दूर केला, व त्यांस आपले पट्टशिष्य बनविलें. तात्यांनीं त्यांस ज्ञानेश्वरी स्वमुखानें सांगितली. गीता, ज्ञानेश्वरी, भागवत, विवेकसिंधु, अमृतानुभव, एकनाथी भागवत हे त्यांचे आवडते ग्रंथ असत. शामराज तात्यांच्या सहवासामुळें ते कर्मनिष्ठ व भक्तिमान् बनले. त्यांचें उपास्य दैवत श्रीरुक्मिणीपांडुरंग होतें, व

ज्ञानेश्वर महाराजांचे ठिकाणीं त्यांची अति दृढ भक्ति होती. ते नित्य ज्ञानेश्वरीचा पाठ करीत असत. यामुळें शामराजतात्यांचें त्यांचेवर फार प्रेम बसलें. एकदां एका शिष्यसांप्रदायिकाकडेस कीर्तन चाललें असतां, तात्यांनीं त्यांस उद्देशून पुढील आर्या म्हटली, 'केशवउदरसुगर्भी अवतरला पूर्ण तो कृपाळु हरी। सुजनजना पाहुनियां सिंधुपणें येत ज्या कृपालहरी.' हरि केशवजींचीहि उलट आपल्या गुरूविषयीं तशीच निष्ठा होती. त्यांनीं त्यांचेसंबंधीं खालील पद रचिलें आहे.

भवसागरतारक, श्रीगुरुराज स्वामी माझा ॥ ध्रु० ॥
या संसारापासुनी मजला उतरुनि केलें पार रे ॥ १ ॥
ग्रासुनि भवभ्रांतीचें पडळ दावित निजसुखसार रे।
शामराज श्रीगुरुपद वंदुनि, करि हरि जयजयकार रे ॥ २ ॥

हरि केशवजी हे 'मराठी ज्ञानप्रसारक सभे'चे बरींच वर्षे सभासद व कांहीं वर्षे उपाध्यक्ष होते. असें असतां, 'शिक्षालाभ' या, १८५१ सालीं सभेपुढें वाचलेल्या निबंधाखेरीज अन्य निबंध त्यांनीं वाचलेले आढळत नाहींत. हा निबंध लहानसाच असला तरी हरिजींच्या, विद्याभ्यासंगासंबंधींच्या उदार विचारसरणीची तो चांगली कल्पना आणून देतो. या निबंधांत ते एके ठिकाणीं लिहितात. "केवळ द्रव्यप्राप्तीकरितांच विद्याभ्यास करावा असें नाहीं, आणि केवळ द्रव्य असलें म्हणजे सुख होतें असेंहि नाहीं. व्यवहारोपयोगी कला, विद्या जेथें आहेत तेथें संपत्ति असणार नाहीं असें विरळा. परंतु केवळ संपत्तीवरच दृष्टि ठेवून विद्याभ्यासादि करीत नाहीं, तर मनुष्यास कर्तव्याकर्तव्य कोणतें तें कसें आचरावें, असें समजून घ्यावयास आणि ज्यापुढें विषयानंद तुच्छ आहे असा जो विद्यानंद त्याचा अनुभव घ्यावयास सूज्ञ पुरुष विद्याभ्यास आमरणपर्यंत करितात. जात्यभिमान, कुलाभिमान सोडून जेथून विद्या प्राप्त होईल तेथून प्राप्त करून घेतात. जशी मधमाशी नाना संकटस्थानीं रिघून मधुसंग्रह करिती, तशी वृत्ति धरितात. उंच उंच वस्त्रें, उंच उंच भूषणें यांकडे मन न जाऊं देतां विद्यालंकाराकडे लक्ष योजितात. जिव्हेस ज्या षड्रसांची गोडी ती नाहींसी करून ज्ञानरस सेवितात. अशा विद्वान् पुरुषांचा किंबहुना स्त्रियांचाहि ज्या देशीं मोठा समुदाय त्या देशीं ज्ञातिमत्सर,

चोरी, लबाडी, दुर्व्यसन, आलस्य, इत्यादिकांचा उत्कर्ष कोठून होईल. अनेक लोक व्यवहारोपयोगी कर्माची प्रवृत्ति होऊन ज्याचा जो व्यापार त्यांत तो अति निपुण, सर्वांचे ठायीं बहुश्रुतपणा आणि विद्येचें व्यसन तेथें दरिद्र कोठून राहील, तेथें उद्योगाची उणीव कोठून असेल. विद्याभ्यासंगावांचून एक घटिका गेली असतां हानीसारिखी मानण्याची संवई लागली आहे तेथें गप्पाष्टकांखालीं, निजून काढण्याखालीं, वेळ दवडावा असें कोणाच्या मनांत येईल. अनेक भाषांचें ज्ञान संपादावें, अनेक विद्या साध्य कराव्या, अनेक विषय पाहावे, अनेक लोकव्यवहार समजून घ्यावे इकडेच काय तो बुद्धीचा भर, असें ज्या देशीं आहे तेथें विद्येस उत्तेजन प्राप्त होत आहे, विद्वानांची मानमान्यता होत आहे, किंबहुना विद्यादि साधनद्वारा आपला अवघा देश सुखी होऊन नांदूं लागावा असेंच आबालवृद्धांच्या मनांत वागत आहे. अशी स्थिति होणें हें उगेंच सरासरी वाचावयास लिहायास आलें अथवा कांहींसें शब्दपांडित्य साधलें तितक्यानेंच होणार नाहीं. यास तर विशेष शिक्षा असली पाहिजे...

विद्येचा ज्या कामांत उपयोग नाहीं असें एकहि कर्म या प्रपंचांत नाहीं. कृषिकर्म, शिल्पकर्म करणारे कसबी कारागीर लोक अज्ञान असून केवळ दुसऱ्यास काम करितां पाहून आपण करावयास शिकत असतात, त्यांस जर चांगली शिक्षा प्राप्त होऊन ते व तसेच मोठमोठे उद्योग करणारे आपआपलीं कामें करूं लागतील तर तीं कामें फार सुगराईनें, अल्पायासानें होऊन दशगुण फल प्राप्त होईल."

अव्वल इंग्रजींतील लेखकांत, बापू छत्रे यांचें नांव वगळल्यास, हरि केशवजींच्या तोडीचा भाषांतरकार झाला नाहीं. इंग्रजी, संस्कृत व मराठी या तिन्ही भाषांतील वाङ्मयाचा व्यासंग हरिजींनी उत्तम तऱ्हेनें ठेविला होता. या त्यांच्या व्यासंगाबद्दल खुद्द युरोपियन मंडळींतहि त्यांचें कौतुक केलें जाई. गव्हर्नरच्या कौन्सिलाचे व मुंबई नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचे एक प्रमुख सभासद ऑनरेबल जेम्स फेरीश हे तर त्यांच्या गुणांवर एवढे खुश होते कीं ते जेव्हां विलायतेस जावयास निघाले तेव्हां त्यांनीं आपला अमुल्य ग्रंथसंग्रह व बंगल्यांतील कांहीं सामान हरि केशवजींस बक्षिस म्हणून देऊन टाकलें.

हरि केशवजींचा व्यासंग लक्षांत घेतां, त्यांचे हातून स्वतंत्र ग्रंथनिर्मिती व्हावयास हवी होती. पण तो काळच असा होता कीं, इंग्रजी शिकून तयार झालेल्या पिढीला, स्वतंत्र लेखन करण्यांत फार काळ घालवण्यापेक्षां अल्पकाळांत विविध प्रकारचें युरोपिय ज्ञान लोकांत पसरून त्याबद्दलची गोडी उपन्न होईल अशी खटपट करणें अधिक इष्ट वाटत होतें. यासाठीं भाषांतराचा मार्ग पत्करणें त्यांना प्राप्त झालें. 'मराठी ज्ञानप्रसारक' या मासिकाच्या डिसेंबर १८५२ च्या अंकांत नारायण भाई दांडेकर यांचा 'एतद्देशीय लोकांस केवळ स्वभाषेचाच द्वारें विद्या शिकविली असतां लाभ कोणकोणते, व ती जर इंग्लिश व स्वभाषा या दोहोंच्या द्वारें शिकविली तर कोण-कोणते याचा विचार,' या मथळ्याचा जो निबंध आला आहे त्यांत या पहिल्या इंग्रजी शिकलेल्या पिढीच्या विचारांचें स्पष्ट प्रतिबिंब पडलें आहे. नारायण भाई लिहितातः "जरी हिंदु लोक पाहिजे तितके सुधारावया जोगे शक्तिवान असे आहेत आणि जरी ज्ञान संपादन करण्याकरिता युरोपांतील मुलांचे बुद्धिपेक्षां येथील मुलांची बुद्धि मोठी आहे तरी त्यांचा स्वतःचा ज्ञान-संग्रह फार नाहीं. ब्राह्मणांनीं वेदांत, व्याकरण, न्याय वगैरे विषयांवर पुष्कळ कवितारूप ग्रंथ केले आहेत, परंतु उपयोगी कलाकौशल्याचा फार दुष्काळ. ज्या विषयांची सर्व बांधणी कल्पनेवर आहे त्यांची समृद्धी आहे, परंतु जांचा व्यवहारांत फार उपयोग त्यांचें नांव नाहीं. यावरून या लोकांस काय शिकविण्याचें अगत्य आहे तें स्पष्ट कळतें. ह्या देशांतील सर्वांचा मनाचें राज्य जो प्राचीन अधिकार बळकाऊन बसला आहे तें त्याचे हातांतून घेऊन, विचार यास दिलें पाहिजे. पांच–चार वर्षांपासून त्यांचा बुद्धिप्रकाश विरोधि जें अभ्र आलें आहे तें दूर केलें पाहिजे. जा शास्त्रांचा अभ्यासानें सृष्टिनियम त्यांस सुखकारक होतात, आसमंतात भागींचा वनस्पती, त्यांचे आरोग्य व संरक्षणकर्त्या होतात, शेतां-दिकांचें उत्पन्न अधिक होतें, खाणींत दडून राहिलेल्या धातू व इतर जमीनी-तले पदार्थ वर येऊन त्यांच्या उपयोगीं पडतात. तीं शास्त्रें त्यांस शिकविलीं पाहिजेत; जे पदार्थ तयार करण्यास ह्या देशांत अधिक साधनें व सोई असतां इतर लोकांपासून विकत घेतात, ते कसे करावे हें त्यांस कळविलें पाहिजे; व त्यांस आपल्या देशांतील राजकीय कामामध्यें मोठमोठाले हुद्दे चालवावयास शक्तिमान केले पाहिजेत; असाच सरकारचाहि हेतू आहे. त्यांची हिंदु लोकांचे

कल्याणाविषयीं जी इच्छा आहे तिजकरितां सर्वांनीं उपकारच मानिले पाहिजेत. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, शिक्षामंडळींनीं मोठमोठे हुद्दे चालवावयास नीतीनें व कामाच्या वाकबगारीनें योग्य असे असामी तयार करण्यास आपले श्रम खर्चावे आणि हें साध्य करण्याच्या युक्तीविषयीं सरकारचें मत असें आहे कीं, युरोपियन लोकांचें शास्त्रीय व इतर ज्ञान याचा या लोकांत प्रसार करून नीति, न्याय, वगैरे विषय शिकवावे...यावरून हिंदु लोकांस कोणकोणते विषय शिकवले पाहिजेत हें स्पष्ट झालें. युरोपियन लोकांचा इतिहासादि विद्या तशींच सिद्धपदार्थविज्ञान, नीतिव्यवहारादिक शास्त्रें यांचा अभ्यास करविला पाहिजे. पुराणादिक प्राचीन कथांचा ठाईं जी हल्लीं फार प्रीती आहे, ती घालवून तिचाबद्दल शास्त्रीय चमत्कार व सर्व लोकांचे कल्याणकर्ते असे जे पुरुष होऊन गेले त्यांचें कथन यांची रुचि लाविली पाहिजे. कोणत्याहि लोकांस सुधारावयास ह्यापेक्षां आणखी काय पाहिजे ? सरकाराकडून तरी यापेक्षां लोकांस काय अधिक साहित्य पाहिजे ? शास्त्रें व कलाकौशल्यें हीं हिंदूस प्राप्त झाल्यानें या देशाचे फारच हित होईल."

तत्कालीन सुशिक्षितांच्या वरील विचारसरणीस अनुसरून हरिजींनीं आपली लेखणी भाषांतरकार्यासाठींच झिजवावी यांत विशेष आश्चर्य नाहीं. स्वतंत्रपणें मांडावयास उपकारक होणारा आत्मविश्वास निर्माण होण्यास ज्या तऱ्हेचें वातावरण असावें लागतें त्या तऱ्हेचें वातावरण त्या काळात नव्हतें हेंहि त्याला कारण असूं शकेल. नाहीं म्हणावयास, हरिजींनीं थोडेसें धर्मविषयावर लेखन केलें असावें असें, त्यांच्या मुलानें त्यांचें जें चरित्र लिहिलें आहे, त्यांत उद्धृत केलेल्या कांहीं उताऱ्यांवरून दिसतें. परंतु हें धर्मपर लेखन त्रुटित असून, प्रकाशित झालेलें नाहीं.

हरिजी जसे उत्तम गद्यलेखक होते तसेच उत्तम कवनलेखकहि होते. त्यांच्या या कौशल्याचा उत्तम मासला 'यात्रिकक्रमण' व 'नीतिग्रंथ' या पुस्तकांत पहावयास सांपडतो.

हरिजी आपल्या वयाच्या पंचावन्नाव्या वर्षी अतिसाराच्या विकारानें मुंबई येथें मृत्यू पावले. त्यांच्या घराण्यांतील इतर मंडळीची आयुर्मर्यादा लक्षांत घेतां त्यांचें निधन अकालीं झालें असें म्हणावें लागतें.

**वाङ्मय :**

( १ ) चेंबर्सकृत शालोपयोगी नीतिग्रंथ याचें महाराष्ट्र भाषांतर; प. आ. १८४६ ( शिळाछाप ); च. आ. १८६१; गणपत कृष्णाजीचा छापखाना; मुंबई.

( २ ) देशव्यवहारव्यवस्था या शास्त्राचीं मूलतत्त्वें, ( साहाय्य. विश्वनाथ नारायण मंडलिक ); १८५४; [ Mrs. Marcet कृत Conversations व Mill कृत Political Economy यांचे आधारें. ]; दक्षिणी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध करणारी मंडळी; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

( ३ ) सिद्ध पदार्थविज्ञानशास्त्रविषयक संवाद, [ परिभाषा व सूचीसह ], १८३३; नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीसाठीं शिळेवर छापिलें; मुंबई.

( ४ ) रसायनशास्त्रविषयक संवाद; १८३७; [ Conversations on Chemistry या पुस्तकाचें भाषांतर ] सचित्र, परिभाषेसह; बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी; आर. प्रेस यांचा छापखाना ( शिळाछाप ); मुंबई.

( ५ ) इंग्लंडचा वृत्तांत, [ कोणा एका गृहस्थाचीं आपले मुलास पत्रें; इंग्रजीचें भाषांतर ] १८३८,१८६१,१८६७; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

( ६ ) यात्रिकक्रमण, इहलोकापासून परलोकास [ Jhon Bunyan कृत 'Pilgrim's Progress चें मराठी भाषांतर ]; १८४१; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई; १८५३, बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, अमेरिकन मिशन, मुंबई.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

हरि केशवजी यांचें चरित्र; रामचंद्र हरि; १९११; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

**पाध्ये, दामोदर गणेश** [ १८६५ – १९४२ ] वृत्तपत्रकार व शिक्षणव्यवसायी. मुंबईतील गोकुळदास तेजपाळ हायस्कुलचे कांहीं वर्षें मुख्याध्यापक व तदनंतर बरींच वर्षें मुंबई म्युनिसिपल स्कुलकमिटीचे चिटणीस. गोकुळदास

तेजपाळ हायस्कूलचे मुख्याध्यापक असतां मुंबईतील इंदुप्रकाश पत्राचें मुख्य संपादकत्वहि यांचेकडे होतें. हे रानडे संप्रदायाच्या नेमस्त राजकारणाचे निष्ठावंत पुरस्कर्ते होते. मराठी साहित्यविषयक चळवळींतहि त्यांचें प्रमुख अंग असे. महाराष्ट्र–साहित्य परिषदेच्या प्रमुख विश्वस्तांपैकीं ते एक होते. यांचे बरेंचसें लेखन प्रासंगिक आहे. त्यांचा लोकमान्य टिळकांवरील प्रबंध त्याच्या प्रसिद्धीसमयीं बराच गाजला होता. पक्षातीत राहून लोकमान्यांच्या कामगिरीचें त्यानीं त्यांत केलेल्या मूल्यमापनामुळें तो आदर्श असा प्रबंध झाला आहे.

**वाङ्मय :**

( १ ) आमच्या राजकीय सद्यःस्थितीसंबंधीं विचार; १९२२; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.
( २ ) सांप्रतच्या चलनी नाण्यांविषयींचा वाद, [ हेमंतव्याख्यानमाला, वर्ष ९ वें ]; १८९४; आर्यभूषण छापखाना, पुणें.
( ३ ) ब्रिटिश राज्यव्यवस्थेची वाढ व तिचें सांप्रतचें स्वरूप, [ हेमंत व्याख्यानमाला, वर्ष ७ वें ], १८९२; आर्यभूषण छापखाना, पुणें.
( ४ ) दुःखाश्रुमाला; पद्य; १९१९; लक्ष्मीनारायण प्रेस, मुंबई.
( ५ ) लोकमान्य टिळक, चरित्रात्मक निबंध; १९२१; लक्ष्मीनारायण छापखाना, मुंबई.

**पानसे केशव रंगनाथ** [ मृत्यु १०-८-१९३० ] मुंबई सरकारच्या इंजिनियरिंग खात्यांत नोकर होते. सेवानिवृत्त झाल्यावर 'शिवसुत–काव्य' व 'पानसे घराण्याचा इतिहास' हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं.

**वाङ्मय :**

( १ ) शिवसुत–काव्य, १९२८, इंदिरा छापखाना, पुणें.
( २ ) पानसे घराण्याचा इतिहास, सचित्र; १९२९; आनंद छापखाना, पुणें.

**पावसकर, ( जोशी ) पांडुरंग बापू** [ अनुपलब्ध ] प्राचीन मराठी कवितेचा आद्य संपादक व प्रकाशक. हे 'धि बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी'च्या मराठी शाळेंत शिक्षक होते. ही शाळा १८२० सालीं स्थापन

होऊन १८४० पर्यंत चालली. सुप्रसिद्ध मराठी व्याकरणकार दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनीं आपल्या आत्मचरित्रांत यांचेसंबंधीं पुढीलप्रमाणें माहिती दिली आहे. "हे जोशीबावा वरच्या वर्गांत गणित शिकविण्याचे कामावर होते. यांनीं हिंदूंचें ज्योतिःशास्त्र म्हटलें होतें; म्हणजे भास्कराचार्यांचें बीज व लीलावती यांनीं म्हटली होती. म्हणोन यांस इंग्लिश गणिताचे ग्रंथावरून क्यापटन जर्विस साहेबानें मराठींत तर्जुमे केलेल्या ग्रंथावरून तो विषय मुलांस शिकवावयास फारसा आयास लागत नसे. हे जोशीबावा सरळ, बारीक अंगाचे पुरुष होते, आणि फार बुद्धिमान होते असें त्यावेळेस सर्व लोक म्हणत असत. यांची बुद्धि फार चंचल होती. यांनीं मला पूर्णांक, अपूर्णांक, क्षेत्रफल, घनफल, वर्गसमीकरणांपर्यंत बीज शिकविलें."

"सोसायटीची शाळा बंद पडल्यानंतर प्राचीन मराठी कवितेच्या प्रकाशनाचा उद्योग त्यांनीं आरंभिला असें दिसतें. शके १७६२ च्या ( सन १८४० ) कार्तिक मासांत '**श्री ज्ञानचंद्रोदय**,* या नांवाचें मासिक पुस्तक त्यांनीं सुरू केलें. मुंबईंत 'बोरीबंदरचे लैनी नजीक जुनी जांबळी मशीदीची आळी,' येथें गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यांत, तें शिळेवर छापलें जाई. प्रत्येक अंकाचीं ४० पासून ४८ पर्यंत पृष्ठें असत. प्रत्येक अंकाची किंमत आठ आणे ठेविली होती. या मासिकांत येणाऱ्या मजकुरासंबंधीं संपादकानें पुढील प्रमाणें स्पष्टीकरण केलेलें आहे. ग्रंथ २ कागद ३ चे प्रारंभीं तो म्हणतो, "एके कागदांत+ संस्कृत व प्राकृत ग्रंथांचें रहस्य व रहस्यप्रतिपादक श्लोक व आर्या

---

* 'मराठी ग्रंथ सूचि' या ग्रंथाचे कर्ते श्री. शंकर गणेश दाते यांच्या संग्रहात या मासिकाचीं दोन बांधलेली पुस्तकें आहेत. पण त्यांतील पुष्कळशी काव्यप्रकरणें गहाळ झालेली आहेत. यांत प्रथमांक अजिबात नाहीं. त्यानंतरचे ४३ अंक आहेत. सुदैवानें या प्रत्येक अंकाचें प्रारंभीचें पान यांत असल्यामुळें प्रत्येक अंकांत काय काय प्रकरणें आली होतीं त्याची माहिती मिळते. दाते यांच्या संग्रहांतील या पुस्तकांतील शेवटचा 'कागद' (त्या काळीं अंक न म्हणतां 'कागद' असें म्हणण्याचा रिवाज होता) 'वैशाख संवत् १९००'चा सन (१८४४) आहे. हाच अंक शेवटचा कीं तदनंतर आणखी कांहीं वर्षे तें चाललें होतें यासंबंधीं निश्चितपणें सांगणें, माहितीच्या अभावीं, कठीण आहे.

+ येथें 'कागद' याचा अर्थ फर्मा असा धरावयाचा.

व ओव्या व अभंग इत्यादि लिहिले जातील. व दुसरे राहिलेले कागदांत प्राकृत ग्रंथ व आख्यानें इत्यादि छापिलीं जातील."

तदनंतर ग्रंथ ३, कागद ८ याचे प्रारंभीं ते लिहितात, "एके कागदांत प्राचीन साधुनीं केलेलें चरित्र भाग आहेत. त्यापैकीं दर महिन्यास थोडे थोडे लिहिले जातील. आणि दुसऱ्या राहिलेल्या कागदांत चमत्कारिक प्राकृत ग्रंथ छापले जातील."

या मासिकाचा आकार फुलस्केप अष्टपत्री सांच्याचा असे. प्रत्येक अंकाचे प्रारंभीं आंतील विषयानुरूप चित्र दिलेलें असे. कित्येक अंकांत आंतील बाजूसहि प्रसंगानुसार एकाहून अधिक चित्रें घातलेलीं असत या चित्रांवरून तत्कालीन महाराष्ट्रसमाजाचा पेहराव, वस्त्रें आभरणें, साजशृंगार; त्यांची राहण्याची पद्धति; त्यांचीं घरें, उद्यानें, दिवाणखान्यांतील सजावट; समारंभ, रीतिरिवाज यांची बरीचशी कल्पना येऊं शकते. यांतील सारींच चित्रें एकाच्याच हातचीं बहुधा नसावींत. पण चित्रकार थोर दर्जाचा दिसतो. रेषेंत सौंदर्य आहे. रेखाटन लालित्यपूर्ण आहे. या चित्ररेखाटनपद्धतीला कोणती तरी परंपरा असलीच पाहिजे. शोध घ्यावयाला हवा. कदाचित् ब्रिटीशपूर्वकालांतील पोथ्यांतील चित्रांचीहि ही नक्कल असेल. त्याचाहि शोध करावयाला हवा. महाराष्ट्राच्या चित्रकलेवर त्यायोगें पुष्कळच प्रकाश पडेल.

या मासिकांत खालीलप्रमाणें कविता छापली गेली आहे :

१ कृष्णलीलामृत, २ विक्रमचरित्र, ३ गीतार्थबोधिनी ( वामनपंडितकृत ), ४ शुकचरित्र, ५ भक्तलीलामृत, ६ ब्रह्मस्तुति, ७ नळदमयंती आख्यान (रघुनाथ पंडितकृत ), ८ आनंदलहरी ( एकनाथकृत ), ९ शिवरात्रीमहात्म्य, १० हरिपाठ ( ज्ञानदेवकृत ), ११ रामजन्माचे श्लोक ( वामनकृत ), १२ रामजन्माचे अभंग १४ प्रल्हादचरित्र ( अभंग २१ ), १५ गोपीगीत ( वामनकृत ), १६ सीतास्वयंवर ( वामनकृत ), १७ केकावलि ( मोरोपंत ), १८ स्तवराजस्तोत्र, १९ बाळक्रीडेचे अभंग, २० गजगौरीव्रत, २१ सुदामचरित्र ( कचेश्वरकृत ), २२ एकादशीचें चरित्र व धावा, २३ तुकोबाचे अभंग, २४ पत्रिकेचे अभंग, २५ कबिर रोहिदास कथा, २६ आर्या (द्विजसुतरक्षणार्थ पार्थप्रतिज्ञा), २७ वस्त्रहरणाचे अभंग, २८ बोधलेबावाचें आख्यान ( हिंदुस्थानी भाषेंत ),

२९ राधाभुजंग, ३० विष्णूचीं चोवीस नामें ( विष्णुदासनामारचित ), ३१ अभंग मुक्ताबाईचे ( अभंगसंख्या १२ ), ३२ बारा जोतलिंगाचे, श्लोक ३३ अमृतरायकृत दामाजीपंताचें चरित्र, ३४ नामपर अभंग, ( अभंग ९ ), ३५ हिंदुस्थानी राधाविलास [ झूलना, साखी, दिंडी, श्लोक; कवितासंख्या ४९ ]

**पावगी, नारायण भवानराव** [ १८५४–१९३४ ] प्राचीन भारतीय इतिहासाचा लेखक. सर्व शिक्षण मुंबईस झालें. बी. ए. च्या परीक्षेंत यश न आल्यामुळें व वडिलांना प्रपंचांत मदत व्हावी म्हणून यांनीं नोकरीचा मार्ग पत्करला. १८७८ त ते सरकारी नोकरींत कायम झाले व वाढतां वाढतां मामलेदार बनले. त्यानीं मोठ्या दक्षतेनें, प्रामाणिकपणानें, व रयत व सरकार यांचें हित साधून तीस वर्षें नोकरी केली. तथापि ते सरकारच्या मर्जींतले नव्हते. सरकार त्यांच्या राष्ट्रीय वृत्तीकडे पाहून कदाचित् बिचकत होतें असेल. कारण नानांचा–हे नाना पावगी या नावानें अधिकच ओळखले जात– विद्याभ्यासंग व स्वदेशी बाणा हा नोकरींतहि कायम असे. नोकरीचा कंटाळा आला कीं ते रजा घेत व ग्रंथलेखन करीत; देशाभिमानावर व्याख्यानें देत व इतर रीतीनें समाजसेवा चालवीत. त्यांना वाङ्मयव्यवसायाची तीव्र इच्छा असल्यामुळें नोकरी गोड वाटेना. पगार तीनशें रुपयांवर होता व इतमाम कांहीं कमी नव्हता; तथापि नानांना हें जीवन गुलामगिरीचें वाटे. तेव्हां त्यानीं तीस वर्षें पुरीं होतांच पेन्शन मिळण्याविषयीं अर्ज केला. पण ‘ भारतीय साम्राज्य ’ ग्रंथमालेंत प्रसंगानुसार त्यानीं इंग्रज सरकारच्या राजनीतीवर आणि कारस्थानावर जी स्पष्ट, सडेतोड टीका केली ती न रुचून कीं काय कोण जाणे, नानांना पुरें पेन्शन न मिळतां, पन्नास रुपयेच द्यावेत असा सरकारी हुकूम झाला. या प्रकरणाबाबत साहाजिकच नानांनीं आपल्या ‘ आत्मवृत्तांत ’ तळतळून लिहिलें आहे : “ जनरल डायर मुक्त होतो, त्याला पाठिंबा असल्यामुळें यथास्थित पेनशन मिळतें व निरपराधी नोकराच्या पेन्शनला मात्र खो बसतो, हें केवढें नवल !!! अथवा, ह्यांत नवल तें कसलें ? बळी तो कान पिळी हाच काय तो खरा न्याय !!! ” ( आत्मवृत्त पृ. १५१ )

या कठोर सुलतानीमुळें नाना खचले तर नाहींतच पण त्यानीं उलट दुप्पट जोरानें ग्रंथलेखन व देशसेवा सुरू केली. यापुढें त्यांनीं इंग्रजींतून, जगांतील विद्वानांना आपलें संशोधन कळण्यासाठीं ग्रंथलेखन चालविलें. 'वैदिक भूस्तरशास्त्र', 'आर्यांची जन्मभूमी', 'भारतवर्षांतील स्वराज्यव्यवस्था', 'सोमाची उत्पत्ति', 'नौकानयन' इत्यादि विषयांवर सप्रमाण असे ग्रंथ लिहून व वृत्तपत्र-नियतकालिकांतून लेख देऊन मरेपर्यंत त्यांनीं वाङ्मयसेवा केली. आपल्या संस्कृतीसंबंधानें व पराक्रमी इतिहाससंबंधानें त्यांना पराकाष्ठेचा अभिमान असे. कोणी विरुद्ध बोललेलें किंवा लिहिलेलें त्यांना खपत नसे. ते तात्काळ उत्तरपक्ष करीत.

ते जसे लिहिण्यांत तसे आचरणांत फार कडक होते. अगदीं पहांटे दोन वाजतां उठून ते ईशस्मरण आणि स्नानसंध्यादि कर्में उरकीत व नंतर जेवण्याखाण्याच्या वेळा व्यतिरिक्त पंधरा-सोळा तास लेखन-वाचनांत घालवीत. शके १८४० त त्याची पत्नी वारल्यानंतर तर प्रपंचाचीहि उपाधी सुटली. त्यांना एकच मुलगा असून तोहि चांगला कर्तृत्ववान आहे. या पिता-पुत्रांनी पुण्यांतील मराठी ग्रंथसंग्रहालयास चांगलें चिरस्थायी केलें. नाना पावगी हे संग्रहालयाचे पहिले अध्यक्ष होत. ठाणें मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या बत्तिसाव्या वार्षिक दिनाच्या समारंभास ते अध्यक्ष होते व त्यांचें त्या वेळचें भाषण म्हणजे प्राचीन भारतीय इतिहासाचा एक सुंदर आढावाच म्हणतां येईल. भारतीय साम्राज्यमालेंतील कांहीं ग्रंथाचा हिंदी-गुजराती-कानडी या भाषात अनुवाद झालेला आहे.

नाना दीर्घायु होते. त्यांचें ता. ८ डिसेंबर १९३४ रोजीं पुणें येथें देहावसान झालें.

पावगींची पहिली ग्रंथरचना छंदोबद्ध आहे. शके १८०५ मध्यें रोह्यास ते अव्वल कारकून असतांना त्यांना एकदां अतिशय उद्विग्नता प्राप्त झाली व मनोरंजनासाठीं त्यानीं श्लोकशतकमाला रचिली. 'मनोरंजनशतक' नांव नें हिची प्रसिद्धी पुढें दहा वर्षांनीं त्यानीं केली. 'परमेशसेवा, संसारमिथ्यात्व, कुलीनभार्या, तज्जन्य सुख; दुष्ट स्त्री, तज्जन्य दुःख; षड्रिपूंचें सामर्थ्य, सुखाचें खरें साधन; वैराग्य, तज्जन्य आनंद; मानसिक उन्नति, सद्गुरुप्रसाद, संकटसमयीं

रक्षण, प्रतिकूल काल, कालमहिमा, आणि मनास उपदेश,' हे काव्यविषय आहेत. काव्य अगदीं साधें व सोपें, पण प्रसादविहीन आहे.

यानंतर त्यांनीं आपली पूर्वसंकल्पित 'भारतीय साम्राज्य' नांवाची ऐतिहासिक ग्रंथमाला तयार करण्याचा दीर्घ उद्योग सुरू केला. प्राचीनतम ऋक्कालापासून तों तहत पेशवाईअखेर भारतीयांच्या विविध कामगिरीचा आढावा या मालेंत यावा व आपल्या पूर्वजाच्या पराक्रमाची नीट ओळख विद्यमान जनतेस व्हावी या राष्ट्रहितैषी बुद्धीनें त्यांनीं अनेक प्राच्य आणि पाश्चात्य लेखकांचे ग्रंथ वाचून टिपणें तयार केलीं व बावीस ग्रंथांची एक योजना आंखली. यांपैकीं अकरा ग्रंथ प्रसिद्ध झाले व पुढल्यांपैकीं कांहीं लिहून तयार होते. या छापील अकरा ग्रंथांतील विषय पुढीलप्रमाणें आहेत : ( १ ) आर्य देश व तत्संबंधीं वृत्तांत; ( २ ) आर्य लोक व त्यांचें बुद्धिवैभव; ( ३ ) आर्येतिहास व भूगोल; ( ४ ) आर्यशास्त्र व कला; ( ५ ) आर्यशासनपद्धति व नानाविध संस्था; ( ६ ) आर्यगृहस्थिति, नीति, शौर्य व उन्नति; ( ७ ) भरतखंडांतील नानाविध धर्म; ( ८ ) भरतखंडांतील जातिवैचित्र्य; ( ९ ) भरतखडांतील नानाविध भाषा; ( १० ) संस्कृत भाषेचा इतिहास; ( ११ ) प्राकृत व मराठी भाषेचा इतिहास. याप्रमाणें 'भारतीय साम्राज्या'वर अकरा ग्रंथ, फार परिश्रमानें इंग्रजी आणि संस्कृत ग्रंथांतून माहिती जमवून पावगी यांनीं नोकरींत असतांना प्रसिद्ध केले. न्या. मू. रानडे यांनीं १८९८ सालापर्यंतच्या मराठींतील उत्तमोत्तम अशा ६० ग्रंथांची जी यादी प्रसिद्ध केली तींत 'भारतीय साम्राज्य' आहे; यावरून पावगींच्या ग्रंथांचें महत्त्व कळून येतें.

'भारतीय साम्राज्य' मालेबाहेरचे आणखी पांच मराठी ग्रंथ पावगी यांनीं लिहिले. ते पुढीलप्रमाणें : 'भाषाशास्त्र'; 'भारतीय नाटकशास्त्र व नाट्यकला आणि पौरस्त्य व पाश्चात्य रंगभूमि'; 'ऋग्वेदांतील सप्तसिंधूचा प्रांत अथवा आर्यावर्तांतील आर्यांची जन्मभूमि आणि उत्तर ध्रुवाकडील त्यांच्या विस्तीर्ण वसाहती'; 'सोमरस सुरा नव्हे'; 'वेदकालीन भूस्तरशास्त्र अथवा भूस्तरशास्त्राचे वेदर्षी जनक'.

वरील साऱ्या पुस्तकांतून पावगींचा जाज्वल्य राष्ट्राभिमान उसळलेला दिसून येतो. आमचे पूर्वज जगांत पहिल्या प्रतीचे सुसंस्कृत होते हें दाखविण्यासाठीं

व महाराष्ट्रीय जनतेंत स्वाभिमान उत्पन्न करण्यासाठीं त्यांनीं इतकें अफाट लेखन प्रसिद्ध केलें. हे ग्रंथ मुळींच खपले नसल्यानें, द्रव्याचा केवढा त्याग पावगींनीं देशसेवेसाठीं केला असेल याची पूर्ण कल्पना येते. त्यानीं शके १८४६ त मराठींत आपलें 'आत्मवृत्त' प्रसिद्ध केलें; पण पद्धतशीर लिहिणें त्यांना माहित नसल्यानें हें पुस्तकहि भाकडकथा व उतारे यानींच भरलेलें दिसून येतें. दुर्दैवानें पावगींना संशोधक व चिकित्सक बुद्धि नव्हती; लेखनकला—आजच्या शास्त्रीय पद्धतीची–अवगत नव्हती व समतोल, निर्विकार दृष्टीहि आलेली नव्हती. त्यामुळें त्याचा दीर्घ विद्याव्यासंग, देशप्रेम, स्वार्थत्याग व लेखनतपश्चर्या हीं निष्फळ झालीं आर्यांच्या मूलस्थानासंबंधीं त्याचा निष्कर्ष असा कीं, आर्य प्रथम हिंदुस्थानांत होते, नंतर उत्तरध्रुवाकडे गेले व तेथून परत हिंदुस्थानांत कायमचे आले. हा शोध आणि लोकमान्य टिळकांचा शोध–आर्य हे मूळचे उत्तरध्रुवावरले–यांत किती अंतर ! टिळकांचा शोध विद्वन्मान्य झाला हें साहजिकच होतें.

पावगी हे भारतीय संस्कृतीच्या इतिहासाचे संकलनकार होते, असें थोड्या मत्यांशानें म्हणतां येईल. पुढें डॉ. केतकर यांनीं ज्ञानकोशांत जें वैदिक संशोधन आणि संकलन केलें त्याच्या आधींची पायरी म्हणजे पावगींची. त्याच्या हातून 'लोकहितवादी'प्रमाणेंच मराठीची सेवा झालेली आहे. लोकहितवादीप्रमाणें ते चौरस लेखक जरी नव्हते तरी त्यांचें लेखन जास्त आहे यांत शंका नाहीं. त्यांची एकांगी दृष्टि व विषय सामान्य जनतेच्या ग्रहणशक्तीबाहेरचा, म्हणून पावगी हे लोकप्रिय लेखक होऊ शकले नाहींत. तथापि प्राचीन भारतीय वाङ्मयावरील मराठी लेखकांत त्याना प्रामुख्याचें स्थान द्यावें लागेल.

चिं. ग. कर्वे

**वाङ्मय :**

( १ ) प्रवृत्ति व निवृत्ति; [ वेदांतविषयक ]; शके १८४१; इंदिरा छापखाना; पुणें.

( २ ) वेदकालीन भूस्तरशास्त्र अथवा भूगर्भशास्त्राचे वेदर्षि जनक; शके १८४४; इंदिरा छापखाना, पुणें.

( ३ ) सोमरस—सुरा नव्हे; शके १८४४; इंदिरा छापखाना, पुणें.

( ४ ) भाषाशास्त्र; शके १८२३; इंदिरा छापखाना; पुणें.

( ५ ) भारतीय नाटकशास्त्र व नाट्यकला आणि पौरस्त्य व पाश्चात्य रंगभूमि; शके १८२५; इंदिरा छापखाना; पुणें.

( ६ ) मनोरंजनशतक; [ पद्य ]; शके १८१५; सत्यप्रकाश छापखाना, पुणें.

( ७ ) आर्यावर्तच आर्यांची जन्मभूमि व उत्तर ध्रुवाकडील त्यांच्या वसाहती; १९२०; इंदिरा छापखाना; पुणें.

( ८ ) भारतीय साम्राज्य—पुस्तक १ लें; [ आर्यदेश व तत्संबंधीं वृत्तांत ]; शके १८१५; सत्यप्रकाश छापखाना, पुणें.

( ९ ) भारतीय साम्राज्य—पूर्वार्ध-पुस्तक २ रें; [ आर्य लोक व त्यांचें बुद्धिवैभव ]; शके १८१५; सत्यप्रकाश छापखाना; पुणें.

(१०) भारतीय साम्राज्य—पूर्वार्ध-पुस्तक ३ रें; [ आर्येतिहास व भूगोल ], शके १८१५; सत्यप्रकाश छापखाना; पुणें.

(११) भारतीय साम्राज्य—पूर्वार्ध-पुस्तक ४ थें; [ आर्यशास्त्र व कला ]; शके १८१५; सत्यप्रकाश छापखाना; पुणें.

(१२) भारतीय साम्राज्य—पूर्वार्ध-पुस्तक ५ वें; [ आर्य शासनपद्धति व संस्था ]; शके १८१५; सत्यप्रकाश छापखाना; पुणें.

(१३) भारतीय साम्राज्य—पूर्वार्ध-पुस्तक ६ वें; [ आर्यांची गृहस्थिति, नीति; सौजन्य, साहस, शौर्य, व्यापार इत्यादि ]; शके १८१५; सत्यप्रकाश छापखाना; पुणें.

(१४) भारतीय साम्राज्य—उत्तरार्ध-पुस्तक ७ वें; [ भरतखंडांतील मुख्य धर्म ]; शके १८१८; इंदिरा छापखाना, पुणें.

(१५) भारतीय साम्राज्य-उत्तरार्ध-पुस्तक ८ वें; [ भरतखंडांतील जाति-वैचित्र्य ]. शके १८२०; इंदिरा छापखाना, पुणें.

(१६) भारतीय साम्राज्य-उत्तरार्ध-पुस्तक ९ वें; [ भरतखंडांतील नानाविध भाषा ]; शके १८२२; इंदिरा छापखाना, पुणें.
(१७) भारतीय साम्राज्य-उत्तरार्ध-पुस्तक १० वें; [ संस्कृत भाषेचा इतिहास ]; शके १८२३; पुणें.
(१८) भारतीय साम्राज्य-उत्तरार्ध-पुस्तक ११ वें; [ प्राकृत मराठी भाषेचा इतिहास ]; शके १८२३; इंदिरा छापखाना, पुणें.
(१९) ऋग्वेदांतील सप्तसिंधूंचा प्रान्त अथवा आर्यावर्तांतील आर्यांची जन्मभूमि आणि उत्तर ध्रुवाकडील त्यांच्या विस्तीर्ण वसाहती; शके १८४३; इंदिरा छापखाना, पुणें.
(२०) आत्मवृत्त; शके १८४६; इंदिरा छापखाना, पुणें.

**पावगी, रावजी भवानराव** [ १८५६-१९२९ ] गद्यग्रंथकार. 'भारतीय साम्राज्य' कर्ते नाना पावगी यांचे हे धाकटे बंधु. यांचें उच्च शिक्षण मुंबईस झालें. बी. ए. झाल्यावर पी. डब्ल्यु. डी. सेक्रेटरिएटमध्यें त्यांनीं नोकरी धरली. पुढें वाढत वाढत अंडरसेक्रेटरी टु गव्हर्मेंट झाले. आयुष्याच्या पूर्वार्धांत यांना काठेवाडांतील एका संस्थानिकाबरोबर विलायतेस जाण्याचा योग आला. या प्रवासाचें वर्णन त्यांनीं 'विलायतचा प्रवास, भाग १ व २' ( १८८९; १८९२ ) यात मोठ्या मार्मिकतेनें व रसिकतेनें केलें आहे. हें वर्णन 'केसरी' पत्रांतून हप्त्याहप्त्यानें प्रथम प्रसिद्ध होऊन पुढे ग्रंथनिविष्ट झालें. तत्कालीन मराठी प्रवासवर्णनात्मक पुस्तकांत हें उत्तम आहे. "यांत संस्कृत शब्द फार आहेत, आणि चालू शब्दांनीं काम भागलें असतें, अशा ठिकाणींहि मुद्दाम संस्कृत शब्द तयार करून घातले आहेत, हा या ग्रंथाचा अल्प दोष आहे. पण सुरस, चटकदार, मार्मिक आणि विनोदपर भाषा आणि वर्णनें या गुणांमध्यें हा दोष लोपून जातो." [ रा. भि. जोशी, म. भा. घ. ]

आयुष्याच्या पूर्वार्धांत यांचा कल निरीश्वरवादाकडे होता. परंतु पुढें ते ईश्वरवादी बनले. आयुष्याच्या अखेरीस तर ते पूर्णपणें धार्मिक वृत्तीचे बनले होते. नोकरींतून निवृत्त झाल्यावर ते मिरज येथें येऊन राहिले व आपला सारा वेळ धर्म व तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांच्या परिशीलनांत घालवूं लागले. यांनीं 'पंचदशी'चें इंग्रजींत सुंदर भाषांतर केलें आहे.

**वाङ्मय :**

( १ ) आमची कुटुंबव्यवस्था; १८८७; निर्णयसागर छापखाना; मुंबई.
( २ ) विलायतचा प्रवास–भाग १ ला; १८८९; आर्यभूषण छापखाना, पुणें.
( ३ ) विलायतचा प्रवास–भाग २ रा; १८९२; आर्यभूषण छापखाना, पुणें.
( ४ ) भिउपुरी–वैजनाथ; [ स्थलवर्णनात्मक ] १८९५; आर्यभूषण छापखाना, पुणें.
( ५ ) तुर्कस्थान; [ इतिहास ] १८९३; तत्त्वविवेचक छापखाना, मुंबई.
( ६ ) मिसेस ॲानि बिझांट; १८९४; आर्यभूषण छापखाना; पुणें.
( ७ ) चार्लस ब्राडला, एम्. पी. यांचें चरित्र; आर्यभूषण छापखाना; पुणें.

**पाळंदे, भास्कर दामोदर** [ १८३२-१८७४ ] कवि व निबंधकार. यांचे वडील दामोदरभट मेणवलीस नाना फडणिसांच्या वंशजांचे आश्रित होते. तेथें निर्वाह होईना म्हणून, भास्करराव तीन वर्षांचे असतांना, त्यांसह ठाणें येथें गेले. भास्कररावांचें मराठी व दुय्यम शिक्षण ठाणें येथें व उच्च शिक्षण मुंबईस एल्फिन्स्टन कॉलेजांत झालें. या कॉलेजांतील शेवटची परीक्षा त्यांनीं १८५० त दिली. ही परीक्षा दिल्यावर त्यांस दरमहा शंभर रुपये पगारावर श्रीमंत आप्पासाहेब जमखिंडीकरांचे शिक्षक नेमण्यांत आलें; परंतु जमखिंडीकरांशीं न जमल्यामुळें ते लवकरच परत मुंबईस आले व १८५१ त एल्फिन्स्टन हायस्कूलांत त्यांनीं शिक्षकाची नोकरी पत्करली. पुढें १८५२ त त्यांस सेक्रेटरीएटमध्यें रेव्हिन्यूखात्यांत घेण्यांत आलें. तेथून अनेक अधिकारांवर चढत चढत ते स्मॉलकॉज कोर्टाच्या जज्जाचे जागेपर्यंत चढले. यांस सरकारांतून रावबहादुर किताब मिळाला होता.

पाळंदे यांचे चरित्रकार रा. भास्कर बल्लाळ निमकर यांनीं त्यांच्या लेखन-व्यवसायासंबंधीं पुढीलप्रमाणें माहिती दिली आहे.

“नेहमीं इंग्लिश ग्रंथ वाचून त्यांतील उपयुक्त माहिती आपल्या देश-बांधवांस कळविण्याची त्यांस मोठी हौस आहे. त्यावेळीं मुंबईत ‘ज्ञानप्रसारक’ या नांवाची एक मंडळी असे. त्या मंडळीपुढें त्यावेळच्या बहुतेक सर्व

मोठमोठ्या विद्वान् गृहस्थांनीं निरनिराळ्या उपयुक्त विषयांवर निबंध वाचले होते. अशा मंडळीपुढें रा. ब. पाळंदे यांनींहि अनेक वेळां निबंध वाचले ........सन १८५१ सालीं 'लंडन शहरीं हिंदु लोकांकरितां धर्मशाळा बांधण्यापासून नफे' या विषयावर उत्तम निबंध लिहिणारास सर अरस्कीन पेरी यांचे नांवाचें एक पदक बक्षीस मिळावयाचें होतें. या विषयावर भास्कररावजींनीं कॉलेजांतील अभ्यास सन १८५० सालीं पुरा करून, लवकरच पुढें सुमारें एक वर्षानें लिहिला."

"ज्ञानप्रसारक मंडळीपुढेंच भास्कररावजींनीं निबंध वाचले असें नाहीं. मुंबईंत 'स्टूडंटस् साइंटिफिक ॲण्ड लिटररी सोसायटी' या नांवाची मंडळी आहे, त्या मंडळीपुढेंहि अनेक विषयांवर त्यांनीं निबंध वाचले. त्यांनीं 'विक्रमोर्वशीय' या संस्कृत भाषेंतील नाटकाचें मराठी सुलभ गद्यपद्यात्मक भाषांतर केलें. 'पद्यरचना' या नांवाचें जें पुस्तक प्रसिद्ध आहे त्याचे कर्ते तेच होत. विद्याखात्यांत अलीकडे (१८७८ चे सुमारास) पहिलें, दुसरें, तिसरें अशीं जीं पुस्तकें चालतात त्यांतील पहिलें पुस्तक भास्कररावजींनीं केलें. ते ऑफिशिएटींग मराठी ट्रान्स्लेटर असतां त्यांनीं, परशुरामपंत तात्या गोडबोले यांनीं 'नवनीत' या नांवाचा एक ग्रंथ केला आहे. त्या ग्रंथाला 'पद्यरचना' व 'कवींचें वर्णन' हे दोन निबंध जोडले आहेत. भास्करराव अहमदनगर येथें असतां त्यांनीं 'रत्नमाला' या नांवाचा एक ग्रंथ रचिला. मुंबईंत प्रार्थनासमाजाची स्थापना झाल्यावर प्रति आठवड्यास तेथें उपासना होत असते त्या प्रसंगीं 'रत्नमालें'तील कविता त्या समाजांत गात असत. भास्कररावांनीं शेवटला ग्रंथ केला तो 'गीतासुधा' हा होय. त्यानीं केलेल्या एकंदर पुस्तकांत हे दोन ग्रंथ प्रख्यात आहेत."

**वाङ्मय :**

(१) मराठी 'पद्यरचना' व मुख्य मराठी 'कवींचें' वर्णन; [सन १८७४ पूर्वी छापलेला]; प्रकाशक सरकारी विद्याखातें, मुंबई.

(२) गीतासुधा; [गीतेवर प्राकृत साकीबद्ध समश्लोकी; मूळासह; पोथी]; १८७३; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(३) रत्नमाला; [ प्रार्थनागीतें ]; १८६७, फडके छापखाना, अहमदनगर; १८७१ इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

१ भास्करराव दामोदर पाळंदे यांचें लघुचरित्र; भास्कर बल्लाळ निमकर; १८७८

**पिटकर, अनंत नीळकंठ** [ १८६७–१९२३ ] अव्वल दर्जाचा वृत्तपत्रलेखक. योगसांप्रदायी थिऑसॉफिस्ट. रेवदंड्यानजीक चौल गांवीं यांचा जन्म झाला. शिक्षण मुंबईस रॉबर्टमनी व एल्फिन्स्टन या हायस्कूलांत झालें. १८८८ सालीं ते मॅट्रिक झाले. पुढें एक वर्षभर विल्सन कॉलेजांत पी. ईच्या वर्गांत ते होते, परंतु आर्थिक परिस्थिती अनुकूल नसल्यामुळें अभ्यासक्रम सोडून अकौंटन्ट जनरलच्या ऑफिसांत त्यांस नोकरी धरावी लागली. सुप्रसिद्ध 'हिंदु मिशनरी' गजानन भास्कर वैद्य हे यांचे लहानपणापासूनचे स्नेही. यांच्या सहवासामुळें लेखन–वाचनाकडे यांचा ओढा लागला; थिऑसॉफिस्टहि त्यांच्या मुळेंच झाले. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या अकरा आद्य संस्थापकांपैकीं पिटकर हे एक होते. सतत सहा वर्षे ते या संस्थेचे चिटणीसहि होते. पिटकर यांचा लौकिक 'केसरी' पत्राचे श्रेष्ठ दर्जाचे व बहुश्रुत बातमीदार म्हणून आहे. 'अनंत' या टोपण नांवानें कित्येक वर्षेपर्यंत 'केसरीं'त त्यांचीं बातमीपत्रें येत. सरकारी नोकरींतून निवृत्त झाल्यावर कै. कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या 'लोकमान्य' दैनिकाच्या संपादकमंडळाला ते येऊन मिळाले होते.

पिटकर यांच्या 'केसरीं'तील बातमीपत्रांचा प्रारंभ १८९२ च्या सुमारास डॉ. मिसेस ॲनी बेझंट यांचा मुंबईस प्रथम उदय झाल्याच्यावेळीं, बाईच्या व्याख्यानाचा गोषवारा देण्यापासून झाला. केसरीकर्ते यांजविषयीं लिहितात, 'हे आपल्या आवडीचें व हौसेचें काम इतकें आस्थेनें करीत कीं, कित्येक वेळीं मुंबईस सोमवारीं झालेल्या इंग्रजी व्याख्यानांची सविस्तर हकिगत, व तीहि थोडथोडकी नव्हे तर दोन अडीच रकान्यांपर्यंत, दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रसिद्ध होई. बातमीपत्र ही गोष्ट तेव्हां नवीनच असल्यामुळें आणि

मराठी लघुलेखनपद्धति अद्यापि बसावयाची असल्यामुळें या बातमीपत्रांचें केसरीच्या वाचकांना सहजच आश्चर्य व कौतुक वाटे. अशा रीतीनें विशेष कार्याकरितां हीं बातमीपत्रें सुरू झालीं. पण तीं पुढेंहि मधून मधून येत राहून मुंबईच्या चळवळींचा उल्लेख त्यांत येऊं लागला.' पिटकरांबद्दल कै. खाडिलकर यांनीं 'नवाकाळ' पत्रांत पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत. 'पिटकर यांची भाषा सरळ, सोपी व मनावर ठसा उमटविणारी असे. मुद्यास न सोडून लिहिण्याची शैली त्यांना चांगली साधली होती. वर्तमानपत्रांत संपादक ह्या नात्यानें लिहिणाऱ्या मंडळी इतक्याच योग्यतेला बातमीदार म्हणून लिहिणाराहि जाऊं शकतो, ही गोष्ट महाराष्ट्रांतील वर्तमानपत्रांच्या इतिहासांत ग. पिटकर यांच्या लेखांनीं सिद्ध केली आहे.'

**वाङ्मय :**

(१) भारतीय योगसंप्रदाय, [सर सुब्रम्हण्य ऐय्यरकृत इंग्रजी लेखाचे आधारें]; १९१६; वैद्य ब्रदर्स प्रेस, मुंबई.

(२) आनी बेझंटबाईंचीं चार व्याख्यानें; १९१६; वैद्य ब्रदर्स प्रेस; मुंबई.

(३) ॲरंडेल साहेबांचीं व्याख्यानें.

**पूर्णदास उर्फ बाबा उसपकर** [१७८८-१८७२] संतकवि. यांचें व्यावहारिक नांव बाबा उसपकर. यांच्या वडिलांचें नांव वासुदेव. उपनांव राजाध्यक्ष. सावंतवाडी संस्थानांतील बांदें पेस्यापैकीं उसप नांवाच्या खेड्यांत यांचे पूर्वज राहत होते; यामुळें उसपकर हें द्वितीय उपनांव यांच्या कुटुंबास लागत आलें आहे. श्रीदत्तात्रयाचे पूर्णानुग्रही गोपालनाथ नामक महान् साधु पुरुष सातारा प्रांतीं उदयास आले. हे देशपर्यटन करीत करीत गोमांतकांतील केरी नांवाच्या गावीं आले होते; तेथें समुद्रतीरीं त्यांच्यापासून, बाबांच्या वयाच्या सुमारें पंचविसाव्या वर्षी बाबांस ब्रह्मोपदेश झाला. त्या वेळापासून 'पूर्णदास' हें गुरूनें सांगितलेलें नांव ते चालवूं लागले. यांचे गुरू गोपालनाथ हेहि महान् अधिकारी होते. यांची माहिती पूर्णदास बाबा यांनीं आपल्या 'ज्ञानघन' ग्रंथाच्या शेवटीं दिली आहे. बाबांनीं त्यांचें अभंगबद्ध चरित्रहि लिहिलें आहे. बाबांस ब्रह्मोपदेश झाला त्या वेळची हकीगत व

गुरुपरंपरा बाबांनीं आपल्या 'ज्ञानघन' ग्रंथाच्या शेवटीं दिलेली आहे. यांचा, सामान्य लिहिणें वाचणें यापलिकडे अभ्यास झालेला नव्हता. वयाच्या अठरा-एकोणीसाव्या वर्षापासून यांची वृत्ति भ्रमिष्टासारखी दिसे. समुद्रतीर इत्यादि एकांतस्थानीं लपून बसणें; वस्त्रप्रावरणाचे संबंधानें मुळींच व्यवस्थितपणा नसणें, अन्नोदकाची फारशी पर्वा न ठेवणें, अशा प्रकारची यांची उदास वृत्ति झाली, आणि त्यामुळें प्रापंचिक व्यवहारांत यांचा कांहीं उपयोग होइनासा झाला; म्हणून यांच्या घरची मंडळी यांचा फार तिरस्कार करीत असे. एके दिवशीं सहजगत्या फिरत फिरत गोमांतकांतील केरी गांवीं ते गेले होते; तेथें समुद्रतीरीं केतकीच्या झाडींत एकांतीं बसलेले असतां, यांस सद्गुरु 'गोपालनाथ' यांची भेट झाली; व तेव्हांपासून यांच्या वृत्तींत विलक्षण फरक पडला व हे वेडे होते तेच तेव्हांपासून उत्तम वक्ते व ज्ञानी झाले. पुढें यांनीं, मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, सोहिरोबानाथ, तुकाराम, इत्यादिकांच्या ग्रंथांचा श्रवण, मनन, निदिध्यासपूर्वक अभ्यास केला, व ते त्यांत इतके निष्णात झाले कीं ते श्रोत्यांस समजून देणें हा केवळ त्यांच्या हातचा मळ झाला. महाराष्ट्रांतील बहुतेक साधु व कवि यांचे बरेच पारमार्थिक ग्रंथ लांबलांबून प्रयत्नानें आणवून त्यांच्या प्रति स्वहस्तें परहस्तें ते लिहून ठेवीत. अशा ग्रंथांचा बराच मोठा संग्रह त्यांच्या समाधिगृहांत केलेला आढळतो. "कनक कांता नये चित्ता, तोचि परमार्थी पुरता" या प्रमाणेंच यांची वृत्ति होती. यांचें, संप्रदायदीक्षेनंतरचें वास्तव्य रत्नागिरी जिल्ह्यांतील वेंगुर्ले या शहरीं होतें. यांची समाधी 'उभा दांडा' नांवाची या शहराची वाडी आहे, तेथें आहे. [ 'सिद्धांतसंहिता' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंतून; भगवंत बाळकृष्ण पै. ]

**वाङ्मय :**

( १ ) श्रीगोपालनाथ चरित्र–ओंविबद्ध ( २ ) पूर्णसार–ओंविबद्ध; ( ३ ) पंचीकरण–ओंवीबद्ध; ( ४ ) बहिरापिसा चरित्र–ओंविबद्ध; ( ५ ) आत्म-रामायण बालकांड–ओंविबद्ध; ( ६ ) वत्सलास्वयंवराख्यान–छंदोबद्ध; ( ७ ) श्रियाळचरित्र; ( ८ ) बालचरित्र–प्रथम, द्वितीय; ( ९ ) पक्षी चरित्र; याखेरीज स्फुट कटिबंध, पदें, लावण्या, अष्टकें, स्फुट अभंग, शकुनरत्नमाला, नारदी-लावणी वगैरे बरीच कविता आहे.

**पेंडसे, सीताराम वासुदेव** [ १८८३—१९३१ ] कवि. जन्म केळवें–माहीम येथें झाला. १९०६ सालीं बी. ए. झाले. बडोदें कॉलेजांत कांहीं दिवस फेलो होते. १९१२ सालीं सयाजीराव महाराजांनीं त्यांची राजपुत्र धैर्यशीलराव यांचे शिक्षक म्हणून नेमणूक करून, त्यांस त्यांचे बरोबर विलायतेस पाठविलें. विलायतेहून परत आल्यावर बडोद्यास असिस्टंट कमिशनर ऑफ एज्युकेशन या जागेवर त्यांची नेमणूक झाली. १९२५ सालीं सध्यांचे महाराज व त्यावेळचे राजपुत्र प्रतापसिंह यांचे शिक्षक म्हणून त्यांनीं काम केलें. अखेरचे दिवसांत बडोदें प्रांताचे ते सुभे होते. यांची कविता उद्यान, मनोरंजन, काव्यरत्नावलि वगैरे मासिकांत प्रसिद्ध झालेली आहे. कवितेप्रमाणेंच चित्रें काढण्याचा त्यांना नाद होता. हिंदी भाषेचाहि त्यांचा व्यासंग चांगल्यापैकीं होता.

**वा ङ्म य:**

( १ ) श्री मज्जयसिंह विवाह, १९१३ [ जयसिंहराव सयाजीराव गायकवाड यांचेवरील खंडकाव्य ]; बडोदें.
( २ ) पद्यकुसुमांजलि, १९१७, [ स्फुट कविता ]; बडोदें.
( ३ ) शिशुसंमेलनोत्सव काव्य, १९१०; बडोदें.
( ४ ) संस्कृत वाङ्मयाचा इतिहास, १९१५, [ डॉ. मॅक्डोनेलकृत ‘ हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर’चें भाषांतर ], सयाजी साहित्यमाला, बडोदें.
( ५ ) महाराजा शिवाजी, [ चरित्र ] १९१९; श्री सयाजी साहित्यमाला, बडोदें.

**सं पा द न:**

१ काव्यकलिकागुच्छ, १९१५; [ प्राचीन व अर्वाचीन काव्यांतील वेंचे. ]; बडोदें.
२ रसतरंगिणी, १९१०; [ प्राचीन व अर्वाचीन काव्यांतील वेंचे. ]; दा. सा. यंदे; मुंबई.

**पै, भगवंत बाळकृष्ण** [ १८६१–१९१६ ] योगिराज सोहिरोबानाथ आंबिये यांच्या कवितेचे संपादक व प्रकाशक. जन्म सावंतवाडी संस्थानांतील होडावडें या गांवीं झाला. यांचे पूर्वज गोमांतकांतील रायशिरोडें येथें राहत

असत. परंतु पोर्तुगीज अंमलाला कंटाळून ते सावंतवाडीकर भोंसल्यांच्या आश्रयास आले व वेंगुर्लें–उभादांडा येथें 'मूठ' नांवाची समुद्रालगत बागायत जमीन आहे तेथें राहिले. तेथून कांहीं वर्षांनीं भगवंतराव यांचे आजोबा सोनबा पै हे तेथून कांहीं मैलांवर असलेल्या तळवडें या गांवीं येऊन राहिले व स्वकष्टानें त्यांनीं तेथें जमीन–जुमला संपादन केला. हे स्वतः व त्यांचे चिरंजीव बाळकृष्णपंत हे 'प्रपंच साधून परमार्थ' करणाऱ्यांपैकीं व्यक्ती होत्या. विशेषतः बाळकृष्णपंत हे वैदिक कर्मानुसार वर्तन करणारे व निष्ठावंत दत्तोपासक होते. वडिलांचें हें परमार्थमार्गाचें वळण भगवंतराव यांसहि उत्तम प्रकारें लागलें. आणि त्यामुळेंच, लौकिक शिक्षण मराठी चार इयत्तांपलिकडे झालें नसतांहि, पारमार्थिक तळमळ निववविण्यासाठीं, सद्ग्रंथांचा व काव्याभ्यासकांचा सहवास घडून सोहिरोबानाथांसारख्यांचे ग्रंथ संपादित करण्यास धजण्याइतकी त्यांच्या प्रज्ञेची तयारी झाली. सोहिरोबानाथांच्या कवितेचें संपादन व प्रकाशन हा एकच उद्योग त्यांनीं जन्मभर केला. या उद्योगासंबंधीं त्यांनीं स्वतः 'श्रीमहदनुभवेश्वरी' या ग्रंथाच्या प्रारंभीं पुढीलप्रमाणें हकिगत दिली आहे. " योगीराज सोहिरोबानाथ ह्या सत्पुरुषाकडून स्फूर्तिप्रभावानें झालेलीं पारमार्थिक कार्यें बहुतेक नष्टप्राय झालीं व हल्लीं उपलब्ध झालेली कविताहि प्रायः नष्टप्रायच होत चालली होती; ही प्रसिद्ध व्हावी अशी फार दिवसांपासून माझी इच्छा होती; ती पूर्ण होण्याचा सुदीन आज आला आहे, प्रथमतः यांचीं कित्येक पदें गवयी लोक व वारांगना यांच्या मुखांतून सुस्वर आलापांनीं गाइलेलीं मात्र आम्ही ऐकत होतों; व त्यांनीं रचलेलीं कांहीं पदेंच काय तीं आहेत, असा स्वतः माझा समज होता. इतकेंच नव्हे, तर त्या पदांतील केवळ सुस्वर रागरागिणी व तालसुरांदिकांचा मोहकपणा यांकडे लक्ष जाऊन मन तल्लीन होत असे, परंतु त्यांतील अर्थगांभीर्य व पारमार्थिक सत्यानें ओथंबलेल्या अशा स्वानुभवदर्शक खुणा त्यांत ओतप्रोत भरल्या आहेत, या गोष्टीचें त्यावेळीं अर्थात् मला मुळींच भान नव्हतें; परंतु यांच्या पदांच्या श्रवणमननाच्याच योगानें पुढें पुढें यांच्या कवितेविषयीं निदिध्यास लागला. व तिचा शोध करण्याविषयींचा प्रयत्न मजकडून सुरू झाला व तेव्हांपासून माझ्या हातीं आली तेवढी कविता संग्रहित करून त्या कवितेमधून 'सोहिरोबा

आंग्रियेकृत पदसंग्रह' या नांवाचें पुस्तक (शा. शके १८०६ या वर्षी) मुंबई निर्णयसागर छापखान्यांत छापवून मी प्रसिद्ध केलें. परंतु त्या पुस्तकास मिळावा तसा लोकाश्रय मिळाला नाहीं; व दुसऱ्याहि अनेक कारणामुळें त्यावेळीं माझें सर्वथैव नुकसानच झालें. तथापि त्या नुकसानाच्या संबंधानें मला बिलकूल वाईट वाटलें नव्हतें, परंतु 'प्रथमग्रासे मक्षिकापातः' ह्या वाक्यांत म्हटल्याप्रमाणें यांचे ग्रंथ प्रसिद्ध करण्याविषयींच्या माझ्या प्रबल मानसिक उत्साहाचा मात्र त्यावेळीं बराच भंग झाला आणखी त्यानंतर रोगग्रस्त होऊन जवळ जवळ दीड तपपर्यंत माझ्या आयुष्याचा काल कष्टमय स्थितींत गेला."

"रोगग्रस्त स्थितींतून मोकळा झाल्यानंतर थोडेंसें शरीरसामर्थ्य प्राप्त झाल्याबरोबर ह्या ग्रंथजीर्णोद्धाराच्या संबंधाचे विचार पुनः माझ्या अंतःकरणांत रात्रंदिवस घोळूं लागले. इतक्यांत 'काव्यसंग्रह' मासिक पुस्तक भरभराटीस येऊन त्यांचें चालकत्व कै. वामन दाजी ओक यांजकडे आल्यावर त्यांच्याशीं पत्रव्यवहार सुरू ठेविला व 'काव्यसंग्रहा'स मजकडून होणारी शक्य ती मदत करून, त्यांचें परम प्रेम संपादन केलें, आणि मग सोहिरोबानाथांच्या ग्रंथजीर्णोद्धाराविषयींचें माझें हृद्गत त्यांच्या पुढें ठेविलें. त्या सद्गृहस्थानें माझें म्हणणें तत्काल मान्य करून त्यांचे अनुमतीनें काव्यसंग्रहांत नाथांचे समग्र ग्रंथ छापून काढण्याविषयींचा संकल्प ठरून छापण्यास सुरवातहि झाली, आणि 'सिद्धांतसंहिता' ग्रंथाचे अध्याय छापूनहि निघाले होते. इतक्यांत वामन दाजी ओक कैलासवासी झाले आणि त्यामुळें पुढें काव्यसंग्रहाची दिशाहि पण बदलली, अर्थात् सोहिरोबानाथकृत ग्रंथजीर्णोद्धाराचें त्या संग्रहांत होत असलेलें कामहि बंद पडलें. मनुष्याचा संकल्प एक असतो व ईश्वराच्या घरचे नियमानियम निराळया प्रकारचे असतात...... 'म्हणे सोहिरा गुरुनाथ हा। माझ्या हृदयीं घुसून ॥ जनांसि उद्धरावया कारणें। वचन सांगतो ठसून ॥ ह्या नाथांच्या म्हणण्याप्रमाणें ह्या ग्रंथजीर्णोद्धार कृत्यास प्रथमतः शालिवाहन शक १८२७ भाद्रपद मासापासून 'योगीराज सोहिरोबानाथ' नांवाच्या त्रैमासिक रूपानें सुरवात केली आणि त्यांतून (१) सिद्धांतसंहिता, पूर्वार्ध, अ. ९, (२) सिद्धांतसंहिता, उत्तरार्ध अध्याय ९, (३) पदसंग्रह, भा. १ ला पदें ३११; (४) पदसंग्रह, भा. २, पदें १३८; (५) पदसंग्रह, भा. ३, स्फुटकाव्यें १८२; (६)

किरकोळ तीन लहान लहान ग्रंथ; १ अद्वयानंद, २ पूर्णाक्षरी, ३ अक्षयबोध (तिन्ही एकत्र) याप्रमाणें छापून पूर्ण करून आश्रयदात्यांस समर्पण केले. आज ह्या आमच्या शेवटच्या प्रस्तावनालेखासमवेत नाथांचा शेवटीं राहिलेला ग्रंथ श्री महदनुभवेश्वरी हा सर्वांग परिपूर्ण करून महाराष्ट्रीय बंधुजनांस सप्रेम सादर करीत आहों."

संत सोहिरोबानाथ आंबिये हे थोर नाथपंथीय योगी दोनशें वर्षांपूर्वी सावंतवाडी संस्थानांतील बांदें या गांवीं होऊन गेले. स्वतंत्र प्रज्ञेचे असे हे थोर अधिकारी पुरुष होते. वयाच्या पस्तिसाव्या वर्षी यांना वैराग्य प्राप्त होऊन, गैबीनाथ नांवाच्या साधूकडून यांस अनुग्रह मिळाला. वयाच्या ६० व्या वर्षांपर्यंत हे स्वग्रामींच होते. पुढें स्वग्राम सोडून तीर्थयात्रा करण्यासाठीं व साधुसंतांच्या भेटीसाठीं ते उत्तर हिंदुस्थानांत गेले. तिकडून ते परत आलेच नाहींत. वयाच्या ऐशींव्या वर्षी त्यांनीं हा लोक सोडला. त्यांचा मृत्यू हेंहि एक गूढच आहे. त्यांचें शरीर कोणास आढळलें नाहीं. त्यांची अखेरचीं वर्षें उज्जैनीस गेलीं. त्यांचे अक्कलकोट, सुरत व उज्जैन येथें मठ आहेत. अध्यात्ममार्गांत ते जवळ जवळ ४०-४५ वर्षे होते. एवढ्या मुदतींत त्यांच्याकडून कितीतरी कविता झाली. त्यांच्या स्वतःच्या हातची अशी कविता आढळत नाहीं. कविता सहज स्फुरावी व सांगातीं असलेल्या व्यक्तीनें ती टिपून घ्यावी असा प्रकार असे. 'सोहिरोबांच्या कवितेचा बराच भाग त्यांच्या बहिणीच्या हातचा आहे. या बाईस चांगलें लिहितांवाचतां येत असून तिला कविता रचण्याची विशेष आवड असे. सोहिरोबा ब्रह्मानंदांत असतां ज्या कविता रचीत त्या ही बाई लिहून ठेवी. सोहिरोबांची आज जी कविता उपलब्ध आहे ती या बाईच्या काव्यवाचनलालसेचेंच फळ होय. असें होतें तरी सोहिरोबांची बरीच कविता नष्टहि झाली. याचीं कारणें अनेक आहेत. त्या वेळीं कागद फार महाग असल्यामुळें सोहिरोबांस ते विकत घ्यावयास सामर्थ्य नव्हतें, यामुळें त्यांच्या बहिणीनें कांहीं कविता झाडांच्या पानावर लिहून तीं पानें एका खोलींत व्यवस्थेनें रचून ठेविलीं असतां, त्यांच्या वृद्ध मातुश्रीनें तीं सर्व पानें कचरा समजून जाळून टाकिलीं! या तिच्या कृत्यानें सोहिरोबांची किती कविता नष्ट झाली असेल हें सांगतां येणें कठीण आहे.

दुसरें असें कीं सोहिरोबांचें वास्तव्य एकाच ठिकाणीं नव्हतें. आपल्या घरीं ते थोडाच वेळ रहात व गोमांतकांत वगैरे वरचेवर त्यांचें जाणें येणें होत असल्यामुळें त्यांची कविता तेथील लोक लिहून ठेवीत, यामुळें ती सर्वत्र पसरली गेल्याकारणानें एक ठिकाणीं मिळत नाहीं.' [ आजगांवकर; म. क. च., भा. १ ला. प्रथमावृत्ति ] सोहिरोबांच्या कवितेचा शोध करून ती प्रकाशांत आणण्याचा चिकाटीचा प्रयत्न रा. पै यांनीं केला. सोहिरोबांच्या वंशजांकडे फारशी कविता त्यांना मिळाली नाहीं. जी कांहीं मिळाली ती गोमांतकांत व वेंगुर्लें येथील गेल्या शतकांतील एक प्रसिद्ध साधु बाबा उसपकर उर्फ पूर्णदास यांच्या समाधिमंदिरांत. पूर्णदासांनीं सोहिरोबानाथांचे 'सिद्धांतसंहिता', 'अक्षय बोध', 'पूर्णाक्षरी' हे तीन ग्रंथ, सुमारें पांचशें पदें व स्फुट कविता स्वहस्तें लिहून ठेविलेली आहे. या लिखितांमुळेंच पै यांना सोहिरोबांचे ग्रंथ प्रसिद्ध करणें शक्य झालें.

पै यानीं 'काव्यसंग्रह', 'मयुर', 'वामनपंडित' वगैरे प्राचीन काव्यविषयक मासिकांचा आदर्श पुढें ठेवून व वामन दाजी ओक, विनायक लक्ष्मण भावे, गजानन भास्कर वैद्य, डॉ. सांभारे, परब वगैरेंची मधुन मधुन सल्लामसलत घेऊन अर्थनिर्णायक विस्तृत टीपांसह व जरूर तेथें वेदान्तविषयक कूटप्रश्नांचें साधार व माहितीपूर्ण स्पष्टीकरण करून सोहिरोबानाथांचे उपलब्ध झाले तेवढे ग्रंथ कसोशीनें संपादून प्रसिद्ध केले. यासाठीं त्यानीं स्वतः योग, वेदान्त, सांख्य इत्यादि शास्त्रें; उपनिषदें, भगवद्गीता, ज्ञानेश्वरी इत्यादि अनेक ग्रंथांचें परिशीलन केलें; तसेंच श्रीमच्छंकराचार्य, सायनाचार्य, श्रीमुकुंदराज, ज्ञानेश्वर, अमलानंद, तुकाराम, श्रीरंगनाथ, रामदास, वामनपंडित इत्यादि थोर आध्यात्मवाद्यांनीं आत्मज्ञानासंबंधीं लिहून ठेवलेल्या विचारांशीं परिचय करून घेतला. या त्यांच्या व्यासंगाचा पडताळा, सोहिरोबानाथांच्या ग्रंथांतील टीपांत जागोजाग पहावयास मिळतो.

**वा ङ्म य :**

( १ ) योगिराज सोहिरोबानाथकृत सिद्धांतसंहिता-पूर्वार्ध-अध्याय १ ते ९; १९०६; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(२) योगिराज सोहिरोबानाथकृत सिद्धांतसंहिता-उत्तरार्ध-अध्याय १० ते १८; १९०६; इंदुप्रकाश मुंबई.

(३) योगिराज सोहिरोबानाथकृत श्रीमहदनुभवेश्वरी [ ओंव्या अध्याय १८ अर्थनिर्णायक टीपांसह ]; १९१०; इंदुप्रकाश, मुंबई.

(४) योगिराज सोहिरोबानाथकृत पद्यसंग्रह-भा. १ ला. [ भक्तिपर, उपदेशपर आणि हिंदुस्थानी पदें ]; १९०७ इंदुप्रकाश, मुंबई.

(५) योगिराज सोहिरोबानाथकृत पद्यसंग्रह-भा. २ रा [ प्रासंगिक व वेदांतविषयक पदें; विपुल टीपांसह ]; १९०७; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(६) योगिराज सोहिरोबानाथकृत पद्यसंग्रह-भा. ३ रा. [ बखर, श्लोक, अभंग इ. ], १९०७; इंदुप्रकाश, मुंबई.

(७) बांदें येथील प्रसिद्ध साधु व कवि सोहिरोबा आंब्रियेकृत पदसंग्रह, शके १८०६, निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(८) योगिराज सोहिरोबानाथकृत पारमार्थिक ओविबद्ध किरकोळ ग्रंथ [ १ श्री अद्वयानंद; २ पूर्णाक्षरी; ३ अक्षयबोध ]; १९०७; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

**पैठणकर, नारायण बळवंत** [ १८७१-१९३८ ] कवि; नाटककार. जन्म अहमदनगर येथें झाला. शिक्षण अहमदनगर एज्युकेशन सोसायटीच्या शाळेंत झालें. हुशार विद्यार्थी म्हणून त्यांनीं लौकिक मिळविला होता. १९०० सालीं त्यानीं वकिलीची परीक्षा देऊन, अहमदनगर जिल्ह्यांतील पारनेर गांवीं वकिली सुरू केली. नगर जिल्ह्यांतील पहिल्या प्रतीच्या वकिलांत त्यांची गणना होत असे. एक थोर, सज्जन व परोपकारी गृहस्थ म्हणूनहि त्यांनीं लोकांचा आदर संपादिला होता. दत्त कवींचे हे जिव्हाळयाचे स्नेही होते. दत्त कवींनीं ' मित्रा नारायणा ' म्हणून जी एक कविता लिहिली आहे ती यांनाच उद्देशून आहे.

पैठणकर यांनीं एक सामाजिक व दोन पौराणिक अशीं नाटकें लिहिलीं आहेत. नाटकांचें वळण जुनें-किर्लोस्करी-आहे. ' काव्यग्रंथ ' नांवाचा एक छोटासा पद्यसंग्रहहि यानीं प्रसिद्ध केला आहे.

**वाङ्मय :**

(१) संगीत रघुकुमार नाटक, [ रघुवंशाचे आधारें ]; १९०२; पारनेर, जिल्हा अहमदनगर.

(२) संगीत चंद्रहास नाटक, पौराणिक, १९२०; जगद्धितेच्छु प्रेस; पुणें.

(३) पतिव्रतेचें वैकुंठ, गद्य सामाजिक नाटक; १९३६, मोहनमुद्रणालय; अहमदनगर.

(४) काव्यग्रंथ, [ गीतेवर वेदान्तपर पदें ], १९३७, मोहनमुद्राणालय; अहमदनगर.

**प्रधान, बजाबा रामचंद्र** [ १८३८–१८८६ ] कवि व कथालेखक. रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली हें यांचें जन्मस्थान. वऱ्हाडप्रांतांत शिक्षण-खात्यांत यांनीं नोकरी केली. एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या जागेपर्यंत हे चढले होते. 'दैवसेनी' हें सर वॉल्टर स्कॉटच्या 'लेडी ऑफ दी लेक' या काव्याच्या आधारें लिहिलेलें यांचें काव्य विशेष प्रसिद्ध आहे. " आधुनिक मराठी कवितेच्या इतिहासांत " दैवसेनी ' काव्याचें स्थान अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें ठरेल. काळोख पडल्यावर क्षितिजावर प्रथमच लुकलुकणारा तारा जरी आपल्या प्रभेनें दिशा उजळूं शकत नाहीं, तरी त्याचें तें सौम्य तेज मनाला एक प्रकारचा आल्हाद निःसंशय देतें. अव्वल इंग्रजी अमदानींत 'दैवसेनी'नें केलेलें कार्य सामान्यतः अशाच स्वरूपाचें आहे. पाश्चात्य कवितेशीं नव्यानेंच परिचित झालेल्या तत्कालीन सुशिक्षितांनीं जेव्हां सभोंवार दृष्टि फेंकली, तेव्हां जुन्या मराठी कवितेंत तशा तऱ्हेचें कांहींच वैचित्र्य त्यांना न आढळून त्यांच्या मनाचा हिरमोड झाला. त्यांच्या या हिरमुसलेल्या मनांत पाश्चात्य धर्तीची कविता मराठींत लिहिण्याच्या शक्यतेची उमेद जर प्रथम कोणी उत्पन्न केली असेल, तर ती 'दैवसेनी'नें."

" आज पैशापासरी प्रसिद्ध होणारी भाव–कविता वाचणारांना 'दैवसेनी' हें इंग्रजी धर्तीवरील पहिलें मराठी काव्य आहे, ही गोष्ट कदाचित् खरी वाटणार नाहीं. कारण हें काव्य अलीकडील पद्धतीप्रमाणें भावप्रधान म्हणजे वैणिक नसून, सर्वस्वी कथात्मक आहे. किंबहुना, ज्या मूळ 'लेडी ऑफ दी लेक'

या इंग्रजी काव्यावरून बजाबांना हें काव्य रचण्याची स्फूर्ति झाली, त्यांत मधून मधून घातलेल्या गीतांप्रमाणें त्यांनीं एकहि गीत 'दैवसेनींत' घातलेलें नाहीं. याचें कारण असें कीं, आधुनिक कवितेला आजचें वैणिक स्वरूप हें मुख्यतः विसाव्या शतकांत, म्हणजे टिळक-केशवसुतांच्या उदयानंतर, प्राप्त झालें."

आधुनिक कवितेचा उगम इंग्रजी कवितेचा अनुवाद आणि अनुकरण यांतून झाला. 'दैवसेनी' हा अनुवादहि आहे व अनुकरणहि आहे. विख्यात इंग्रजी कवि आणि कादंबरीकार सर वॉल्टर स्कॉट याच्या 'लेडी ऑफ दी लेक' या काव्याच्या आधारानें 'दैवसेनी'ची रचना करण्यांत आली आहे. पण तें निव्वळ रूपांतर मात्र नाहीं. साधला तेथें अनुवाद व नाहीं तेथें अनुकरण, असें दुहेरी सोईस्कर धोरण कवीनें त्याच्या रचनेच्या बाबतींत स्वीकारलेलें दिसतें."

"हें काव्य रचण्याची स्फूर्ति जरी बजाबांना 'लेडी ऑफ दी लेक' वाचून झालेली असली, तरी त्यांनीं अनुवाद असा फक्त त्याच्या पहिल्या सर्गाचाच केला असून, सहाव्या सर्गांतील कांहीं प्रसंगांची छाया त्याच्या शेवटच्या भागावर पडलेली आहे. स्कॉटच्या कथानकाप्रमाणें त्यांचेंहि कथानक कल्पितच दिसतें."

"स्कॉटचें 'लेडी ऑफ दी लेक' हें काव्य अत्यंत ओजस्वी असून, त्यांतील निरनिराळया दृश्यांचीं आणि प्रसंगांचीं शब्दचित्रें कमालीचीं मनोवेधक आहेत. 'दैवसेनी' काव्यांत ओजोगुण जरी मुळींच नसला, तरी त्याची रचना सुश्लिष्ट असून, त्यांतील वर्णनेंहि टिपदार आहेत. त्यांची भाषा त्यांचे समकालीन कवि बापुसाहेब कुरुंदवाडकर यांच्यासारखी संस्कृतप्रचुर नाहीं किंवा 'राजा शिवाजी' कर्ते कुंटे यांच्या भाषेसारखी गांवढळहि नाहीं. तिची घडण ही रेशमी धागा आडवा घेऊन विणलेल्या गर्भ रेशमी वस्त्रासारखी म्हणजे संस्कृताच्या माफक मिश्रणानें श्रुतिसुभग झालेली आहे. रेंदाळकर यांनीं 'लेडी ऑफ दी लेक'च्या आधारानें लिहिलेल्या 'जाधवांची मंजुळा' या अपूर्ण काव्यांशीं 'दैवसेनी'ची तुलना केली असतां बजाबांच्या शैलीचा हा विशेष चांगला लक्षांत येतो. त्यांची रचना सामान्यतः नीटस असली तरी अलंकारिक नाहीं. आणि, रसगर्भ शब्द साक्षेपानें योजिल्यामुळें कृष्णशास्त्री

चिपळूणकर यांच्या रचनेला जो एक प्रकारचा मनाला आनंदित करणारा नाद सहजासहजीं येऊन जातो, त्याचाहि या काव्यांत बहुतेक अभावच आढळतो. नाहीं म्हणावयाला—

> ‘ वाजीपृष्ठिं वदे असेहि जवळी
> राजी जयाची सखी।
> जी जीवाधिक मानिली
> म्हणुनि ती लाजीरवाणी मुखीं॥

हा एक श्लोक मात्र रघुनाथपंडितांच्या नलोपाख्यानांतील शब्दचमत्कारांची आठवण देणारा असा दृष्टीस पडतो. शब्दालंकारांप्रमाणेंच अर्थालंकारहि या काव्यांत फारसे नाहींत. पण, नवे संकेत किंवा उपमा निर्माण करण्याचें सामर्थ्य जरी बजाबांच्या ठिकाणीं नव्हतें, तरी जुने उपमा-संकेत सढळ हातानें वापरून काव्याला उसनी शोभा आणण्याचा अप्रयोजकपणाहि त्यांनीं केलेला नाहीं.

> ‘ गोड कौतुक त्या मुग्ध अवस्थेचें
> बाल्य जेव्हां स्त्रीत्वांत विरे साचें
> शुभ्र उदकें पर्णांत सांचलेलीं
> एकवटुनी गळतात बिंदु खालीं.
> करिल भास्कर हा विफल मृदुल याचें
> म्हणुनि रोदन कीं करिति वृक्षपत्रें.

अशा तऱ्हेची एकाद दुसरी मनोहर कल्पना मध्येंच कुठें तरी दिसून येते. त्याचप्रमाणें ‘ हे अद्रि स्थूलदेही अमित गज जसे ठाकले उंच भागीं ’ या श्लोकांत रूपक साधण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु, या काव्याची गोडी जर खरोखर कशांत असेल, तर ती त्याच्या साध्या पण प्रसन्न रचनेंत. त्यामुळें इंग्रजीवरून लिहिलेलीं तत्कालीन इतर मराठी काव्यें जरी लोकांच्या स्मरणांतून निघून गेलीं, तरी, विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनीं म्हटल्याप्रमाणें, मराठी कवितेला लागलेल्या नव्या वळणाचें प्रसादचिन्ह म्हणून ‘ दैवसेनी’चें महत्त्व मात्र कायम राहील.” [ संक्षेप. बजाबा प्रधान यांची ‘दैवसेनी’; ग. त्र्यं. माडखोलकर; वागीश्वरी, आक्टो. १९३४ ]

बजाबा वऱ्हाडांत जाऊन स्थिर होण्याचे आधीं कांहीं काळ मुंबईंत होते. मुंबईंत असतांना ते 'मित्रोदय' वर्तमानपत्राचे मुख्य लेखक होते. पुढें तें पत्र बंद झाल्यावर 'नेटिव ओपिनिअन' पत्राला ते मराठी लेख देत असत.

१८७२ सालीं वऱ्हाड शाळाखात्यांतील अधिकाऱ्यांनीं 'ज्ञानसंग्रह' नांवाचें नियतकालिक काढलें, त्यांत बजाबा लिहीत असत. 'सद्गुणी स्त्री' या त्यांच्या दीर्घ गोष्टीचा उत्तर भाग यांत प्रसिद्ध झाला. १८७७ सालाचे सुमारास बजाबा व श्रीराम भिकाजी जठार या दोघांनीं मिळून शेक्स्पियरच्या 'कॉमेडी ऑफ एरर्स' या नाटकाचें 'भ्रांतिकृत चमत्कार' या नांवानें भाषांतर केलें. शेक्स्पियरचीं नाटकें मराठींत, त्यांतील मूळ वैशिष्ट्य राखून, उतरविणें अशक्य अशी समजूत होती. ती या नाटकानें चुकीची ठरविली. या नाटकाचा त्या काळीं फार बोलबाला झाला.

बजाबा कवितेपेक्षांहि गोष्टी फार सुंदर लिहीत. 'सद्गुणी स्त्री', 'हृदयद्रावक गोष्ट', 'गतसालची गोष्ट' या त्यांच्या गोष्टी उत्तम वठल्या आहेत.

**वाङ्मय :**

(१) दैवसेनी; १८६७, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई; १८७७, निर्णयसागर छापखाना, मुंबई; १९३४ गोपाळ छापखाना, नागपूर.

(२) दोन गोष्टी; १८८१, निर्णयसागर छापखाना, मुंबई; १८८८, गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(३) सद्गुणी स्त्री; आ. दुसरी, १८८८; गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई.

(४) भ्रांतिकृत चमत्कार, १८७८; [वऱ्हाडसमाचारांतून प्रसिद्ध झालें.]

## चरित्र, चर्चा, अभ्यास

१ दैवसेनी; परीक्षण, विविधज्ञानविस्तार, पु. १, अंक ४, १८६७

२ बजाबा प्रधान यांची 'दैवसेनी', चर्चा, ग. त्र्यं. माडखोलकर; वागीश्वरी, आक्टोबर १९३४

३ भ्रांतिकृत चमत्कार; परीक्षण, विविधज्ञानविस्तार, पु. १५, अंक ५-७, १८८३

४ मृत्युलेख व चरित्र; विविधज्ञानविस्तार, पु. १८, अंक ३, १८८६
५ कविवर्य बजाबा रामचंद्र प्रधान यांचें चरित्र; अभिनव प्रभुरत्नमाला, रत्न १ लें, विनायक सीताराम जयवंत.

**प्रधान, रामचंद्र गणेश** [ १८७६–१९४० ] गद्यलेखक व सार्वजनिक कार्यकर्ता. हे नाशिकचे राहणारे. राजकारणाकडे–विशेषतः राज्यशास्त्राच्या अभ्यासाकडे–यांचा विशेष ओढा असे. १९०७ सालीं श्यामजी कृष्णवर्मा यांची शिष्यवृत्ती मिळवून राजकारणाच्या अभ्यासासाठीं हे विलायतेस गेले होते. १९१६ सालीं होमरूल लीगच्या चळवळींत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. त्या सुमारास 'भारतसेवक' नांवाचें मासिकहि त्यांनीं काढलें. १९१९ सालीं जॉईंट पार्लमेंटरी कमिटीपुढें होमरूल लीगतर्फे यांनीं साक्ष दिली होती. पुढें १९२३ सालीं स्वतंत्र प्रागतिक म्हणून मुंबई कायदेमंडळांत हे निवडून आले होते. १९३७ मध्यें राष्ट्रीय कॉंग्रेसला येऊन ते मिळाले व तिच्यातर्फे मुंबईच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्यें निवडून आले.

**वाङ्मय :**

( १ ) प्रतिनिधिसत्ताक राज्यपद्धति, १९२६
( २ ) प्लेटो व त्याचे राजकीय विचार, १९३०
( ३ ) देशसेवा अथवा भारतसेवकांतील निवडक लेख, १९३०
( ४ ) विमलादेवी, [ मॉरिस मेटरलिंकच्या 'Monna Vanna' चें गद्य रूपांतर ], १९३७

**पृथ्वीगीर हरिगीर** [ १८७६–१९३१ ] वृत्तपत्रकार व इतिहास-संशोधक. हे यवतमाळचे राहणारे असून गोसावी सांप्रदायिक होते. 'हरि-किशोर' या नांवाचें साप्ताहिक त्यांनीं पुष्कळ वर्षें चालविलें. ते टिळकांचे कट्टे अनुयायी होते. यांनीं 'गोसांवी व त्यांचा संप्रदाय' या नांवाचा गोसाव्यांचा चिकित्सापूर्वक संशोधन करून लिहिलेला इतिहास महत्त्वाचा आहे.

**वाङ्मय :**

( १ ) गोसावी व त्यांचा संप्रदाय, भाग १ ला, १९२६; हरिकिशोर छापखाना; यवतमाळ.

( २ ) गोसावी व त्यांचा संप्रदाय, भाग २ रा. [ प्रस्तावना–कृष्णशास्त्री घुले ] १९३१; हरिकिशोर छापखाना, यवतमाळ.

**फडके, नारायण लक्ष्मण** [१८५९–१९२० ] इंग्रजी तात्त्विक-विशेषतः स्पेन्सर-ग्रंथाचा भाषांतरकार. यांचा राजापूर येथें मार्गशीर्ष वद्य १२ शके १७८१ रोजीं जन्म झाला. वडिलांच्या मृत्यूनंतर मातोश्री, वडील बहीण व धाकटा भाऊ यांसह ते मुंबईस वयाच्या दहाव्या वर्षी आले. अत्यंत गरिबींत दिवस काढून त्यांनीं आपलें इंग्रजी शिक्षण पुरें केलें. १८८२ सालीं एल्फिन्स्टन कॉलेजां-तून ते बी. ए. झाले. परीक्षा पास झाल्यावर १८८३ सालीं त्यांना एल्फिन्स्टन हायस्कुलांत शिक्षकाची नोकरी मिळाली. तेथें असतांना Fitch च्या शिक्षण-विषयक ग्रंथाच्या आधारें इकडील शिक्षकांना उपयुक्त अशा प्रकारची लेख-माला पुणें येथील 'मराठा' पत्रांत त्यांनीं प्रसिद्ध केली. त्यामुळें लोकमान्य टिळक व नरसिंह चिंतामण केळकर यांच्याशीं त्यांचा संबंध येऊन विशेष परिचयहि झाला. अखेरी अखेरीस ते सोलापूर व ठाणें येथील सरकारी हायस्कुलांचे मुख्याध्यापक होते. शिस्त व शिक्षणपद्धति यांबद्दल त्यांनीं चांगलाच लौकिक संपादला होता. १९१६ अखेर ते सेवानिवृत्त झाले. जुन्या पिढींतील नियमीतपणें स्वतःची रोजनिशी लिहिणाऱ्या, फार थोड्या लेखकांपैकीं ते एक होते. १८९१ पासून १९२० पर्यंत त्यांनीं अखंडितपणें रोजनिशी लिहिलेली आढळते. 'साधी रहाणी व उच्च विचारसरणी' या तत्त्वाचे ते उपासक होते. अध्ययन, अध्यापन व लेखन यांतच त्यानीं आपलें सारें आयुष्य वेंचलें. 'मिल्ल' व 'स्पेन्सर' यांच्या ग्रंथांचे सूक्ष्म अभ्यासक व उच्च दर्जाचे अनुवादक असूनहि ते अखेर-पर्यंत आस्तिक व आध्यात्मवादी होते. गीता हा त्यांचा प्रिय ग्रंथ होता. रोज नियमितपणें एक अध्यायाचें ते पारायण करीत. आचारधर्माचें पालन करण्याकडे त्यांचा कटाक्ष असे. सेवानिवृत्त झाल्यावर चार वर्षेंच त्यानीं पेन्शनचा उपभोग घेतला. १९२० च्या सप्टेंबर महिन्यांत ठाणें येथें ते दिवंगत झाले.

**वा ङ्म य :**

( १ ) मानवशास्त्राचीं तत्त्वें–पुस्तक १ लें; [ स्पेन्सरकृत 'सायकॉलॉजी'चे आधारें ] १९१२; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें,

( २ ) मानसशास्त्राची संघटना; १९१३; [ स्पेन्सरकृत 'सायकॉलॉजी'चे आधारें ]; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

( ३ ) मानसशास्त्राचें विशिष्ट विवरण; १९१७; [ स्पेन्सरकृत सायकॉलॉजीचे आधारें ]; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

( ४ ) आत्मनीतीचीं तत्त्वें आणि परोपकार; १८९४; [स्पेन्सरकृत 'Ethics of Individual Life and Beneficence' चे आधारें ]; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

( ५ ) आत्मनीतीचीं तत्त्वें; आ. २ री, १९२२; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

( ६ ) केवळ ज्ञानवृद्धीनें नीति सुधारेल काय? १८९३; आर्यभूषण छापखाना, पुणें.

( ७ ) अज्ञेयमीमांसा-आदितत्त्वें भाग १ ला; १८९६; [ स्पेन्सरकृत 'फर्स्ट प्रिन्सिपल्स' मधील The Unknowable च्या आधारें ]; जगद्धितेच्छु, पुणें.

( ८ ) ज्ञेयमीमांसा-पूर्वार्ध-आदितत्त्वें भाग २ रा; १८९८; [ स्पेन्सरकृत 'The Knowable' चे आधारें ]; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें,

( ९ ) उत्क्रांतिसूत्रें ( सटीक ); १८९६; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(१०) धर्म आणि शास्त्र ह्यांचा समेट; १८९१; आर्यावर्त छापखाना, धुळें.

(११) शरीरसौंदर्य; १८९४; [ स्पेन्सरच्या आधारें ]; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(१२) शास्त्र म्हणजे काय अथवा शास्त्रसूत्रें ( सटीक ); १८९५; [ स्पेन्सरच्या ग्रंथांतून निवडलेलीं ] आर्यभूषण छापखाना, पुणें.

(१३) शिक्षणसूत्रें ( सटीक ); १८८५; [ स्पेन्सरच्या ग्रंथावरून ]; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(१४) स्पेन्सरीय सूत्रमाला-पुष्प ४ व ५; १९०२; श्रीसमर्थप्रसाद छापखाना, कोल्हापूर.

(१५) उद्योगसंस्था व धंदेसंस्था; [ स्पेन्सरकृत 'Principle of Sociology' चे आधारें. ] जगद्धितेच्छु छापखाना, पुणें.

(१६) विधिसंस्था व धर्मविषयक संस्था; १९०९; [ स्पेन्सरकृत 'Principles of Sociology'चे आधारें. ]; भारतभूषण छापखाना, पुणें.

(१७) समाजशास्त्राचीं तत्त्वें. अनुभवजन्य सिद्धांत व गृहसंस्था; १९०६; [ स्पेन्सरकृत Principles of Sociology'चे आधारें. ]; भारतभूषण छापखाना; पुणें.

(१८) समाजशास्त्राचीं तत्त्वें-भाग १ ला. मूल सिद्धांत; १९०५; [ स्पेन्सरकृत 'The Data of Sociology' चे आधारें ].

(१९) राजकीय संस्था; १९०७; [ स्पेन्सरकृत 'Political Institutions चे आधारें ]; भारतभूषण छापखाना; पुणें.

(२०) स्वातंत्र्य; १८९२; [ जॉन स्टुअर्ट मिलच्या 'लिबर्टी' या ग्रंथाचे आधारें ]; आर्यभूषण छापखाना, पुणें.

(२१) राणीच्या राज्याचा इतिहास; १९०२; [ Justin Macarthy कृत 'A History of our own Times' चे आधारें. ]; जगद्धितेच्छु छापखाना; पुणें.

(२२) मेकालेसाहेबांचें चरित्र; १९०६; [ ट्रेव्हलीनकृत 'Life and Letters of Lord Macaulay' च्या आधारें ]; इंदुप्रकाश छापखाना; मुंबई.

(२३) स्पेन्सर चरित्र; [ ग्रंथमालेंत छापलेलें प्रकरण ]; समर्थप्रसाद छापखाना; कोल्हापूर.

(२४) हर्बर्ट स्पेन्सर ह्यांचें चरित्र व पत्रें. १९१५; जगद्धितेच्छु छापखाना, पुणें.

(२५) हास्य, व त्याचा शास्त्रीयदृष्टया विचार; १८९४ [ 'शास्त्ररहस्य' या पुस्तकांतील ३८ पृष्ठांचा निबंध ]; प्रकाशक, बळवंत गणेश दाभोळकर, पुणें.

**फडके, भास्कर विष्णु** [ १८७८—१९१८ ] स्वामी रामतीर्थांच्या समग्र ग्रंथांचे व स्वामी विवेकानन्द चरित्राचे भाषांतरकार. यांचा जन्म रत्नागिरी

जिल्ह्यांतील देवगड तालुक्यापैकीं वाडें या गांवीं झाला. यांचे वडील दशग्रंथी भिक्षुक होते. ते लहानपणींच निवर्तल्यामुळें भास्कररावांस स्वावलंबी बनून आपलें शिक्षण घ्यावें लागलें. पुणें येथील नुतन मराठी विद्यालयांतून मॅट्रिक होऊन ते १९०४ सालीं जयपूर येथील कॉलेजांत अभ्यास करून अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे बी. ए. झाले. भास्कररावजींना विद्यार्थीदशेंतच लेखनाचा नाद लागला होता. जयपूर येथें कॉलेजांत असतां मराठी वृत्तपत्रांतून व मासिकांतून ते अनेक विषयांवर लिहूं लागले होते. बी. ए. झाल्यावर त्यानीं लेखनाचाच व्यवसाय चालू ठेविला. कांहीं दिवस ते 'काळ' वर्तमानपत्राचे दुय्यम संपादक व मुंबई येथील 'सयाजीविजय' पत्राचे संपादक होते. पुढें ते मुंबईस निघणाऱ्या 'विहारी' या राष्ट्रीय पक्षाच्या पत्राचे संपादक झाले. १९०७ मध्यें त्यांजवर राजद्रोहाचा खटला भरला जावून दोन वर्षांची शिक्षा झाल्यामुळें 'विहारी' पत्र बंद पडलें. तुरुंगांतून सुटून आल्यावर प्रो. नी. बा. रानडे यांनीं तयार करावयास घेतलेल्या 'ट्वेंटिएथ सेंचुरी इंग्लिश–मराठी डिक्शनरी'चे कामांत ते सहाय्यक बनले. या कामांतून कुटुंबाचा चरितार्थ चालेल एवढा पैका मिळणें शक्य नसल्यामुळें, त्यानीं **'जेव्हां सूर्योदय होईल'** व **दिशाभूल'** या दोन कादंबऱ्या लिहिल्या व स्वामी रामतीर्थ यांच्या समग्र ग्रंथांचें मराठींत भाषांतर करण्याचें काम हातीं घेतलें. हें भाषांतर त्यांनीं बारा भागांत छापून पूर्ण केलें. रामतीर्थांच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार महाराष्ट्रांत फार मोठ्या प्रमाणांत होण्यास भास्कररावजींची सुंदर भाषाशैलीच विशेष कारण आहे. रामतीर्थांच्या ग्रंथांचें भाषांतर पूर्ण झाल्यावर स्वामी विवेकानंदांच्या इंग्रजी चरित्राचें मराठींत भाषांतर करण्याचें काम त्यांनीं सुरू केलें पण तें पूर्ण होण्याचे आधींच ते निवर्तले.

**वा ङ्‌म य :**

(१) स्वामी रामतीर्थ यांचे समग्र ग्रंथ, भा. १ ते १२; १९१३ ते १९१६ या कालांत फडके यांनीं स्वतःच प्रसिद्ध केले. या ग्रंथांची द्वितीयावृत्ति १९२५ ते १९३६ या कालांत गणेश महादेव वीरकर यांनी सहा खंडांत प्रसिद्ध केली.

( २ ) श्रीमत् परमहंस स्वामी विवेकानंद यांचें चरित्र; भाग १ ते ४, १९१७ सालीं फडके यांनीं स्वतःच प्रसिद्ध केले.
( ३ ) जेव्हां सूर्योदय होईल; सामाजिक कादंबरी; १९११; १९१४
( ४ ) दिशाभूल; १९१२; [ स्त्रीशिक्षणविषयक सामाजिक कादंबरी. ]

**फडके, सीताराम महादेव** [ मृत्यू २०. १. १९३० ] वेदान्तविषयक ग्रंथांचे लेखक. सुप्रसिद्ध कादंबरीकार प्रो. नारायण सीताराम फडके यांचे हे वडील. अत्यंत गरीब स्थितींतून स्वावलंबनानें मार्ग काढीत यांनीं विद्यार्जन केलें. 'बायॉलॉजी' हा विषय घेऊन डेक्कन कॉलेजांतून हे बी. ए. झाले. रेव्हिन्यु खात्यांत यांची नोकरी झाली. मामलेदाराच्या अधिकारापर्यंत ते पोंचले होते. अत्यंत सदाचारी, पट्टीचे वेदान्ती, हौशी कीर्तनकार, योगाभ्यासी आणि पराकाष्ठेचे असे ते ईश्वरभक्त होते. स्वभाव अतिशय करडा. यांचा विद्याभ्यासंग आदर वाटावा इतका जबर व उत्कट होता. हिंदुत्वाचे ते जाज्वल्य अभिमानी होते. 'वेदान्त–निदर्शन' हा त्यांचा ग्रंथ त्यांच्या या जबर व्यासंगाची व त्यांच्या हिंदुत्वाच्या डोळस अभिमानाची उत्तम साक्ष पटवितो.

**वाङ्मय :**

( १ ) वेदान्त-निदर्शनः १९१३, १९२५
( २ ) सगुणोपासना अथवा मूर्तिपूजा, १९१९; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.
( ३ ) श्रीमत्परमहंस जगद्गुरु शंकराचार्यकृत उपदेशसहस्त्री, मराठी भाषांतर, १९१९; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.
( ४ ) सगुणा, सामाजिक कादंबरी, १९१३; हरिहर छापखाना, पुणें.

**फडणीस, नारायण नरसिंह** [ १८६१–१९३७ ] 'काव्यरत्नावली'-कार. केवळ काव्यप्रसिद्धीलाच वाहिलेलें असें 'काव्यरत्नावली' नांवाचें मासिक यांनीं सतत ५० वर्षें चालविलें. केशवसुत, टिळक, विनायक, दत्त, चंद्रशेखर, लोंढे, मोगरे, गडकरी, बालकवि ठोमरे, बी, माधवजूलियन, यशवंत, गिरीश यांसारख्या अव्वल दर्जाच्या कवींच्या प्रारंभींच्या कविता या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. नवनवीन कवींना उत्तेजन देऊन त्यांची कविता समाजापुढें येण्याची संधी त्यांना मिळवून देण्याचें कार्य या मासिकानें,

पक्षातीत राहून केलें. या मासिकानें जवळ जवळ दीड-दोन लक्ष कविता प्रसिद्ध केली. अर्वाचीन मराठी कवितानिर्मितीच्या बाबतींत या मासिकानें केलेलें कार्य मराठी काव्यवाङ्मयाच्या इतिहासांत अविस्मरणीय असें आहे.

फडणीस हे जळगांव येथील राहणारे. त्यांचा मुख्य व्यवसाय मुद्रणाचा. 'बाबजी प्रिंटिंग प्रेस' नांवाचा छापखाना ते चालवीत. १८८७ सालीं कोणी एक मुसलमान गृहस्थ त्यांचेकडे येऊन म्हणाला, "मला एक उर्दू कवितांचें मासिक काढावयाचें आहे; तर त्याला खर्च काय येईल." फडणीस यांना त्याची ही कल्पना नवीनच वाटली व त्यांनीं त्यास विचारलें, "मासिका-करितां इतक्या कविता तुम्ही दरमहा कोठून आणणार" तो म्हणाला, "दिल्ली, आग्रा, लखनौ इकडे उर्दू कवि बरेच आहेत, त्यांना विनंतीपत्रें पाठवून कविता मिळवितां येतील." त्याच्या या उत्तरानें फडणीस यांच्या डोक्यांत अर्वाचीन मराठी कवितांचें मासिक काढण्याची कल्पना उद्भूत झाली व ती त्यांनीं त्या वेळच्या काव्यभक्तांस कळविली. तेव्हां वामन दाजी ओक, गोविंद वासुदेव कानिटकर, गणेश जनार्दन आगाशे, रे. नारायण वामन टिळक इत्यादिक तत्कालीन साहित्यिकांनीं तीस प्रोत्साहन दिलें. आणि त्याच वर्षी (जून १८८७) 'काव्यरत्नावली'चा जन्म झाला.

फडणीस हे एक उत्तम रसिक व मार्मिक काव्यपरीक्षक होते. त्यांनीं स्वतः संस्कृत सुभाषितांचें सुंदर भाषांतर केलें आहे; त्याचप्रमाणें मोरोपंतकृत आर्या-भारतांतील उत्तमोत्तम स्थलें 'महाभारतभाव' या नांवानें प्रसिद्ध केलीं आहेत. भूषण कवीच्या 'शिवराजभूषण'चें व कालिदासाच्या 'कुंमारसंभव' काव्यां-तील कांहीं सर्गांचें त्यांनीं भाषांतर केलें होतें.

**वाङ्मयः**

(१) सुभाषित मराठी—भाग १ ला, [मराठी श्लोक व गद्य विवरण], १९२६; बाबजी प्रिंटिंग प्रेस, जळगांव.

(२) गद्यपद्यात्मक कथासंदर्भासह मोरोपंत कविकृत आर्याबद्ध महाभारत —भाग १ ला (पर्वें ५]; १९३३; बाबजी प्रिंटिंग प्रेस, जळगांव.

**फाटक, नारायण गोपाळ** [ १८५३–१८९८ ] नाट्यमर्मज्ञ व नाट्य-टीकाकार. यांचें प्राथमिक व माध्यमिक शिक्षण धारवाड व कोल्हापूर येथें झालें. यांचे वडील कोल्हापुरास सदर अमीन होते. कै. प्रो. वासुदेव बाळकृष्ण केळकर हे यांचे आतेबंधु. प्रो. केळकर यांची आई–वडील लहानपणींच वारल्यामुळें त्यांचें लालनपालन व शिक्षण फाटक यांचेच घरीं झालें. प्रो. केळकर व फाटक या दोघांचें शिक्षण एकत्रच झालें. मॅट्रिक झाल्यावर ते मुंबईस एल्फिन्स्टन कॉलेजांत आले व १८८० त ते बी. ए. झाले. १८८३ सालीं ते एल्. एल्. बी. झाले. कांहीं दिवस ते कोल्हापुरास मुन्सफ होते. परंतु त्या-वेळचे पोलिटिकल एजंट लिवार्नर यांची कारकीर्द त्यांना न मानवल्यामुळें त्यांनीं संस्थानी नोकरी सोडून खालसातींत नोकरी धरली. मृत्युसमयीं ते इस्लामपूर येथें मुन्सफचे जागेवर होते. संस्कृत, इंग्रजी नाटकांचें यांचें मार्मिक परिशीलन असल्यामुळें नाटकांच्या अभ्यासकांस त्यांजकडून उत्कृष्ट मार्गदर्शन होई. कॉलेजांत होणाऱ्या संस्कृत नाटकांचें ते अनेकदां दिग्दर्शन करीत. नटांना नाटकांतील विविध भूमिका नीट समजून देण्यांत त्यांचा हातखंडा असे. होत-करू नाटककारांनाहि त्यांचें मार्गदर्शन हितावह वाटे. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर व प्रि. गोपाळ गणेश आगरकर यांनीं या त्यांच्या साहाय्याबद्दल आपापल्या नाटकांच्या प्रस्तावनांत आभार मानले आहेत. शंकर मोरो रानडे यांच्या 'नाट्यकथार्णव' मासिकाचें पुनरुज्जीवन करण्याचा यांचा विचार होता. पण त्यांचा अकालीं अंत झाल्यामुळें हा विचार प्रत्यक्षावस्थेंत आला नाहीं.

**फाळके, शिवराम गोविंद** [ १८६०–१९२१ ] कथालेखक. नाशिक जिल्ह्यांतील त्र्यंबकेश्वर क्षेत्रीं शास्त्री घराण्यांत यांचा जन्म झाला. प्राथमिक शिक्षण मुंबईस जगन्नाथ शंकरशेटच्या शाळेंत व दुय्यम शिक्षण एल्फिन्स्टन इन्स्टिटयुटमध्यें झालें. पुढें फ्री जनरल असेम्ब्लीज् इन्स्टिटयूटमध्यें बी. ए. पर्यंत यांनीं अभ्यास केला. बडोदें संस्थानांत रमेशचंद्र दत्तांचे खास मदतनीस म्हणून यांनीं बरींच वर्षें काम केलें. कांहीं वर्षें ते जव्हार संस्थानचे कारभारी होते. बंगाली भाषेचा यांनीं चांगला अभ्यास केला होता.

**वाङ्मय :**

( १ ) दुर्गेशनंदिनी अथवा किल्लेदाराची मुलगी; [ बंकिमचंद्र चट्टोपाध्याय

यांच्या कादंबरीचा अनुवाद; ] १८९८, पूर्णचंद्रोदय प्रेस, बडोदें; १९१०, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

( २ ) श्री शिवछत्रपति; ऐ० कादंबरी; [ बंगाली कादंबरीवरून ]; १८९३; बडोदावत्सल प्रेस, बडोदें.

( ३ ) सुभद्रार्जुन, [ महाभारतावरून गद्यकथा ]; १९१५; फाळके आर्ट प्रेस, मुंबई.

( ४ ) इंग्लंडांतील राज्यकारभारव्यवस्थेच्या इतिहासाचीं मूलतत्त्वें, [ मॉंटेगच्या 'Elements of English Constitutional History चे आधारें ]; १९१४; देशी विद्याखातें, सयाजी छापखाना, बडोदें.

( ५ ) घरांत खेळण्याचे खेळ; १९००; पूर्णचंद्रोदय प्रेस, बडोदें.

**फुले, ज्योतीराव गोविंदराव** [ १८२७–१८९० ] 'सत्यशोधक समाजा'चा संस्थापक; हिंदुस्थानांतील सामाजिक गुलामगिरीच्या विरुद्ध बंड पुकारणारा बुद्धिप्रामाण्यवादी सुधारक. पुणें येथें यांचा जन्म झाला. वडील बागकाम व फुलमाळीपण करीत. प्राथमिक शिक्षण मिळाल्यावर, कांहीं वर्षे त्यांना वडिलांचाच धंदा पत्करावा लागला. पण पुढें यांच्या वडिलांच्या बागेशेजारीं राहणाऱ्या गफ्फारबेग मुनशी या गृहस्थाच्या उपदेशावरून त्यांनीं १८४२ चे सुमारास सरकारी शाळेंत प्रवेश मिळवून इंग्रजीचा अभ्यास सुरू केला. पांच-सहा वर्षांत येथील अभ्यासक्रम पुरा केल्यावर, स्वजनांच्या–दलित मागासलेल्या वर्गाच्या– सेवेस स्वतःस वाहून घेण्याचा त्यांनीं निश्चय केला. आपल्या देशाची खरी सुधारणा होणें असेल तर ती स्त्रियांस व अज्ञानी शूद्रादि अतिशूद्रांसहित खालच्या प्रतीच्या समाजास शिक्षण मिळाल्यावांचून होणार नाहीं असा त्यांचा पक्का मानस झाला. त्याप्रमाणेंच परमेश्वर सर्वांचा पिता व त्याचीं आम्हीं लेंकरें, तीं सर्व समान असून सर्वांस सारखे हक्क असले पाहिजेत असा त्यांच्या मनाचा निश्चय झाला व त्यांनीं दुसरीकडे कोठें उद्योगधंद्यास न लागतां कांहीं सद्गृहस्थांच्या मदतीनें १८५१ सालीं पुण्यांत मुलींची शाळा स्थापन केली. जोतीबांचा हा प्रयत्न म्हणजे महा-

राष्ट्रांतील स्त्रीशिक्षणाची मुहूर्तमेढच होय. मुलींच्या शाळेनंतर १८५२ सालीं त्यांनीं महार, मांग वगैरे अस्पृश्य जातींच्या मुलांसाठीं १८५२ च्या मे महिन्यांत पुण्यांतील वेताळपेठेंत एक शाळा स्थापन केली. विधवा-विवाह, बालहत्याप्रतिबंध वगैरे चळवळींच्या आद्यपुरस्कर्त्यांपैकीं ते होते. त्यांनी त्यागपूर्वक केलेली ही समाजसेवा महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासांत कायमची नमूद केलेली राहील यांत संशय नाहीं. पण, ज्योतीराव फुले यांची ओळख आज महाराष्ट्राला आहे ती 'सत्यशोधक समाजाचा संस्थापक' म्हणून. हा 'समाज' १८७३ सालीं "ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये इत्यादिक लोकांच्या दास्यत्वापासून शूद्र लोकांना मुक्त करण्याकरितां व आपल्या मतलबी ग्रंथांच्या आधारें आज हजारों वर्षें ते शूद्र लोकांस नीच मानून गफलतीनें लुटीत आले आहेत, यास्तव सदुपदेश व विद्या यांद्वारें त्यांस त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरितां म्हणजे धर्म व व्यवहारासंबंधीं ब्राह्मणांचे बनावट व कार्यसाधक ग्रंथांपासून त्यांस मुक्त करण्याकरितां" स्थापन करण्यांत आला. 'समाजा'च्या या हेतूंच्या सिध्यर्थ ज्योतीरावांनीं लेखन केलें. या साऱ्या लेखनांत दलितांच्या उद्धाराविषयींची त्यांच्या अंतरींची असीम तळमळ आढळते.

* "हिंदु समाजांतील बहुजनसमाजांत आत्मप्रत्यय व आत्मावलोकन उत्पन्न करणारा पहिला माणूस म्हणजे ज्योतिबा फुले हा होय. ज्यांना स्वतःची गुलामगिरी समजत नाहीं ते गुलामगिरींतून कधींहि मुक्त होत नसतात. शतकानुशतकें अज्ञानानें, दारिद्र्यानें व हीन संस्कृतीनें ग्रासलेल्या हिंदुसमाजांतील जनतेला आत्मपरीक्षण करण्याचा पहिला आदेश ज्योतिबामुळें मिळाला."

"पूर्वीच्या राज्यांत एक प्रकारची बेबंदशाही वाढीस लागलेली होती व तिचा अतिरेक होऊं लागला होता. त्याचें ताजें स्मरण ज्योतिबांना होतें. पेंढारी, लुटारू लोक व गांवगुंड यांचें प्रस्थ वाढल्यामुळें प्रजेंतील उमेद नाहींशी झाली होती.

---

* ज्योति–निबंध, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी. या निबंधांत शास्त्रीबोवांनीं ज्योतिबांची विचारसरणी व त्यांची चळवळ हीं सहानुभवी अंतःकरणानें समजून घेऊन, त्याची शुद्ध विवेकवादाच्या भूमिकेवरून मार्मिक विचिकित्सा केली आहे. त्यांतील कांहीं निवडक भाग वर उद्धृत केला आहे.

सरकारी अधिकारी वर्ग लुटारू व पेंढारी यांचेप्रमाणें हम करे सो कायदा अशा रीतीनें वागत असल्यामुळें प्रजेंत कष्ट करून धनार्जन करण्याचा उत्साह राहिला नव्हता. मालमत्ता असुरक्षित होती म्हणून मेहनत करून मिळविलेलें फळ जर भोगण्याची शाश्वति नाहीं तर मेहनतच कां करावी अशी वृत्ति उत्पन्न झाली होती. म्हणून नवीन इंग्रजी राजवटीचें स्वागत नकळतपणें प्रजा करूं लागली. त्यांत ज्योतिबा फुलेसारखे सुधारक विचारपूर्वक भूतकाळांतील इतिहासाचा अर्थ करूं लागले आणि इंग्रजी राज्यांतहि भूतकाळांतील समाज-रचना टिकून राहत आहे हें पाहिल्यामुळें ते मूलगामी पद्धतीचा विचार करूं लागले. सुधारलेल्या इंग्रजी राज्याच्या आगमनानें त्यांना भारतीय इतिहासाचा आणि जीवनाचा नवा अर्थ कळला आणि त्या राज्याचा परकीय म्हणून विरोध करण्याच्या ऐवजीं सुस्वागतम् म्हणून त्यांनीं स्वागतच केलें. त्यांना इंग्रजी राज्यानें आपल्याबरोबर आणलेल्या पाश्चिमात्य संस्कृतींतून जीवनाचा नवीन संदेश मिळाला. तो म्हणजे मानवी स्वातंत्र्याचा. आजपर्यंत हिंदुस्थानांतील जनता सामाजिक गुलामगिरींत बद्ध असल्यामुळें तिचा भौतिक व आध्यात्मिक अधःपात हजारों वर्षे होत आला असून ती जनता त्या गुलामगिरीची जाणीव होऊन तिचा नाश करण्यास उद्युक्त व्हावी, अशी उत्कट इच्छा ज्योतिबा फुले यांचे ठिकाणीं उत्पन्न झाली."

"ज्योतिबा फुले व तत्कालीन इतर सुधारक अंतर्मुख बनून हिंदी समाजाच्या सामाजिक दुर्गतीचें मनन करूं लागले. ज्योतिबा फुले यांनीं पहिल्यांदा जो आढावा घेतला त्यांत त्यांना हिंदु समाजाच्या अधोगतीचें मूळ हिंदु समाजांत हजारों वर्षे खोल रुजलेल्या सामाजिक गुलामगिरींत दिसलें. ह्या गुलामगिरीच्या मूळ कारणाचा शोध त्यांनीं केला व त्यांत त्यांना असें आढळलें कीं, ब्राह्मणांनीं आपल्या नेतृत्वाखालीं निर्माण केलेला धर्मच यास जबाबदार आहे. म्हणून त्यांनीं पहिलें जें पुस्तक लिहिलें त्यास 'सुधारलेल्या इंग्रजी राज्यांत ब्राह्मणी धर्माच्या आडपडद्यांत गुलामगिरी' असें नामाभिदान केलें. त्यांना विचारांची स्फूर्ति पाश्चात्य लोकसत्तावादी तत्त्वज्ञानानें दिली. म्हणून त्यांनीं हें पुस्तक निग्रोंना दास्यमुक्त करण्याची चळवळ करणाऱ्या अमेरिकन नागरिकांना अर्पण केलें."

" फुले यांनीं 'गुलामगिरी' या पुस्तकांत पहिल्यांदा प्रामुख्यानें हिंदु-समाजावर हजारों वर्षे असलेल्या ब्राह्मणी विचारांचें, संस्थांचें आणि ब्राह्मण-जातीचें वर्चस्व कसें स्थापन झालें याचा शोध लावण्याचा प्रयत्न केला आहे. कारण त्यांच्या मतें हिंदु मनुष्याच्या जीवनावरील सामाजिक बंधनें निर्माण करणारें अज्ञान वा अंधश्रद्धा ही ब्राह्मणनिर्मित आहे. भ्रामक, थोतांडी, अतिशयोक्तिपूर्ण, थापेबाज, अद्‌भूत, चमत्कारपूर्ण कल्पनांचें मायाजाळ उत्पन्न करून ब्राह्मणांनीं हिंदु मनुष्यास जखडून टाकलें आहे. या ब्राह्मण वर्गानें त्या समाजावर केव्हां व कसें आक्रमण केलें व आधिपत्य स्थापन केलें याचा इतिहास शोधणें हें समाजसुधारणेचें महत्त्वाचें अंग आहे असें त्यांचें मत होतें. हा इतिहास प्रत्यक्ष अधिकृत स्वरूपांत उपलब्ध होत नाहीं, परंतु श्रुतिस्मृति पुराणांतील कथांवरून त्याचें अनुमान कांहीं प्रमाणांत करतां येईल म्हणून त्यांनीं त्या कथांचा ऐतिहासिक अर्थ लावण्याचा प्रयत्न केला. मुख्यतः दशावतारांपैकीं परशुराम अवतारापर्यंतच्या कथांचा अभिप्राय ब्राह्मणी आक्रमण व विजय याचाच इतिहास असा त्यांनीं काढला."

" ज्योतिबा यांची धर्मग्रंथावरील टीका कठोर व जहरी आहे. परंतु त्यांनीं इतिहाससंशोधन करीत असतांना संस्कृत शब्दाची व मराठी शब्दांची व्युत्पत्ति लावण्याचा प्रयत्न केला आहे; त्यांत ते सपशेल फसले आहेत. त्यांनीं त्या विषयांत पडण्याची कांहीं जरूरी नव्हती. कारण शब्दव्युत्पत्ति शोधणें हें भाषा-शास्त्रज्ञाचें काम आहे. सामाजिक सुधारकानें त्या विषयाचा आपल्या कामास फायदा जरूर करून घ्यावा परंतु तो विषय शक्य तितका टाळावा. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं याच छिद्राचा फायदा घेऊन फुले यांच्यावर टीकास्त्र सोडलें आहे. चिपळूणकर त्या काळचे प्रतिगामी विचाराचे अध्वर्यु होत. खोटा देशाभिमान, अंध राष्ट्रभक्ति आपल्या देशांत फार माजली असून विवेकबुद्धीनें परंपरेचीं बंधनें तोडण्याचें सामर्थ्यच लोकांचे ठिकाणीं दिसत नाहीं. या प्रवृत्तीचे महाराष्ट्रांतील पहिले जनक म्हणून चिपळूणकरांचें नांव चिरस्थायी झालें आहे. चिपळुणकरांना जोतिराव फुल्यांच्या लेखनांतील मूळ महत्त्वाचीं विधानें मुळींच खोडतां आलीं नाहींत. एवढेंच नव्हे तर ते त्या मुद्यांचा परामर्षसुद्धां घेण्यास धजले नाहींत."

"फुले यांनीं नव्या विधायक तत्त्वांची मांडणी 'सार्वजनिक सत्यधर्म' ह्या पुस्तकांत केली आहे. या पुस्तकाच्या द्वारें फुले यांनीं सत्यशोधक समाजास जीवनाचें नवें तत्त्वज्ञान दिलें आहे. धर्मभेद व राष्ट्रभेद यांच्या विरुद्ध महान् सत्य पहिल्यांदा फुले ह्यांनीं असें सांगितलें आहे कीं सगळी मनुष्य जाति ही एक आहे आणि सगळ्या मनुष्यजातीचें स्वातंत्र्य, समता व बंधुत्व यांच्या पायावर एक कुटुंब निर्माण करणें हेंच मनुष्यत्वाचें ध्येय होय. सर्व मानव, स्त्री किंवा पुरुष यांचे हक्क सारखे आहेत. मानव किंवा कोणताहि मानव-समुदाय यास दुसऱ्या मानवावर व मानवसमुदायावर स्वामित्व गाजविण्याचा किंवा जबरदस्तीचा अधिकार नाहीं. परमेश्वरानें सर्व मानवांना जन्मतःच धार्मिक व राजकीय स्वातंत्र्य दिलें आहे. त्याच्यावर आक्रमण करणारा सत्याचा शत्रु होय. राजकीय व धार्मिक मतांमुळें कोणतीहि व्यक्ति उच्च किंवा नीच मानून तिचा छळ करणें म्हणजे सत्याचा द्रोह करणें होय. प्रत्येकास आपल्या धार्मिक, राजकीय इत्यादि संबंधींच्या मतांचा प्रचार करण्यास संपूर्ण अधिकार आहे. सर्वांना ऐहिक जीवनाचा, विश्वांतील वस्तूंचा यथेष्ट उपभोग घेण्याचा सारखाच अधिकार आहे. शेतकी, कलाकौशल्य, मजुरी इत्यादि कामें मनुष्यास हीनपणा आणीत नसून त्यांच्यायोगें मनुष्याची थोरवीच सिद्ध होते. सृष्टीच्या कार्यकारणभावाचा अर्थ समजून घेऊन त्या सृष्टीचा किंवा निसर्गशक्तींचा मनुष्याच्या गरजा भागविण्याकरितां उपयोग करणें हा मनुष्याचा मूलभूत अधिकार व कर्तव्य होय. ईश्वरानें निर्माण केलेल्या सृष्टींत प्रयत्न केल्यास, सर्व मनुष्यांस त्याचा स्वर्ग बनवितां येईल. या विश्वांत जगण्याकरितां आणि उपभोगाकरितां वस्तु उत्पन्न करणें किंवा मिळविणें हें मनुष्याचें पहिलें कर्तव्य आहे. आणि त्याकरितां परस्परांना साहाय्य करणें हा मनुष्याचा श्रेष्ठ धर्म आहे. एवढेंच नव्हे तर हीच ईश्वराची पूजा आहे. भजन, नामस्मरण, जप या गोष्टींची ईश्वराला गरज नाहीं. कारण तो सर्व विश्वाचा स्वामी आहे. त्याला माणसाच्या स्तुतीची, पूजेची, भक्तीची मुळींच गरज नाहीं. बायबलमध्यें येशू ख्रिस्तानें माणसानें माणसाशीं कसें वागावें यासंबंधीं जो पर्वतावर उपदेश केला आहे तो जर माणसानें अंमलांत आणला तर मनुष्यजातीचें जीवन पूर्ण सफल झालें असें समजावें."

" फुले यांनीं वर सांगितलेलें सत्य म्हणजे मनुष्याच्या हजारों वर्षांच्या परिश्रमानें संपादन केलेल्या संस्कृतीचें आणि ज्ञानाचें सार आहे, असेंच म्हटलें पाहिजे. फुले यांनीं सत्यज्ञानाचें साधन किंवा प्रमाण कोणतें याच्या संबंधीं चर्चा केली आहे. शुद्ध सत्य जर धर्मग्रंथांमध्यें नाहीं; ऋषि, गुरू, अवतार, व ईश्वरप्रेषित यांच्यामध्यें सांपडत नाहीं तर तें सांपडावें कोठें ? फुले म्हणतात तें मनुष्याच्या विवेकबुद्धींत सांपडतें. निसर्गांतील सत्य व नैतिक सत्य हीं दोन्हीं प्राप्त करून देणारी बुद्धि मनुष्यांत स्वाभाविकपणें वसत आहे. सृष्टिकर्त्यानेंच मनुष्यजातीला ती नैसर्गिक देणगी दिली आहे. ईश्वरानें धर्मग्रंथ दिले नाहींत, तो अवतार घेत नाहीं, ऋषिमुनी, साधुसंतांना दर्शन देऊन उपदेश करीत नाहीं किंवा कोणत्याहि एका भाग्यवान् तपस्वी व्यक्तीच्या हृदयांत तो स्फूर्ति उत्पन्न करीत नाहीं. त्यानें मनुष्याला एकदांच एक ज्ञानाचा दिव्य ठेवा दिला आहे, तो म्हणजे बुद्धि होय. "

" फुले, हे ईश्वराची कल्पना सोडल्यास, इतर सर्व बाबतींत पूर्ण बुद्धिवादी दिसतात. त्यांना कोणतीहि धर्मसंस्था मान्य नाहीं. विवेकबुद्धि ( Conscience ) आणि बुद्धि ( Reason ) यांचें अत्यंत पृथक् अस्तित्व ते मान्य करीत नाहींत. पूजा, भक्ति, प्रार्थना, नामस्मरण, जप इत्यादि गोष्टींची त्यांच्या ईश्वराला गरज नाहीं. एवढेंच नव्हे तर मनुष्यांनीं या गोष्टी करण्याची आवश्यकता नाहीं, त्या निष्फल आहेत, असें त्यांचें मत आहे. परलोक, पुनर्जन्म, स्वर्ग, मोक्ष, कर्मविपाक इत्यादि गोष्टी त्यांना मान्य नाहींत. याचा अर्थ असा दिसतो कीं, कोणत्याहि प्रकारची धर्मसंस्था उत्पन्न होईल अशा तऱ्हेचा ईश्वर त्यांना मान्य नाहीं. ईश्वराचा साक्षात्कार होणें अशक्य आहे. त्याचप्रमाणें तो ईश्वर कोणास तारीत नाहीं व मारीतहि नाहीं. तो कोणावर अनुग्रह करीत नाहीं किंवा कोणावर कोपतहि नाहीं. त्यानें विश्व निर्माण केलें, विश्वाचे नियम केले आणि ते नियम जाणूं शकेल असा मानव त्यानें निर्माण केला. मानवाला बुद्धि दिली व त्या बुद्धीचा उपयोग करण्याचें सामर्थ्य दिलें. त्या माणसानें स्वर्गमोक्षाकरितां किंवा ईश्वरदर्शनाकरितां प्रयत्न करूं नये; कारण त्या सगळ्या गोष्टी अशक्य आहेत. मनुष्यानें या जगांतील जीवनच उत्तम तऱ्हेनें भोगतां येईल असा प्रयत्न करावा. ईश्वराची कल्पना फुले यांना त्यांच्या स्वतःच्या

तार्किक व तात्त्विक समाधानाकरितां आवश्यक वाटली असें दिसतें. ज्या ईश्वरांतून मंदिरें आणि पुरोहितवर्ग उत्पन्न होईल असा ईश्वर त्यांनीं अमान्य केला. फुले हे माळी असल्यामुळें त्यांना निसर्ग सुपिक बागायत जमिनीसारखा वाटला. ज्या जमिनीच्या पृष्ठभागावर पाणी वहात नसून आंतून खोलांत पाण्याचे प्रवाह आहेत अशी ही जमीन आहे. मनुष्यानें श्रम केल्यास तो बाग–ती सृष्टि पुष्पित व फलित होईल. त्याचा सुंदर बहरलेला बाग बनेल–नव्हे त्याचें नंदनवन बनेल. मात्र त्याकरितां ज्ञान आणि प्रयत्न यांची जोड पाहिजे. त्यावांचून निसर्ग म्हणजे मनुष्याचें मृत्युस्थान आहे. तहान, भूक व रोग हे त्याचे दूत या निसर्गांत माणसाचा बळी घेण्यास टपले आहेत. बुद्धि व प्रयत्न हेच माणसाला त्याच्यापासून सोडवितात.”

“फुले यांचे वरील विचार उदात्त व शाश्वत मानवी मूल्यांनीं भरलेले आहेत यांत शंका नाहीं. त्यांनीं हे विचार मांडीत असतां जी भाषा वापरली त्या भाषेंत जळजळीत भावनांचा आवेश भरला आहे. वर्तमानकाळाच्या मर्यादा उल्लंघून अत्यंत पुरातन भूतकाळांत आणि दूरच्या भविष्यकाळांत अवलोकन करण्याची ताकद असलेली प्रतिभा त्यांच्यांत आहे. अन्यायाविरुद्ध व जुलुमाविरुद्ध भयंकर चिडून जाऊन त्यांची ब्राह्मण जातीवर व ब्राह्मणी हिंदुधर्मावर सूड उगविण्याची महत्त्वाकांक्षा धगधगलेली त्यांत दिसते. परंतु या कार्याकरितां आवश्यक असलेल्या विविध विद्याविषयक पांडित्याची त्यांची सामग्री फारच तुटपुंजी आहे. ह्या दोषास मात्र स्वतः ते जबाबदार नाहींत. कारण त्या काळीं समाजाच्या ज्या थरांत ते उत्पन्न झाले व वाढले त्यांत शिक्षणप्रवृत्तीचा संपूर्ण अभावच होता. त्यांच्या लेखनांत अश्लील शिव्याशाप आहेत आणि भाषेंत बोजडपणा व ओबडधोबडपणा आहे. त्यामुळें त्यांचें लेखन सुशिक्षित वर्गांत प्रतिष्ठा पावूं शकलें नाहीं. कै. अण्णासाहेब शिंदे हे त्यांच्या लेखनाबद्दल असें म्हणत कीं,—‘हें रानफळ आहे.’ तात्पर्य तें रसाळ नाहीं परंतु त्यांत औषधी गुणधर्म फार आहेत. फुले यांच्या लेखनांतील हिंदूंच्या प्राचीन सामाजिक इतिहाससंबंधीं महत्त्वाच्या सूचक कल्पनांच्या आधारें शिंदे, भास्कर विठ्ठल जाधव आणि डॉ. आंबेडकर यांनीं समाजशास्त्रीय इतिहाससंशोधनपर ग्रंथ व निबंध लिहिले

आहेत. यावरून नैसर्गिक बुद्धिमत्ता विद्वत्तेच्या अभावींसुद्धां किती लांब पल्ला गांठूं शकते याची कल्पना करतां येईल."

**वा ङ्म य :**

( १ ) पवाडा छत्रपति शिवाजी राजे भोसले यांचा, १८६९

( २ ) ब्राह्मणाचें कसब, [ पवाडे व अभंग ], १८६९, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

( ३ ) गुलामगिरी; १८७३, पूनासिटी प्रेस, पुणें; १९११, विश्वबंधु छापखाना, कोल्हापूर.

( ४ ) सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक; १८९१, सुबोधप्रकाश छापखाना, मुंबई.

( ५ ) इशारा—ब्राह्मण व भिक्षुक यांच्या लबाड्यांबाबत ब्राह्मणेतरांस इशारा; १ ली आवृत्ति १८८५; चौथी आवृत्ती १९२५, प्रबोधन प्रेस, पुणें.

( ६ ) सत्सार—अंक २ रा. १८८५, जगद्धितेच्छु, पुणें.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

१ महात्मा ज्योतिराव फुले यांचें चरित्र; पंढरिनाथ सीताराम पाटील.

२ महात्मा ज्योतिराव फुले यांच्या चरित्रावर त्रोटक निबंध; दलपतसिंह चव्हाण.

३ महाराष्ट्राचा मार्टिन लूथर महात्मा जोतीराव फुले यांचें त्रोटक चरित्र; अनंत एकनाथ गवंडी.

४ ज्योतीराव फुले; ग बा. सरदार, 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी.'

५ ज्योति—निबंध; लक्ष्मणशास्त्री जोशी.

६ सत्यशोधक समाजाचा रिपोर्ट; टीकात्मक लेख; विष्णुशास्त्री चिपळोणकर, निबंधमाला.

**बंकटस्वामी** [ मृत्यू, ९ मे १९४४ ] वारकरी. हे मुळचे मोंगलाईतील असून जातीनें परदेशी होते. त्यांचें पूर्ण नांव व्यंकटसिंग निहालसिंग असें होतें. लहानपणापासून त्यांना अध्यात्माची आवड होती प्रारब्धयोगानें त्यांचा प्रसिद्ध भागवत कै. विष्णुबुवा जोग यांच्याशीं सहवास घडून आला. पुढें

त्यांनीं त्यांचें शिष्यत्व पत्करून, त्यांच्या सान्निध्यांत आपला परमार्थाचा व्यासंग वाढविला. ते कीर्तनें व प्रवचनेंहि करीत. वारकरी संप्रदायाला संघटित स्वरूप आणण्यासाठीं, विष्णुबुवांच्या पश्चात्, त्यानीं पुष्कळच झीज सोसून प्रयत्न केले. त्यांनीं संपादित केलेल्या 'ज्ञानेश्वरी'च्या आवृत्तीस वारकरी मंडळींत फार मान दिला जातो.

**बरवे, अनंत वामन** [ १८५६-१९२३ ] नाटककार व नाट्यशिक्षक. यांचा जन्म नाशिक जिल्ह्यांतील मनमाड गांवीं झाला. वडील रेल्वेखात्यांत नोकर होते. प्राथमिक शिक्षण नांदगांव येथें व मॅट्रिकपर्यंत इंग्रजी शिक्षण पुणें येथें झालें. सुमारें तीन वर्षे घोडनदी (पुणें जिल्हा) येथें यांनीं इंग्रजी शाळामास्तरची नोकरी केली आणि त्यानंतर विष्णुशास्त्री चिपळूणकर प्रभृतींनी नवीनच सुरू केलेल्या आर्यभूषण छापखान्यांत 'केसरी' पत्राच्या कचेरींत कच्चीं मुद्रितें तपासण्याचें काम पतकरलें. हें काम करीत असतां विष्णुशास्त्री, टिळक, आगरकर प्रभृतींचा सहवास त्यांना घडला. या सहवासामुळें त्यांच्या आयुष्यास निराळी दिशा मिळाली आणि त्यांचें आयुष्य हें लेखकाचें, सार्वजनिक कार्यकर्त्याचें, लोकहितार्थ झटणाऱ्याचें आयुष्य बनलें. त्यांच्या जीवनकार्यास हळूहळू सुरुवात होऊं लागली. त्यांच्या तयारीमध्ये विश्वविद्यालयीन उच्च शिक्षण व त्यामुळें मिळणाऱ्या पदव्या यांचा समावेश नव्हता. किंवा जुन्या पद्धतीनें एखाद्या शास्त्र्याच्या हाताखालीं संस्कृत विद्येचें शिक्षणहि त्यांनीं घेतलें नव्हतें. असें असूनहि जी विद्वत्ता व बहुश्रुतता त्यांनीं संपादिली होती ती खरोखर आश्चर्यकारक होय. संस्कृत वाङ्मयाचें वाचन त्यांनीं बऱ्याच विस्तारानें केलें होतें. काव्य, नाटक, पुराणें, रामायण आणि महाभारत यांचें सर्वसामान्य आलोडन त्यांनीं केलें असलें पाहिजे असें त्यांच्या ग्रंथावरूनच दिसून येतें. त्यांची भाषाशैली फार संस्कृतप्रचुर म्हणण्याजोगी नसली तरी पद्यरूपांत ती अवतीर्ण होताना अर्थवाहक असे संस्कृत शब्द सहजतेनें व विपुलतेनें तिच्यांत येतात, यावरून संस्कृत ग्रंथांचें वाचन त्यांचें चांगलेंच गाढ व नित्याचें होतें असें दिसतें.

संस्कृत वाङ्मयाइतकें जुन्या मराठी वाङ्मयाचें त्यांचें वाचन गाढ व विस्तीर्ण नसावें. आंग्ल वाङ्मयाशीं त्यांचा परिचय प्रारंभीं बेताचाच असावा. प्रारं-

भींच्या त्यांच्या लिखाणांत संस्कृताचें वातावरण सर्वत्र भरून राहिलेलें दिसतें. कथानकें, विचार, कल्पना, दृष्टांत इत्यादि सर्व अभिजात संस्कृत वाङ्मयांतून घेतलेलें आणि या सर्वांस निबंधमाला प्रभृति गद्य ग्रंथांच्या तऱ्हेवर आधुनिक वळण देऊन त्यांत चुरचुरीतपणा आणलेला, असें त्यांच्या प्रारंभींच्या लिखाणाचें स्थूल मानानें वर्णन करतां येईल.

बरवे यांनीं १८८२ सालीं 'राजहंस' नांवाचें एक मासिक कांहीं स्नेह्यांच्या सहकारितेनें काढलें. तें छापण्यासाठीं एक छोटासा छापखानाहि काढला. या मासिकाचे अंक पाहतां तत्कालीन तरुणांच्या मनांत जनसेवेची व स्वभाषेंत लेखन करण्याची प्रबळ ऊर्मि कशी उत्पन्न झाली होती, विष्णुशास्त्र्यांच्या निबंधमालेचा केवढा दांडगा परिणाम या तरुणांच्या मनोवृत्तींवर व लेखनावर झाला होता, हें स्पष्ट दिसून येतें. आणि त्याबरोबरच हेंहि प्रत्ययास येतें कीं या सर्व लोकांनीं भाषाशैलींत, लेखांच्या मांडणींत व इतर बाह्य योजनांमध्यें शास्त्रीबोवांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न, जाणून वा नेणून, जरी चालविला होता, तरी त्यांची खरी ऐट, ओजस्विता व भेदकता यांपासून ही सर्व मंडळी फार दूर होती. ते सर्व प्रामाणिक अनुचर होते, शास्त्रीबोवांसारख्या नेत्याची प्रतिभा व स्वयंप्रज्ञता त्यांच्या ठायीं नव्हती. 'राजहंस' मासिकांत ज्ञानदान, मनोरंजन व नीतिबोध यांचें समभाग मिश्रण केलेलें दिसून येतें. हें मासिक कसें बसें दोन वर्षें चालून आर्थिक पाठिंब्याच्या अभावीं बंद पडलें.

'राजहंस' बंद पडल्यावर जवळ जवळ सात वर्षांनीं त्यानीं नाटकें लिहिण्यास सुरुवात केली व नाट्यकलेचा प्रसार करण्यांत अखेरपर्यंत ते रंगून गेले.

बरवे यांनीं पौराणिक, ऐतिहासिक, भाषांतरित अशीं सुमारें वीस नाटकें लिहिलीं आहेत. नाटककार या नात्यानें बरव्यांवर त्यांच्या योग्यतेविषयीं अतिशयोक्त विधानें करण्यांत मतलब नाहीं. किर्लोस्कर, खाडिलकर, कोल्हटकर, गडकरी यांचें स्थान वेगळें आणि बरव्यांसारख्यांचें वेगळें. हे महारथी झाले नसते तर महाराष्ट्राचा नाट्यसंसार जसा झाला तसा झालाच नसता. बरव्यांच्या विषयीं तसें म्हणतां येण्याजोगें नाहीं. तथापि त्यांचीं नाटकें दुसऱ्या श्रेणींत वरच्या दर्जाचीं खास ठरतील. बरव्यांची नाट्यरचना मुख्यत्वें पौराणिक व अल्पांशानें ऐतिहासिक आहे. कथानक

पौराणिक वा ऐतिहासिक कसेंहि असो, खाडिलकरांसारखा प्रतिभाशाली नाटककार त्या कथानकाला सहज झेपेल व शोभेल असें एखादें प्रमेय स्वकल्पनेनें निर्माण करतो. त्या प्रमेयाचा ध्वन्यात्मक रीतीनें सुंदर आविष्कार कथानकामधून होईल अशी कथानकाची गुंफण तो करितो. त्या प्रमेयाची सिद्धि परिणामकारक रीतीनें होण्यासाठीं त्यांत संघर्षाचीं बीजें प्रारंभापासून निर्माण करून, तो संघर्ष, प्रपाताकडे वेगानें वाहत जाणाऱ्या सरिदोघाप्रमाणें, निकराच्या बिंदूपर्यंत वाढत जाईल अशी तो योजना करितो. नाटककाराचें हें प्रमेय सामाजिक, कौटुंबिक अथवा वैयक्तिक असूं शकतें आणि त्यानें चित्रित केलेला संघर्ष बाह्य वा आंतर, शारीरिक अथवा मानसिक, अथवा अंशतः दोन्ही प्रकारचा असूं शकतो. हा संघर्ष ज्या भूमिकांच्या द्वारा तो चित्रित करतो त्या भूमिका सजीव व्यक्तीप्रमाणें वाचक-प्रेक्षकांच्या मनांत अत्यंत जिव्हाळा उत्पन्न करणाऱ्या व भावोत्कट असाव्या लागतात.

प्रतिभाशाली नाटककाराच्या कृतींत आढळणारे हे गुणविशेष बरवे यांच्या नाटकांमध्यें फार मोठ्या प्रमाणांत जरी आढळले नाहींत तरी त्यामुळें त्यांच्या विशिष्ट योग्यतेस बाध येतो असें कोणी समजण्याचें कारण नाहीं. बरव्यांच्या नाटकांत कथानकाची मांडणी सरळ परंतु विस्कळीत रीतीनें केलेली आढळते. कथानकाच्या रचनेंत संघटितपणा व बांधेसूदपणा कमी. वाचकाच्या मनाची पकड घेणाऱ्या जिवंत व भावोत्कट भूमिका त्यांच्या नाटकांत एकंदरींनें थोड्याच आढळतात. नाटक पौराणिक असेल तर त्यावरून मामुली स्वरूपाचा नीतिबोध किंवा ऐतिहासिक असेल तर त्यापासून स्वदेशाभिमान, स्वधर्माभिमान, विभूतिगौरव इत्यादिकांचा ठसा मनावर उमटतो. परंतु जीवनविषयक एखादें प्रमेय किंवा एखादा दृष्टिकोण कथानकामध्यें अनुस्यूत करून त्याचा आविष्कार चढत्या उत्कटतेनें करावयाचा ही करामत साधण्याचा प्रयत्न बरव्यांनीं फारसा कोठें केलेला दिसत नाहीं. पौराणिक किंवा ऐतिहासिक कथानकामध्यें कांहीं फरक न करितां तें मुळांत असेल तसेंच, निरनिराळ्या निवडक घटनांच्या द्वारा, नाटकांत चित्रित करावयाचें आणि मुख्य कथानकाच्या गांभीर्याला व्यंजन म्हणून कांहीं पात्रें निर्माण करून त्यांच्या तऱ्हेवाईकपणामुळें साधेल तशी विनोदनिर्मिती करावयाची हें त्यांच्या नाट-

कांच्या मांडणीचें साधारणतः सर्वत्र स्वरूप दिसून येतें. त्यांचीं सर्व नाटकें—इंग्रजी नाटकांचीं भाषांतरें खेरीज करून—संगीत आहेत. त्यांतील संगीत किर्लोस्कर—देवल यांच्या धर्तीवर आहे. म्हणजे पदें विपुल असून पदांमध्यें कथाभाग पुष्कळ वेळां गुंफलेला आढळतो. बऱ्यांचीं पदें काव्याच्या दृष्टीनें पुष्कळ ठिकाणीं फार सुंदर वठलीं असून तीं किर्लोस्कर—देवल यांच्या पदांस या बाबतींत सहज मागें टाकूं शकतील असें वाटतें. त्यांच्या भाषेंत प्रौढपणा असूनहि प्रसाद आहे, वर्णनशैलींत कल्पनाचमत्कृति असूनहि रसाळपणा आहे. कोट्या, श्लेष इत्यादि कृत्रिम प्रकार बेताबाताचे आहेत. संभाषणांतील चटकदारपणा, उत्तरप्रत्युत्तरांतील पांचपेंच, इत्यादि गोष्टी साधण्याचा त्यांनी बऱ्याच ठिकाणीं प्रयत्न केला आहे व तो बऱ्याच अंशानें यशस्वीहि झाला आहे.

बरवे यानीं नाटकांप्रमाणेंच नाट्यकलेच्या उन्नतीप्रीत्यर्थ भिन्नभिन्न दिशांनीं प्रयत्न केले. त्यांपैकी उल्लेखाई असे पुढील प्रयत्न होत: 'नाट्यकला' मासिक, 'भारत नाट्यसमाज', 'विविध नाट्यविषयसंग्रह.'

'नाट्यकला' मासिक १९०४ सालीं सुरू करण्यांत आलें. नाट्यकलेची सांगोपांग व सोपपत्तिक चर्चा व्हावी व आपल्या इकडील नाट्यव्यवसायाला शुद्ध, शास्त्रोक्त व भरदार स्वरूप प्राप्त व्हावें हा या मासिकाचा उद्देश होता. मासिकाच्या स्वरूपांत हें दोन वर्षें चालल्यानंतर १९०७ च्या मार्च महिन्यापासून त्याला पाक्षिकाचें स्वरूप देण्यांत आलें. तें पूर्वी मुंबईस छापून घेत असत त्याऐवजीं आपल्या विद्याभूषण छापखान्यांत छापण्यास त्यानीं सुरवात केली. पाक्षिक स्वरूपांत ही 'नाट्यकला' आणखी फार तर दीड दोन वर्षें चालली असावी. पुढें विद्याभूषण छापखान्याशीं संबंध सोडून ते पुण्यास आले, तेव्हां हें पाक्षिक बंद पडलें.

नाट्यव्यवसायाचें आणि त्यांत गुंतलेल्या लोकांचें संघटन व नटविद्येची सर्वांगीण प्रगति करून घेण्याचें साधन म्हणून त्यानीं १९०५ सालीं 'भरत (भारत) नाट्यसमाज' नांवाची संस्था स्थापन केली. या संस्थेची मुहुर्तमेढ, २८ आगष्ट १९०५ रोजीं कै. गणेश श्रीकृष्ण उर्फ दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखालीं जें 'नाटक मंडळयांचें संमेलन' भरलें, त्यांत रोंवण्यांत आली. या संस्थेच्या हातून तिच्या उद्देशानुसार, कांहीं वर्षेंपर्यंत नाट्यसंमेलनें

भरविण्यापलिकडे, विशेष कांहीं कार्य झालेलें दिसत नाहीं. या संमेलनांतील महत्त्वाचीं भाषणें व चर्चा, १९१३ सालीं 'नाट्यविषयाची सुशिक्षित चर्चा' या पुस्तक द्वारा त्यांनीं प्रसिद्ध केली. पुढें कांहीं वर्षांनीं त्यांनीं नाट्यशिक्षणाची एक योजना आंखून, त्याप्रमाणें शिक्षण देण्याकरितां एक 'नाट्यशाळा' स्थापन केली होती. 'सुलभ व्यायाम,' 'स्वरसाधन,' 'वक्तृत्वाचीं साधनें,' 'नेपथ्य', 'रंगसूचना अथवा सामान्य नाट्यशिक्षा' अशीं क्रमिक पुस्तकेंहि त्यासाठीं तयार केलीं. त्यांपैकीं पहिलीं दोन प्रसिद्ध झालेलीं असून, बाकीचीं हस्तलिखित स्वरूपांत आहेत.

बरवे यांची सर्व हयात, नट, नाटकें व नाट्यसंस्था यांच्या प्रीत्यर्थच खर्च झाली. त्यांच्या खटाटोपांना यावें तसें यश जरी लाभलेलें दिसलें नाहीं, तरी नाट्यकलेच्या उन्नतीची त्यानीं जी दिशा दाखवून दिली तिचें महत्त्व केंव्हांहि विसरून चालणार नाहीं.

[ संक्षेपः 'अनंत वामन बर्वे;' लेखक—
प्रो. श्री. ना. बनहट्टी; 'एकावळी' मधून. ]

**वाङ्मय :**

( १ ) उदेपूरचा महाराणा प्रतापसिंह; ऐ० नाटक; १८९५, बॉम्बे न्यू प्रेस, मुंबई; आ. ३ री १९०९, जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

( २ ) मातृशिक्षाप्रभाव अथवा श्री शिवचरित्राचा पूर्वार्ध; संगीत ऐ० नाटक; १८९६; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

( ३ ) लोकमतविजय, अथवा केवळ सुष्टदुष्ट मनोविकारांचा एक विचित्र खेळ; गद्यपद्य सामाजिक नाटक; १८९८; बॉम्बे न्यू प्रेस, मुंबई.

( ४ ) समजुतीचा घोटाळा, [ गोल्डस्मिथकृत 'She Stoops to Conquer' च्या आधारें ], गद्य सामाजिक नाटक; सिव्हिल मिलिटरी ऑर्फनेज छापखाना, पुणें.

( ५ ) महाकवि भवभूतिविरचित उत्तररामचरित नाटकाची संगीत रंगावृत्ति; १९०९; जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

(६) संगीत गोपीचंद नाटक; पौराणिक नाटक; १९०९, १९१४; जगद्धितेच्छु प्रेस; १९१५ चित्रशाळा छापखाना, पुणें.

(७) संगीत शुकचरित अथवा शृंगारविभवपूर्वक वैराग्यविजय नाटक; १८९१, तृ. आ. १९०९, नेटिव्ह ओपिनियन, मुंबई.

(८) संगीत सुदाम नाटक; पौ० नाटक; १९१२, चित्रशाळा छापखाना, पुणें.

(९) शारदामंडन; गद्यपद्य ऐ० नाटक; १९०५ निर्णयसागर छापखाना; १९०९ जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.

(१०) पिशाच्चविवाह, [ The Spectre Bridegroom या गोष्टीच्या आधारें गद्यपद्य सामाजिक नाटक ]; १९१३; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(११) अण्णासाहेबांची धांदल; प्रहसन, आ. दुसरी १९१०; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(१२) वेणीसंहार, संगीत सचित्र पौ० नाटक; १९१४; चित्रशाळा छापखाना, पुणें.

(१३) महासती अनसुया, संगीत पौ० नाटक; १९१९; चित्रशाळा छापखाना, पुणें.

(१४) सैतान नाटक; [ मेरी कॉरेली कृत 'Sorrows of Saitan' च्या आधारें ]; यशवंत प्रेस, पुणें.

(१५) श्रीमद्गीतादर्शन; गद्यपद्य आध्यात्मिक नाटक; एक अंकी रूपक; शके १८२४; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१६) भक्त प्रल्हाद; संगीत पौ० नाटक; १९२८, लॉयल प्रेस, पुणें.

(१७) वाचनमंदिर अथवा 'कटाक्ष' या संज्ञेनें स्वतंत्र व परतंत्र प्रसिद्ध झालेले निवडक लेख-भाग १ ला; १८८९; शेतकरी छापखाना; पुणें.

(१८) मोठेंच गंडांतर अथवा राष्ट्रसभेसंबंधानें बखेड्याचें रहस्य; नाट्य-प्रवेश; १८९५; श्री विठ्ठल छापखाना, पुणें.

(१९) पैसा मिळविण्याची युक्ति; [ धंदे शिकण्याची आवश्यकता ]; शेतकरी छापखाना, पुणें.

(२०) नाटक कां, कोणी, कसें, कोणतें पहावें ? १९११; चित्रशाळा छापखाना, पुणें.

(२१) महाराष्ट्र रंगभूमीचें सांवत्सरिक समालोचन; १९१०, ज्ञानचक्षु छापखाना, पुणें; १९१२ चित्रशाळा छापखाना, पुणें.

(२२) शकार; [ मृच्छकटिक नाटकांतील शकाराच्या भूमिकेची चर्चा ] १९१५; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२३) भातुकली अथवा मुलींचे अनेक खेळ–प्रयोगरूपानें [ ओंव्या, खेळ, म्हणी, उखाणे इ. गोष्टीरूप खेळ ]; आ. दुसरी १९१५; आ. तिसरी १९२२ चित्रशाळा छापखाना, पुणें.

(२४) नाट्यकथामृत; १९०७; [ नाट्यकलेच्या उत्पत्तीची पौराणिक कथा ] मनोहर प्रेस, पुणें.

(२५) नाट्यबोध; [ नाट्योत्पत्ति, नाटक कसें असावें वगैरे ]; १९२२; आनंद छापखाना, पुणें.

(२६) करमणूक ( किंवा ) अनेक प्रकारचे बोधपर असून मनोरंजक चुटके १८८९; धन्वंतरी छापखाना, पुणें.

(२७) पारिभाषिक भूगोलज्ञान, [ प्राचीन व अर्वाचीन माहितीसह ]; १८८९; जगदीश्वर छापखाना, मुंबई.

(२८) ॲनी बीझंट चरित्र; १८९४; पूर्णचंद्रोदय छापखाना, बडोदें.

**बर्वे, आनंदराव सखाराम** [ १८४५–१८९३ ] भाषांतरकार. बेळगांव जिल्ह्यांतील अथणी गांवीं जन्म. वडील कस्टमखात्यांत नोकरीस होते. घरची परिस्थिति सामान्य असल्यामुळें कांहीं शिक्षण वडिलांच्या मदतीनें, कांहीं वडिलांच्या स्नेह्याच्या मदतीनें व उच्च शिक्षण स्वावलंबनानें पार पाडलें. प्राथमिक शिक्षण ठाणें येथें व माध्यमिक व उच्च शिक्षण मुंबई येथें झालें. १८७० मध्यें ते बी. ए. झाले व कांहीं वर्षे त्यांनीं मुंबईच्या वुइल्सन हायस्कुलात शिक्षकाचें काम केलें. शिक्षक असतांना कायद्याचा अभ्यास करून

परीक्षा दिली. पुढें १८७३ मध्यें, राजा सर टी. माधवराव इंदूर संस्थानचे दिवाण असतां त्यांनीं त्यांस इंदूरास बोलावून घेऊन प्रांत न्यायाधिशाची जागा दिली. १८७७ पर्यंत होळकरशाहींत त्यांनीं नोकरी केली. न्यायखात्याच्या चिटणिसाचे जागेपर्यंत ते चढले होते. १८७५ त सर टी. माधवराव यांनीं इंदूर सोडून बडोद्यास दिवाणगिरी स्वीकारली. त्यांच्याबरोबर व मागाहून इतर आणखी कांहीं मंडळींनीं इंदूर सोडलें, त्यांत बर्वे हे एक होते. १८७७ त बडोद्यास ते सिटी मॅजिस्ट्रेटचे जाग्यावर गेले. येथें ते अखेरपर्यंत असून वरिष्ठ कोर्टाचे न्यायाधिशाचे जागेपर्यंत ते चढले होते.

बर्वे यांची स्वतंत्र अशी ग्रंथरचना नाहीं. त्यांचे नांवावर 'हिंमतबहादूर' व 'ठगाची जबानी' अशीं जीं दोन पुस्तकें आहेत तीं दोन्ही अनुवादात्मक आहेत. पहिलें 'हॅम्लेट'चा अनुवाद असून, दुसरें कॅप्टन मेडोज टेलर याच्या 'कन्फेशन्स ऑफ ए ठग' या पुस्तकाचा अनुवाद आहे. 'हिंमतबहादूर' वाचतांना स्वतंत्र नाटकासारखें वाटतें. मूळ नाटककाराच्या कृतींतील रहस्य व हृद्गत त्यांत यथासांग उतरलें आहे. भाषाहि उत्तम, मनोहर, प्रसंगास साजेल अशी, यथोचित आणि पुनः दरबारी थाटाची, पण सुबोध अशी आहे. 'ठगाची जबानी' प्रथमतः 'विविधज्ञानविस्तार' मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झालें. हें पुस्तक अपुरें आहे. भाषांतर चांगलें उतरलें आहे. त्याची भाषा दरबारी थाटाची, ऐटदार पण सुबोध, आणि मराठी बोलणाऱ्या उमरावांच्या तोंडीं शोभण्यासारखी आहे. तींत उर्दू व फारशी शब्द जरा वाजवीहून जास्त आहेत हें खरें, पण काल व व्यक्ती यांना साजेल अशीच भाषा त्यांनीं मुद्दाम वापरली आहे.

'विविधज्ञानविस्तारां'त त्यांचे पुढील लेख प्रसिद्ध झाले आहेत. १ मुलींच्या शिक्षणक्रमाविषयीं एका जर्मन बाईचे विचार; २ जुन्या पुराण्या गोष्टी (यांत सोनाराची मुलगी, इराणचा सौदागर, सावत्र आई या तीन गोष्टी आहेत. रोमेशचंद्र दत्तकृत 'बंगालियाना' या पुस्तकांतून घेतल्या आहेत.); ३ राजा सर टी. माधवराव यांनीं स्त्रीशिक्षणावर दिलेल्या व्याख्यानाचा सारांश.

[ आधार : बा. ना. देवकृत 'चरित्रात्मक लेख,' विविधज्ञानविस्तार, ऑग–सप्टें. १९०२. ]

**वाङ्मय :**

(१) हिंमतबहादूर (दानवखंडाचा राजपुत्र)—[हॅम्लेटचें रूपांतर]; १८९८; प्रकाशक, विविधज्ञानविस्तार, मुंबई.

(२) ठगाची जवानी; प्र. आवृत्ति १८८९; तृ. आवृत्ति १९३१.

**बळवंत** [१८५५–१९०३] कवि व वृत्तपत्रकार. यांचें संपूर्ण नांव बळवंत जनार्दन करंदीकर. कवि विनायक यांचे हे बंधु. यांचा जन्म पश्चिम खानदेशांत धुळें येथें झाला. यांची सर्व कविता 'काव्यरत्नावली' मासिकांत प्रसिद्ध झाली आहे. 'बळवंत', 'गंधर्व', 'रमाकांत' अशा तीन टोपणनांवानें ती आली आहे. धुळें येथील 'आर्यावर्त' व 'खानदेश-वैभव' या साप्ताहिकांचे ते संपादक होते. 'प्रेमालेख्य' या नांवाचें एक खंडकाव्य त्यांनीं लिहिलें आहे.

**बांदकर, कृष्ण जगन्नाथ** [१८४४–१९०२] गोमांतकस्थ संतकवि. गोमंतकाची राजधानी जें पणजी शहर त्यापासून तीन कोसांवर असलेल्या डोंगरी या गांवचे हे राहणारे. कुलपरंपरागत धंदा भिक्षुकीचा. परंतु तिचा कंटाळा येऊन, परमार्थसाधनाकडे मन वळल्यामुळें, तिचा त्यांनीं ऐन तारुण्यांत त्याग केला. रत्नागिरी जिल्ह्यांतील वेंगुर्लें शहरीं, विष्णुबुवा सोमण नांवाचे रामदास पंथी एक अधिकारी साधु पुरुष होते, त्यांचेकडून यांस परमार्थाची दीक्षा मिळाली. कांहीं काळ त्यांच्या सहवासांत घालविल्यावर स्वगृहीं परत येऊन यांनीं आपल्या गांवीं श्रीराम मंदिर बांधलें व उर्वरित आयुष्य भजन–पूजन–कीर्तनांत व्यतीत केलें. यांचा पारमार्थिक अधिकार मोठा होता. कीर्तन–भजनप्रसंगीं म्हणण्यासारखीं अनेक सुरस पदें यानीं रचिलीं आहेत. रामनवमीच्या वार्षिकोत्सव प्रसंगीं पौराणिक प्रसंगांवर आधार-लेलीं संगीत नाटकें स्वतः रचून त्यांचे प्रयोग करविण्याचा यांचा प्रघात असे. अशाच एका उत्सवप्रसंगीं, मिठाच्या कंत्राटाच्या निमित्तानें अण्णा किर्लोस्करांना बांदकरांचा संगीत नाट्यप्रयोग पाहण्यास मिळाला. बांदकरांचे चरित्रकार रा. थळी यानीं या प्रसंगासंबंधींची पुढील प्रमाणें हकिगत दिली आहे "कै. अण्णा किर्लोस्करांस श्री बांदकर महाराजांची कीर्ति ऐकून ठाऊक होती. यास्तव, तेहि

एके दिवशीं या नाटकास आले. त्या दिवशीं 'शुकरंभासंवाद' नाटक असल्या-मुळें प्रयोगास अप्रतिम रंग आला. श्री बांदकर महाराजांनीं रचिलेलीं तीं मनोहर पदें व त्यांतील मोहक संगीत, भाषणाची अपूर्व पद्धति आणि लाटा-नुप्रासयुक्त गद्य पाहून कविवर्य अण्णांचें मन इतकें रमलें कीं, 'त्यांना त्या वेळीं एक प्रकारची महत्त्वाकांक्षा उत्पन्न होऊन, श्री बांदकर महाराजांना सदर्हु नाटकें घेऊन मुंबईस यावें अशी त्यानीं विनंति केली; परंतु तीं नाटकें करून पैसे अगर कीर्ति मिळविण्याचा आपला हेतु नसून फक्त भगवल्लीलाप्रसार करण्याचाच आहे, असें त्यांस उत्तर मिळालें. स्वतः येण्याची इच्छा नसेल तर नको, पण सदर्हू नाटकें तरी आपणास द्यावीं, अशी अण्णांनीं विनंती केली; परंतु तीं नाटकें पुस्तकरूपानें स्वतंत्र तयार नसून प्रत्येक पात्राकडे त्या त्या वेळीं तयार करून दिलेले त्यांचे खर्डे मात्र होते; त्यामुळें, तींहि त्यांस नेतां आलीं नाहींत. शेवटीं, आपल्याला नाटकें करण्याची याच ठिकाणीं स्फूर्ति उत्पन्न होत आहे, करितां हातचा प्रसाद तरी मिळावा, अशी इच्छा दर्शविली. ती पाहून बरें आहे म्हणून, श्रीरामाकडे व मारुतिरायाकडे ती त्यांची इच्छा पूर्ण करण्या-बद्दल प्रार्थना करून श्रीबांदकर महाराजांनीं मोठ्या प्रेमानें या भावी नाट्या-चार्याला आपल्या हातानें नारळ व प्रसादपुष्पें दिलीं. त्यानंतर अण्णांनीं शाकुंतल वगैरे नाटकें रचून रंगभूमीवर त्यांचे अनेक प्रयोग केले व दिगंत कीर्ति मिळविली." बांदकर महाराज हे स्वतः चांगले गायक होते. त्यामुळें त्यांच्या काव्यसंग्रहांत विविध रागरागिण्यांवर रचिलेलीं सुंदर व रसपूर्ण पदें आढळतात. त्यांची पद्यरचना सरळ, सुबोध व स्वानुभवपूर्ण अशी आहे. या आपल्या पद्यांच्या द्वारा त्यांनीं गोमांतकांत, श्रीमंतांपासून गरीबांपर्यंत, कोणत्याहि प्रकारचा भेदभाव न ठेवतां परमार्थज्ञानाचा प्रसार केला.

**वा ङ्‌म य :**

( १ ) स्वात्मतत्वामृतशतक; पद्य; १९०३: कर्नाटक छापखाना, मुंबई.

( २ ) श्रीकृष्ण भट्ट बांदकर यांचा सचरित्र कवितासंग्रह; संपादकः कृष्ण जगन्नाथ थळी; १९३२; श्रीसंतसंघ पुस्तकमाला, मुंबई.

**बापट, गोविंद शंकरशास्त्री** [ १८४४-१९०४ ] संस्कृतज्ञ, सुबोध भाषांतरकार. रत्नागिरी जिल्ह्यांतील 'पुळ्याचें गणपति' ही यांची जन्मभूमि.

वडील उत्तम प्रकारचे शास्त्री असल्यामुळें त्यांच्याच हाताखालीं संस्कृताचा अभ्यास त्यांनीं केला; धर्मशिक्षणहि त्यास चांगलें मिळालें. पुढील उच्च अभ्यासासाठीं ते पुण्यास केशवशास्त्री नेने या तत्कालीन विख्यात विद्वानाकडे येऊन राहिले. त्यांजकडे त्यांनीं व्याकरण व न्याय याचा अभ्यास केला. बदलत्या कालानुसार, उदरनिर्वाहासाठीं केवळ शास्त्राभ्यासावर अवलंबून न राहतां, अन्य कोणतें तरी द्रव्यदायी साधन जवळ असणें प्राप्त हें जाणून, पुणें येथील ट्रेनिंग कॉलेजांत ते दाखल झाले. येथील अभ्यासक्रम त्यांनीं शिष्यवृत्तीच्या जोरावर पुरा केला. परीक्षा उतरल्यावर, त्यांस ठाणें येथील हायस्कुलांत शास्त्र्याची जागा मिळाली. या हायस्कुलांत सहा महिने काम केल्यावर, त्यांची बदली बढतीवर अहमदनगर येथील हायस्कुलांत झाली. तेथें त्यांनीं तेरा वर्षें काम केलें. नंतर, ते बढतीवर, १८८१ सालीं, मुंबई येथील एल्फिन्स्टन हायस्कुलांत आले. त्या जागीं दहा वर्षें काम करून, १९०१ सालीं त्यांनीं पेन्शन घेतलें.

अहमदनगरास जाईपर्यंत, गोविंदशास्त्र्यांस इंग्रजी भाषेचा संस्कार झाला नव्हता. नगरास आल्यावर, त्या भाषेचा अभ्यास त्यांनीं खाजगी रीतीनें केला व तिचें चांगलें ज्ञान मिळविलें. त्यांची ग्रहणशक्ति विलक्षण होती. संस्कृत भाषेचे मार्मिक शिक्षक या नात्यानें विद्यार्थीवर्गांत त्यांची जितकी प्रख्याति होती, तितकीच प्रख्याति 'उत्तम मराठी लेखक' म्हणून सगळया महाराष्ट्रांत होती. अहमदनगरास, असतांना त्यांनीं लेखनास प्रारंभ केला. त्यांचा पहिला ग्रंथ 'नौकानयनाचा इतिहास' हा होय. यानंतर दिनाब्रेस, नीतिमंदिर, सद्वर्तन, नेपोलियन बोनापार्टचें चरित्र, पाल आणि व्हर्जिनिया, हरि आणि त्रिंबक, इलिझाबेथ, दाशरथिरामचरितामृत, व्युत्पत्तिप्रदीप इत्यादि पुस्तकें त्यांनीं लिहिलीं. यांपैकीं बऱ्याच पुस्तकांस सरकारचा आश्रय मिळाला होता. या पुस्तकांखेरीज 'संस्कृत ग्रंथार्थसंग्रह' या सदराखालीं, कथापुराणांच्या आधारानें, सुमारें २५।३० पुस्तकें त्यानीं लिहिलीं आहेत; परंतु ह्यावर त्यांचें नांव नाहीं. 'व्युत्पत्तिप्रदीप' या पुस्तकावरून, शास्त्रीबुवांच्या संस्कृत व मराठी या दोन्ही भाषांच्या ज्ञानाची उत्तम प्रकारें साक्ष पटते. त्यांची भाषा अत्यंत शुद्ध, संस्कृत, सरळ आणि मधुर अशी असून, थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ आणण्याची त्यांची शैली वर्णनीय आहे. शिवाय,

त्यांच्या लेखनांत एक प्रकारची आस्था दिसून येते. 'पाल आणि व्हार्जिनीया' 'हरि आणि त्रिंबक' ('सँडफर्ड अण्ड मर्टनचें' रूपांतर) या पुस्तकांत हीं त्यांचीं गुणवैशिष्ट्यें विशेषत्वानें आढळतात. या पुस्तकांची रचना व भाषा इतकी साधी व रसाळ आहे कीं, वाचकास तीं पुनः पुन्हां वाचावीं, अशी इच्छा झाल्याशिवाय राहात नाहीं. शास्त्रीबुवांनीं, विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं, कांहीं संस्कृत पुस्तकेंहि लिहिलीं आहेत.

शास्त्रीबुवा हे पक्के जुन्या मताचे होते, तरी इंग्रजी ग्रंथांचे वाचनानें त्यांचे विचार व्यापक झाले होते. आजच्या काळीं, आपल्या चालीरीतींत व आचारविचारांत कोणत्या सुधारणा झाल्या पाहिजेत, त्याचा त्यांनीं चांगला विचार केला होता व त्याची छटा त्यांच्या लेखांत, व्याख्यानांत आणि ग्रंथांत ठायीं ठायीं दृष्टीस पडते. 'ते जुन्या व नव्या मतांच्या मंडळीस सारखेच मान्य होते,' असें जें 'बालबोध' कर्त्यांनीं म्हटलें आहे, तें अगदीं खरें आहे.

**वाङ्मय :**

(१) गद्यरत्नमाला; [ विविध विषयांतील गद्य वेंचे ] प्र. आ. १८७६, चतुर्थ आवृत्ति १९०२; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२) सद्वर्तन; प्र. आ. १८८२; ७ वी आवृत्ति १९१०; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(३) नीतिमंदिर; [ मन्वाज्ञा, विदुरवाक्य व हितोपदेशसार ]; तिसरी आवृत्ति १८९२; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(४) दाशरथिरामचरितामृत; [ श्रीवाल्मीकि रामायणावरून प्रारंभापासून वनवासगमनापर्यंत ]; १८९३; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(५) वेणीबंधन; [ वेणीसंहार नाटकाचे आधारें ]; १८९०; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(६) अनंतचतुर्दशीपूजा सार्थ कथा; [ पोथी; भविष्योत्तर पुराणांतील कथा ]; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(७) वटसावित्री पूजा सार्थ कथा; [ पोथी ]; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(८) सत्यनारायण पूजा सार्थ कथा; [ पोथी ]; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(९) हिंदुस्थान देशाची अवनति; [ हिंदु युनिअन क्लब, हेमंत व्याख्यान-माला, व्याख्यान ७ वें ], १८८७; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१०) नौकानयनाचा इतिहास; १८७२, गणपत कृष्णाजीचा छापखाना, मुंबई; १८८८, एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई.

(११) व्युत्पत्ति-प्रदीप; १८८५; ९ वी आवृत्ति १९१७, निर्णयसागर छापखाना. मुंबई.

(१२) इलिझाबेथ अथवा सिबिरिया देशांतील हद्दपार झालेलें कुटुंब; [ इंग्रजीवरून ]; १८७४; एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई,

(१३) आर्यवृत्त; [ आर्य कोण, कोठून आले इत्यादि माहिती; 'आर्यविद्या-सुधाकरा'चे आधारें ]; १८८४; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१४) पंचतंत्रसार अथवा विष्णुशर्मनीतिकथा; आ. दुसरी १८८९; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१५) हरि आणि त्रिंबक; नवी आवृत्ति १९२८; आनंद छापखाना, पुणें.

(१६) नापोलियन बोनापार्त यांचें चरित्र; [ लॉकहार्टच्या इंग्लिश चरित्राचे आधारें ]; १८७८.

(१७) उदयन चरित, भाग ४ था; १८९२; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(१८) नागानंदसार १८८८; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

**बापट, नागेश विनायक** [ मृत्यू मार्च १९०२ ] ऐतिहासिक कादंबरी-कार व चरित्रकार. जन्मस्थान सातारा जिल्ह्यांतील वाईक्षेत्र. यांचे पूर्वज विनायकशास्त्री उर्फ नानाशास्त्री बापट सरदार रास्ते यांच्या आश्रयानें वाई येथें येऊन राहिले. ते चार शास्त्रांत पारंगत असून कृष्णातीरीं स्नानसंध्या, शास्त्रावलोकन, अध्ययन व अध्यापन यांत कालक्षेप करीत असत. खुद्द पेशवेहि त्यांस मानीत. त्यांच्या सल्ल्याचें–धार्मिक बाबतींत–कधीं कारण पडलें तर, पालखी पाठवून बोलवणें येत असे. पुढें यांच्यापैकींच एक गृहस्थ रास्त्यांचे दिवाणहि झाले.

नागेशराव बापट यांचे मॅट्रिकपर्यंत इंग्रजी शिक्षण झालें होतें. कऱ्हाड येथील सुप्रसिद्ध 'चंपू'कार व 'सुश्लोकलाघव'कर्ते विठोबा अण्णा दप्तरदार यांचेजवळ संस्कृताचेंहि चांगलें अध्ययन केलें होतें. या अध्ययनाचा त्यांच्या लेखनावर चांगलाच परिणाम झालेला दिसून येतो. कौटुंबिक परिस्थितीमुळें विश्वविद्यालयीन शिक्षण घेण्याची संधी त्यांना मिळाली नाहीं, प्रथम त्यांनीं पोष्टखात्यांत पोष्टमास्तर म्हणून पांच वर्षे काम केलें व पुढें त्यावेळचे एज्युकेशनल इन्स्पेक्टर मि. वाडिंगटन यानीं सरकारकडे त्यांची शिफारस करून मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यांत त्यांची बदली करून घेतली. या खात्यांत डेप्युटी एज्युकेशन इन्स्पेक्टर म्हणून ते काम पहात असत. या कामावर धारवाड व बेळगांव या ठिकाणीं ते चार वर्षे होते. पुढें या खात्यांतील त्यांचा उत्कर्ष सहन न होणाऱ्या त्यांच्या कांहीं हितशत्रूंनीं त्यांचे विरुद्ध कारस्थानें रचून त्यांचे विषयींचें त्यांच्या वरिष्ठांचें मन कलुषित केलें. त्यामुळें १८७२ चे सुमारास त्यांना आपल्या नोकरीस मुकावें लागलें. ही नोकरी सुटतांच बडोद्यास श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या आश्रयास ते जाऊन राहिले. कांहीं दिवस अबकारी खात्यांत दरोगे म्हणून व पुढें मामलेदार म्हणून संस्थानची चाकरी केली. या चाकरीच्या काळांतच त्यांचें बहुतेक सर्व ग्रंथलेखन झालें आहे. इ. स १९०२ मध्यें, निवृत्तीवेतन घेऊन संस्थानच्या सेवेंतून निवृत्त व्हावयाचें असा हेतु धरून, कांहीं दिवसांची रजा घेऊन ते आपले जामात लक्ष्मण केशव वेलणकर यांजकडे फलटणास येऊन राहिले व तेथेंच हृदयविकारानें वारले. इतिहास व इतिहाससंशोधन याचा यांना अतिशय छंद जडलेला होता. सरकारी फिरतींत ते ज्या ज्या ठिकाणीं जात, त्या त्या ठिकाणची चौकस बुद्धीनें पाहणी करून ऐतिहासिक माहिती व कागदपत्रें मिळवीत. याचा उपयोग त्यांनीं आपल्या चरित्र व कादंबरी–लेखनांत भरपूर करून घेतला आहे. आपलीं पुस्तकें प्रसिद्ध करण्याच्या आधीं त्यांतील कांहीं भागांचें जाहीर वाचन करण्याचा त्यांचा रिवाज असे. अशा तऱ्हेनें वाचन बडोदें, पुणें, सातारा, फलटण, मलकापूर वगैरे ठिकाणीं केल्याचें व तें लोकांना आवडल्याचें तत्कालीन वृत्तपत्रांतील वृत्तांतांवरून आढळतें.

स्वदेश व स्वभाषा यांबद्दल नितांत अभिमान बाळगून, लेखणीच्या द्वारा,

कर्तव्यबुद्धीनें त्यांची सेवा करण्याचें व्रत स्वीकारलेल्या, एकोणीसाव्या शतकाच्या उत्तरार्धांतील फार थोड्या साहित्यसेवकांपैकीं नागेशराव बापट हे एक होते. मार्गदर्शक, स्फूर्तिप्रद पण रसपूर्ण अशा गद्यग्रंथांची त्या काळांत भासणारी उणीव भरून काढावयास पुढें सरसावलेल्या लेखकांपैकीं ते एक होते. 'पानीपतची मोहीम' या आपल्या ऐतिहासिक कादंबरीच्या प्रस्तावनेंत ते म्हणतात. "मराठी भाषेंत ग्रंथसंपत्तीचें भांडार फार अल्प आहे. शास्त्रीय विषयांवर लिहिलेले ग्रंथ हवे आहेत. तसेंच ऐतिहासिक साधनांतील माहितीचा आधार घेऊन, रचनाचातुर्य, व्यवस्थाचातुर्य व भाषासौंदर्य या गुणांनीं भरलेले ग्रंथ बाहेर पडूं लागतील तरच, ग्रंथ-संपत्तीची खरी सेवा आपल्याकडून घडूं लागली असें म्हणतां येईल. केवळ एकाच प्रकारच्या कल्पना, एकाच प्रकारचें वळण, एकाच प्रकारचे अलंकार व एकाच प्रकारची लेखनसरणी ग्रंथात असतां कामा नये इतके सर्व गुण असून शिवाय पद्यग्रंथाची मोहकता सर वॉल्टर स्कॉट व लॉर्ड मेकॉले यांच्या ग्रंथांप्रमाणें गद्यग्रंथांतहि दिसून आली पाहिजे. पद्यग्रंथांची अक्षरवटिका, यमक, प्रास वगैरेची ठासठी नको. पण त्यांतील सौष्ठव, लाघव, सुंदर व स्वाभाविक रचना, आणि मनोहर सौरस्य, या गुणांचा गद्यग्रंथांत उत्तम प्रत्यय आला पाहिजे. तसेंच पद्यग्रंथांतल्या अतिशयोक्ति, कवीच्या ठरीव कल्पना व अप्रौढ कोट्या, कीं, ज्यांनीं भाषेला विरूपता येते. असले प्रकार वर्ज केले पाहिजेत. ज्या शृंगाररसाला पद्यग्रंथांत बहुधा अग्रस्थान मिळालेलें असतें त्याला गद्य-ग्रंथांत दाबांत ठेवून ते ग्रंथ प्रौढ स्त्रिया, वयांत आलेल्या मुली व वयातीत वृद्ध या सगळ्यांच्या हातीं पडण्यास पात्र असले पाहिजेत. तरच लोकांच्या नीतिमत्तेचा भंग होणार नाहीं. त्यांत मोठमोठे अपरिचित शब्द, शैली वाक्यरचना, वक्रोक्ति, कर्णकटु श्लेश व फाजिल पांडित्य नसलें पाहिजे. साधी, सरळ व स्वाभाविक लेखनसरणी साधारणतः मनोहर लागते, तरी साधेपणाचाहि अतिरेक झाला तर रसहानि होऊन मनोरंजकपणा नाहींसा होण्याची भीति असते. लेखकाच्या मार्गांत अशा अनेक अडचणी उभ्या राहतात. तुकोबा-रायांनीं म्हटल्याप्रमाणे 'बोल बोलतां वाटे सोपें, करणी करतां टीर कांपे,' असा आपणा सर्वांस प्रत्यहीं प्रत्यय येतो. हें जरी सत्य आहे तरी, प्रत्येकानें

आपआपल्या परी करणी करून दाखविण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे. त्याशिवाय मराठी वाङ्मयाची सुस्थिति होण्याचा संभव नाहीं.'' बापटांच्या या उद्गारांवरून त्यांची लेखनविषयक दृष्टि स्पष्ट होते. ही दृष्टि ठेवूनच त्यांनीं आपला लेखनसंसार थाटला. त्या संसारांतील ती टापटीप, ती निर्मळ सौंदर्यसृष्टि, तें सहज खेळणारें काव्यशास्त्र विनोदाचें वातावरण; सारेंच कांहीं वैशिष्ट्यपूर्ण ! विविध रसांचा थाट लीलेनें उडवून देणारा त्यांच्या ताकदीचा लेखक त्यांच्या समकालीनांत क्वचितच आढळेल. संस्कृत व प्राचीन मराठी सारस्वत यांच्या अभ्यासामुळें त्यांच्या लेखनशैलीवर सुंदर संस्कार झालेले होते. त्या शैलीला अनुरूप अशी त्यांची भाषा होती. तिच्यांतील तो डौल, तो पाणिदारपणा, तो रसाळपणा, तो काव्योन्माद कोणाहि रसिकाचें हृदय पैजेनें जिंकूं शकेल. ग्रंथ हस्तलिखित स्वरूपांत असतांना, जाहीर सभांतून त्यांतील निवडक भाग वाचून दाखविण्याचा त्यांचा रिवाज असे. बापटांच्या तोंडून हे भाग ऐकण्याकरितां, आजच्या काळांत काव्यगायन ऐकण्यासाठीं जितक्या आतुरतेनें व उत्सुकतेनें रसिकांच्या झुंडी जमतात, तितक्याच आतुरतेनें व उत्सुकतेनें, श्रोत्यांच्या झुंडी जमत. यासंबंधींचीं वर्णनें 'केसरी', 'इंदुप्रकाश' वगैरे पत्रांत प्रसिद्ध झालेलीं आढळतात.

बापटांचें पहिलें पुस्तक 'श्रीमंत बाजीराव बल्लाळ उर्फ पहिले बाजीरावसाहेब पेशवे' यांचें चरित्र हें होय. "मराठी भाषेंत एकाद्या ऐतिहासिक पुरुषावर ग्रंथ लिहून स्वभाषेची यथामती सेवा करावी, असें बरेच दिवस या ग्रंथकर्त्याच्या मनांत घोळत होतें. परंतु त्या इष्ट हेतूचा अंकुर हृदयभूमीच्या बाहेर न पडतां आंतल्या आंत थबकून राहिला होता. पुढें पहिले बाजीरावसाहेब पेशवे यांच्या कारकीर्दीवर ग्रंथ लिहिण्याबद्दल दक्षिणा प्राईस कमिटीकडून जाहिरात लागली. तेव्हां तो अंकुर वाढीस लागून त्याचा हा ग्रंथरूप वृक्ष बनला. कमिटीची जाहिरात पाहिली, त्यावेळेस फक्त ८।९ महिन्यांची मुदत उरली होती. तरी 'यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः' असा विचार करून, जुने मराठी दाखले, जुन्या मराठी खबरी, कित्येक इंग्रजी इतिहास, व वृद्ध वृद्ध लोकांच्या तोंडच्या विश्वसनीय गोष्टी, या साधनांची जुळवाजुळव करून, त्यांच्या साह्यानें मुदत भरण्याच्या आंत हा ग्रंथ लिहून कमिटीकडे

पाठविला, ऐतिहासिक कादंबरीच्या धर्तीवर लिहिलेलें हें रसाळ चरित्र आहे. यापूर्वी निघालेल्या अशा तऱ्हेच्या पुस्तकांत याची बरोबरी करील असें एकहि पुस्तक नाहीं. ‘या चरित्रलेखकाच्या आंगीं कल्पनाशक्ति सर्वोत्कृष्ट आहे. राग, भय, प्रीति, उत्साह, इत्यादि मनोविकार आणि सृष्टिरचना यांचें हुबेहुब वर्णन करण्याची ह्याची हातोटी उत्तम आहे. याचे विचार मोठे गहन आणि शुद्ध असून, ते स्पष्ट करून दाखविण्यास भाषाहि त्याच्या अगदीं मुठींत आहे. त्यांचीं वर्णनें मोठीं सुरेख आणि चटकदार आहेत. त्यानें उभे केलेले पुतळे स्वभावसिद्ध आणि भव्य आहेत. त्याची गद्यरचना मन रमण्याजोगी आणि बोधपर आहे.’ असें दक्षिणा प्राईझ कमिटीचे चिटणीस रावजीशास्त्री गोडबोले यांनीं या पुस्तकावर व्यक्त केलेलें मत रास्त वाटतें. या चरित्रामुळें बापटांचा चांगलाच बोलबाला होऊन पुढील लेखन हातीं घेण्यास त्यांस प्रोत्साहन मिळालें. बापट यांनीं ज्या काळांत हें चरित्र लिहिलें त्यानंतरच्या काळांत बरेंच ऐतिहासिक संशोधन–विशेषतः पेशवे दप्तराचें–होऊन विपुल माहिती उपलब्ध झाली आहे रियासतकार सरदेसाई यांनीं या सर्व माहितीचा उपयोग करून बाजीरावाचें जें चरित्र लिहिलें आहे त्यानें ऐतिहासिक विश्वसनीयतेच्या दृष्टीनें यापूर्वील सर्व चरित्रांना मागें टाकलें आहे. त्यामुळें बापट किंवा इतर चरित्रकारांच्या कृती यांचें गुणमापन केवळ साहित्याच्याच दृष्टीनें करावें लागेल. बापटांच्या या चरित्रांत, कादंबरींतच शोभेल असा काल्पनिक भाग बराच आहे. उदाहरणार्थ, बाजीरावाची बाल्यदशा, ब्रह्मेंद्रस्वामीचा मठ व त्याचे उपदेश, छावण्यांचीं वर्णनें. हा सर्व भाग भाषा व कल्पना या दृष्टीनें नितांत रमणीय उतरला आहे. वानगीदाखल येथें दोन उतारे देतों:

ब्रह्मेंद्रस्वामींच्या मठांतील एका प्रातःकाळचें खालील वर्णन पहा.

“नित्यनियमाप्रमाणें वैशाखमासीं एके दिवशीं प्रातःकाळीं समाधि विसर्जन करून स्वामी आपल्या शिष्यवर्गास मठांत पाठ सांगत बसले होते. अहाहा! काय त्या स्थळाचें त्या वेळचें वर्णन करावें! मठांतील भूमिका झाडसारव करून स्वच्छ केल्या आहेत. मठाच्या आंत व बाहेर अशुचि किंवा अमंगल पदार्थांचें नांव नाहीं. त्यांच्या सभोंवतीं दर्भ, दूर्वा, तुळशी व फुलझाडें फुललीं आहेत. त्यांजवर वसंतऋतु स्वच्छ क्रीडत

आहे. मठाच्या समोर एक लहानसा ओढा असून त्याचें स्वच्छ निर्मल पाणी झुळझुळ वाहत आहे. बालर्काचे आरक्त किरण मठद्वारांतून स्वामींच्या पायांपर्यंत पसरले आहेत. व्याघ्रांबरावर हे सुवर्णकांति महापुरुष पद्मासन घालून अधिष्ठित झाले आहेत. त्यांनीं अंगास चर्चिलेल्या भस्माचा आणि दोहों बाजूंस केळीच्या पानावर ठेविलेल्या तुळशीफुलांचा घमघम सुवास सुटला आहे. गळयांत, हातांत व दंडांत रुद्राक्षांच्या माळा रुळत आहेत. हातांत स्मरणी हालत आहे. कटीस कौपीन आणि अंगावर काषायवस्त्रें परिधान केलीं आहेत. लाक्षारसानें रंगविलेला लाल कमंडलु स्फटिकवत् स्वच्छोदकानें ओतप्रोत भरलेला आहे. स्वामींच्या सन्मुख दर्भासनें घालून ठेविलीं आहेत. त्यांजवर स्नानसंध्यादि ब्रह्मकर्म आटोपून शिष्यवर्ग पुढें पोथ्या सोडून बसला आहे. इतर ब्रह्मवृंद, भक्तजन व श्रोतृमंडळ यांचीहि दाटी झाली आहे. स्त्रियांनीं आंत प्रवेश करूं नये अशी मठाची मर्यादा असे, म्हणून त्या मठद्वारांतूनच पायांचें दर्शन घेत आहेत. दोहीं अंगांस वेद, शास्त्रें, पुराणें, भाष्य यांच्या पोथ्या भगव्या वेष्टनांत गुंडाळून पाटावर एकावर एक रचून ठेविल्या आहेत. स्वामींच्या अग्रभागीं सामवेदांतर्गत छांदोग्योपनिषदाची पोथी होती, तींतून 'एकमेवाद्वितीय' या महावाक्यावर त्यांचें व्याख्यान चाललें आहे. त्यांची भाषण करण्याची आणि उपपादन करण्याची सर्वोत्कृष्ट शैली पाहून श्रोते चित्रासारखे तटस्थ बसले आहेत. स्वामींची मधुर वाणी उपदेशामृत स्रवत आहे, आणि उत्कंठित श्रोत्यांचे तृषित कान त्याचें पान करण्यास्तव 'आ' पसरून बसले आहेत. त्या समयीं त्यांस असें वाटे, कीं सेवकजनांवर अनुग्रह करण्यासाठीं स्वामींच्या जिव्हाग्रीं शारदादेवी, पार्श्वभागीं ऋद्धिसिद्धि आणि अग्रभागीं वेदश्रुति ह्या साक्षात् आपले वरदहस्त पुढें करून बसल्या आहेत! वाः! काय या मठाची योग्यता! हें रम्य स्थळ केवळ प्रतिबदरिकाश्रमच होय. संसारदुःखानें गांजलेले, नाना विपत्तींनीं रंजीस आलेले, आणि महदपराध करून संतप्त झालेले पापात्मे यांस या मठांत येण्याबरोबर स्वस्थितीचा व स्वकृत कर्मांचा खेद व पश्चात्ताप होऊन ते म्हणतात, "जळो तो संसार! पुरे ती यातायात! आग लागो त्या धनाला! आतां सर्वसंगाचा परित्याग करून या वैराग्यनिधिमठांतच निरंतर वास करूं."

बाजीरावाच्या छावणीचें रेखाटलेलें खालील चित्र पहा.

"ते गुलाबी थंडीचे दिवस होते. आंब्यांच्या झाडावर पाचेसारखे हिरवेगार राघू चिंव चिंव करीत होते, व इतर पक्ष्यांचा किलकिल शब्दहि मधून मधून चालला होता. जिकडे तिकडे हिरवेंचार गवत व दूर्वांचीं बेटें वाढलीं होतीं. झाडाखालीं पानांच्या फटींतून उन्हाचे लहान लहान असंख्य कवडसे पडले होते. त्या जणूं वाटोळया, लांबोळ्या व बदामी वगैरे घाटाच्या आरशाच पसरून ठेविल्या आहेत असा भास झाला. दरबारच्या तंबूवर विस्तारयुक्त पांच वडांची दाट छाया होती. त्यांच्यावर अनेक रंगांचे व अनेक जातींचे पक्षी बसून शब्द करीत होते. वारा सोसाट्यानें भणभण वाही, तेणेंकरून झाडांचीं पानें फणफण वाजत, व खालीं जमिनीवर उन्हाचे कवडसे पडले होते, ते झराझर मागेंपुढें हेलकावे खात. त्या समयीं ती पांच वडांची गजबजलेली जमीन थरारत आहे कीं काय असा भास होई. पलीकडे कांहीं अंतरावर शाळूचीं शेतें वाढलीं होतीं. त्यांतच तीळ व करडई पेरली होती. त्याजवर पिंवळीं व तांबूस वर्णांचीं फुलें फुललीं होतीं. त्यांच्यापुढें कांहीं अंतरावर कृष्णानदीचें स्वच्छ काळेंभोर पाणी संथपणें वाहत होतें. पलीकडे पांडवगड व दुसरे डोंगर हिरवेगार दिसत होते. त्यांच्या आसपासची सर्व जमीन हिरव्या रंगानें रंगभूमीसारखी चमकत होती. गांवाच्या पाणवठ्याजवळ एक चिमणबाग होता. तेथें लिंबाच्या झाडांवर कांहीं हिरवीं, कांहीं पाडास आलेलीं व कांहीं पिवळीं जर्द कागदी लिंबें लटकलीं होतीं. गाजरें, रताळीं, भुईमूग व हुरडा खाऊन गाजरासारखीं लाल गुराख्याचीं पोरें हिंडत होतीं. तीं आपल्या गुरांस पाणी पाजून पावा वाजवीत घराकडे हांकीत चाललीं, तेव्हां वासरांच्या ओढीनें गाई शेपट्या चंवरीसारख्या वर धरून चौखुरी उड्या टाकीत हंमा करीत गांवाकडे धांवत चालल्या होत्या. मस्त पोळ, गुराख्यांचे टोणपे खात होते. तरी नीट न जातां आडवे तिडवे पळत होते. यामुळें त्यांच्या मागून धांवतां धांवतां कांहीं गुराख्यांचें सर्वांग घामानें पाघळत होतें. एक पोर एका म्हशीला बदाबद काठीनें झोडपूं लागलें, तेव्हां ती रागानें उलटून त्याच्या आंगावर धांवली, तेव्हां तें भितरें पोर घाबरून

मागें कुंपणांत पडलें. कांटे लागून त्याच्या आंगाचे लोंचके निघाले. हें पाहून त्याला बाजीरावानें तत्काळ काढवून आपल्या अंगावरचें धोतर देऊन त्यास घरीं लावून दिलें. एक शिपाई भाकर सोडून चटणीकांद्याशीं खात बसला होता, इतक्यांत तेथें एक भिकारी म्हातारी बाई काठी टेंकीत टेंकीत येऊन गयावया करून तुकडा मागूं लागली. शिपाई भुकेनें व्याकुळ झाला होता, म्हणून तिला त्यानें बरेंच झिडकारिलें; व तिची काठीहि हिसकावून घेतली, तरी ती जाईना. तेव्हां तो इतका संतापला, कीं त्या सटवीला उभी चिरावी असें मनांत आणून त्यानें आपल्या तरवारीला हात घातला. बाजीरावाची तिकडे नजर गेली. मग त्यानें तिला जवळ बोलावून तिच्या हातावर दोन रुपये टाकले, तेव्हां ती त्याच्या पायां पडून त्याला आशीर्वाद देऊन चालती झाली.

साध्या वनभोजनांत जी गंमत आहे, ती राजवाड्यांतील पंचपक्वान्नी मेजवानींतहि नाहीं. कोठें चपातीभात, कोठें खीरपुरी, कोठें चटणीभाकर, कोठें कांदाभाकर, कोठें नुसती बाजरीची गोड भाकर, तिला झुणका आहे आहे, नाहीं नाहीं, कोठें नाचण्याची लाल भाकर, हुलग्याची तांबडी उसळ, तांदुळजाची रानभाजी आणि उडदाचें पातळसें कढण, असा त्या तळावर जिकडे तिकडे जेवणाचा थाट उडालेला होता. भूक चरचरीत लागून पोटांत कावळे कोरूं लागले म्हणजे नुसता कोंडाहि मांड्यापेक्षां गोड लागतो. ओलीकोरडी भाकर खाऊन वर कृष्णेचें गोड पाणी वर तोंडें करून घटाघट प्याले, तेव्हां कित्येकांच्या कानानाकांत पाणी शिरून ते फडाफड शिंकलें, कांहीं लोक न्याहारी करून नदीच्या कांठीं घाईघाईनें ओंजळीनें पाणी पिण्यास चालले, तेव्हां घोड्यांच्या पायबंदांत व तंबूंच्या तणावाच्या दोरांत पाय अडखळून सपशेल पडले. हा तमाशा पाहून भोंवतालचे लोक खदखदां हंसूं लागले. आजारी होते, त्यांस बाजीरावानें जवळ उभा राहून अळेंबळें लिंबाइतका भात चारविला. बिनीवरच्या लोकांस रात्रीं आलोचन जागरण झाल्यामुळें ते झाडांच्या बुंध्यांशीं घोंगड्या टाकून घोरत पडले होते. त्यांपैकीं एकाच्या पायास जखम झाली होती, तेथें माशा घोंगावत होत्या. त्या जखमेवर आपल्या हातानें हळूंच झांकण घालून बाजीराव पुढें

चालला. पुढें एक जण हातावर हुरडा चोळून फक्या मारीत बसला होता, त्याच्या खाण्यापिण्याची बाजीरावानें चौकशी केली. तेव्हां तो म्हणाला, ‘ सरकार, ओलेंकोरडें जसें मिळेल तसें खाऊन धन्याची निमकहलाल चाकरी करावयाची एवढें आम्हांला ठाऊक. हे पाय काय ते आम्ही जाणतों. दुसरें तिसरें कांहीं आम्हीं जाणत नाहीं. ’ असा समाचार घेत घेत जेथें त्याचे बसावयाचे घोडे ठाणबंदी केले होते, तेथें तो आला. घोड्यांनीं लगेच आपल्या धन्यास ओळखून, खाणें टाकून, कान टवकारून व शिडें वर धरून ते प्रेमानें खिंकाळूं लागले. जवळ येऊन आपल्या आंगावरून प्रेमानें हात फिरवावा, पुठ्यावर थापटावें व चुचकारावें म्हणून ते जमिनीवर टापा मारूं लागले, व खुरांनीं जमीन खणूं लागले. मग जवळच हिरवीगार कोंवळी हरळी दाट उगवली होती, ती बाजीरावानें आपल्या हातानें उपटून पदरांत घेऊन दिलप्यारा, लालप्यारा, सारंगा, जरदानट अशीं नांवें घेऊन त्यांच्या तोंडांत मूठ मूठ हरळी देऊन त्यांच्या पाठी थोपटून, त्यांच्या तोंडांवरून ममतेनें हात फिरवून, प्रेमानें मुके घेऊन तो निघाला. तेव्हां त्या मुक्या पण शहाण्या जनावरांचें समाधान होऊन ते फुरफुरूं लागले.

जरा पुढें चालला, तों समोरून एक मोठा मस्त रेडा नाक फेंदारून सों सों करीत बाजीरावाच्या आंगावर धांवून येत आहे, असें पाहून होळकरानें त्याच्या नाकाडावर आपल्या सोट्याचा असा जोरानें रट्टा मारिला, कीं त्याबरोबर तो कोलमडून खालीं पडला. त्या वेळेस कांहीं लोक तेथें विस्तव पेटविण्याकरितां काटकें गोळा करीत होते, ते सूं पळाले, व कांहीं शिपाई आपल्यापुढें आरशा ठेवून कंगणीदार पागोटें बांधीत होते त्यांची धांदल उडाली. पुढें कांहीं ठिकाणीं बोथाटी फिरविणें, निशाण मारणें, घोड्यास मंडळावर धरणें व कुस्त्या खेळणें, हीं कामें चाललीं होतीं, तींहि त्यानें क्षणभर उभें राहून पाहिलीं.

त्या दिवशीं गोविंदा शागिर्दास बराच वेळ सांपडल्यामुळें त्यानें जेवणाचे चार पदार्थ जास्त केले. केळीच्या लांब लांब आगोतल्या मांडून, त्यांवर दोन भाज्या, दोन चटण्या, कोशिंबिरी, आमटी, भात, वरण, लोणकढें

तूप, चपाती, ताकतव वगैरे पदार्थ केलेले वाढले. अशा थाटानें कांहीं सरदारांस पंक्तीस घेऊन बाजीरावानें पाचवडास वनभोजन केलें. भोजनोत्तर बाजीराव व आपा बुद्बळांचे चार डाव खेळले. एका बाजूस शिंदा व दुसरे बाजूस होळकर बसून त्यांनीं आपापल्या पक्षास डाव सांगितला. करमणुकीकरितां घटकाभर ही त्यांची लुटुपुटूची लढाई झाली. बुद्बळें लाकडाचीं खरीं, पण खेळणारांस खेळतांना खऱ्या लढाईसारखा अंगीं आवेश येत असतो. हा अकलेचा खेळ आहे म्हणून त्याला ‘बुद्धिबळ’ हें नांव यथार्थ दिलें आहे.”

बापटांचा पिंड इतिहासकाराचा नसून कादंबरीकाराचाच विशेषत्वानें होता.

‘बाजीराव पेशवे’ यांच्या चरित्राइतकेंच गाजलेलें बापटांचें दुसरें पुस्तक ‘पानिपतची मोहिम’ हें होय. मराठ्यांच्या इतिहासांतील चिरस्मरणीय अशा प्रसंगावर लिहिलेली ही ऐतिहासिक कादंबरी आहे. इंग्रजींतील ‘लालन दी बैरागन’ या कादंबरीचा आधार घेऊन व त्यांत पानिपतसंबंधीं बखरी वगैरेंतून मिळणाऱ्या माहितीचा उपयोग करून ही कादंबरी रचली आहे. या ऐतिहासिक कादंबरीसंबंधींची आपली भूमिका, तिच्या सोळाव्या प्रकरणांत त्यांनीं पुढीलप्रमाणें स्पष्ट केली आहे. “ऐतिहासिक कादंबरीकार हाहि एक प्रकारचा इतिहासकारच होय. कांहीं गोष्टी वर्णनीय असून विस्तारभयास्तव अथवा अन्य कारणांस्तव इतिहासकाराला अजीबाद सोडून द्याव्या लागतात. त्याच गोष्टी आधाराला घेऊन ऐतिहासिक कादंबरीकार आपली ऐतिहासिक इमारत उभी करितो. तत्कालीन लोकस्थिति, तत्कालीन देशस्थिति, तत्कालीन आचार-विचार व तत्कालीन रीतिरिवाज, तो आपल्या ग्रंथांत ग्रथित करितो. तात्पर्य, इतिहासांतील न्यूनता परिपूर्ण करण्याविषयीं त्याचा प्रयत्न असतो; परंतु, अशा नमुन्याच्या ऐतिहासिक कादंबऱ्या मराठी भाषेंत फार थोड्या आढळतात. किंबहुना, नाहींत म्हटलें तरी चालेल. हिंदुस्थानच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहासांत, शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, इत्यादि नवरसांनीं परिप्लुत असे विषय बरेच आढळतात. त्यांजवर अनेक कादंबऱ्या व नाटकें रचितां येतील; परंतु आपल्या देशांत अद्यापि,

हिंदु 'सर वॉल्टर स्कॉट' किंवा हिंदु 'शेक्सपीयर' निपजूं लागले नाहींत, तरी कालांतरानें ते निपजतील अशी आशा आहे. तोंपर्यंत, दुधाची तहान ताकानें भागवावी, असें मनांत आणून, हें पुस्तक लिहिण्याचें काम हातीं घेतलें आहे." या कादंबरीची पृष्ठसंख्या ६०० हून अधिक आहे. बापटांनीं कादंबरीसाठीं निवडलेला प्रसंग, "कवींच्या स्फूर्तिनिर्झराला अक्षय्य वाहाव-याला लावणारा एक अलौकिक प्रसंग होय ! कोण्या तत्कालीन कवीनें आपल्या प्रतिभेची चमक या प्रसंगावर पाडली असती तर त्या काव्याला आणि कवीला महाराष्ट्रीयांच्या हृदयांत निरंतरचें मानाचें आसन मिळालें असतें ! आमचे मयूर पंडित याच काळांत कर्णार्जुनांचे जुने पराक्रम आपल्या अनुपम काव्यकौशल्यानें वर्णीत होते. कोणी असाच दुसरा पंत पानिपतच्या वांट्याला आला असता, तर त्या योगानें आपल्या सर्वांची पत आजमित्तीला शतपटीनें वाढली असती ! या अशाच प्रेरणांचे धक्के मनास बसून बापट यांनीं हा रसोत्कर्षक प्रसंग वर्णनास घेतला असावा. बापट हे कुशल कादंबरीकार होते यांत संशय नाहीं. त्यांची वर्णनशैली अत्यंत चटकदार, मार्मिक व परिणाम-कारक आहे. निरनिराळ्या भावनांची मुद्रा आपल्या वाचकांच्या अंतःकरणावर पक्की ठोकून उठविण्यांत त्यांनीं चांगलें यश मिळविलेलें दिसतें. आमच्या म्हणण्याचे पुष्टयर्थ आम्ही प्रस्तुत कादंबरींतील (आ. दुसरी) पृष्ठ ५३, ८५, ४२७, ४७२ वगैरे अनेक स्थळांकडे बोट दाखवूं. भाऊसाहेबांचा बडा दरबार– पृ. १६५–७२ किंवा खुद्द युद्धाची धुमश्चक्री किंवा निरनिराळे सरदार यांचीं वर्णनें, तसेंच पहांटेचीं, रात्रीचीं, झाडीचीं, बागांचीं, मठांचीं, अंतःपुराचीं, द्वंद्वाचीं, मसलतीचीं, दंग्यांचीं, पलायनाचीं, युद्धाचीं, छावणीचीं, स्वारीचीं, इमानदारीचीं, दुष्मानदारीचीं, शोकाचीं, वीरश्रीचीं, भोळेपणाचीं, खंबिरीचीं, खुबसुरतीचीं, विक्राळपणाचीं, कोंवळेपणाचीं, रानदांडपणाचीं वगैरे अनेक वर्णनें प्रसंगानुरोधानें बापट यांनीं ग्रंथांत मोठ्या समर्पकतेनें व चतुरपणानें केलेलीं आहेत. घोड्यांची कानकळाशी, किल्ल्याची गोठवण, गोळ्यांची श्रावणझड, स्वारांची रवण इत्यादि मार्मिक शब्दयोजना; किंवा 'सुभेदार उदाच्या ढिगासारखे आहेत', 'कल्ल्यांचीं शेतें पिकविलीं होतीं', 'अंगावरची लव दिसते न दिसते तोंच', अशीं खुबीदार वर्णनें हीं कादंबरीकार आपलें कलम

किती सफाईनें चालवीत आहे याचे उत्कृष्ट पुरावे होत. सातरंग, तुरकी वगैरे घोड्यांच्या चाली; सरस्वतिबीन, खंजिरी, मंजिरी वगैरे गायनसामुग्री; धोप, कडाबीन, सांग वगैरे हत्यारें इत्यादिकांची माहिती ग्रंथकर्त्यानें परिश्रमानें मिळवून तिचा वर्णनाचे कामीं योग्य उपयोग केला आहे. लखनूर वगैरे स्थळीं आपण केलेला प्रवास, नारायणसिंग हजारी वगैरे सारख्यांपासून पाहण्यांत आलेले चमत्कार, मुक्तेश्वरादि मराठी कवी व कालिदास चंपूकारादि संस्कृत कवी यांच्या ग्रंथवाचनानें आलेलें चातुर्य याचाहि ग्रंथकारानें, कृत्रिमतेचा दोषहि क्वचित् अंगीं लागला तरी तो सहन करून, उपयोग करून घेतला आहे. पुरुषोत्तम कवीच्या शिवकाव्यासारखें संस्कृत काव्यसुद्धां येणेंप्रमाणें त्यास लाभदायक झालें आहे. शाहिरी पोवाडे म्हणजे मराठी बाण्याचा आरसा. त्याचीहि लज्जत ग्रंथकारानें वाचकांस दाखविली आहे (पृ. ३२६). ग्रंथकारास एक नवीन पोवाडा मिळाला तोहि (पृ. ५९६) त्यानें आस्थेनें आपले ग्रंथांत दाखल केला आहे. साधेल तेथें प्रस्तुत परिस्थिती-विषयीं आपल्या विचाराचें ओझरतें दिग्दर्शनहि त्यानें केलें आहे." *

बापटांनीं या कादंबरी व्यतिरिक्त 'छत्रपति संभाजी महाराज अथवा राजाचें दुष्कर्म राजाला भोंवतें आणि प्रजेलाहि भोंवतें'; 'चितूरगडचा वेढा' अशा दोन छोट्या ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. पहिली 'पानिपतची मोहीम' हिच्या आधीं तेरा वर्षें व दुसरी 'मोहिमे'नंतर दोन वर्षांनी लिहिली. 'संभाजी' कादंबरी संभाजी महाराजांच्या चरित्रावर, मराठ्यांच्या राज्यकारकीर्दीवर लिहिलेले इंग्रजी इतिहासग्रंथ, मराठी बखरी व दंतकथा यांच्या आधारानें लिहिलेली आहे. या कादंबरीला, जव्हार संस्थानचे अधिपती श्री. पतंगशहा विक्रमशहा यांनीं उंची पोशाकासह एक मोठी रक्कम बक्षिस दिली होती.

बापट यांनीं कादंबरीलेखनास ज्या कालांत सुरुवात केली त्या कालांतील कादंबरीलेखकांचा ओढा, वास्तवतेपेक्षां रम्याद्भुततेकडेच अधिक होता. कादंबऱ्यांना पौराणिक, ऐतिहासिक किंवा सामाजिक असें जरी म्हटलें जात होतें तरी त्यांतील स्थल, काल व व्यक्ती पौराणिक, ऐतिहासिक किंवा

* द्वितीयावृत्तीची प्रस्तावना; प्रो. द. वा. पोतदार

सामाजिक सत्याला धरून असतच असेंहि नाहीं. मुख्यतः मनोरंजन आणि जातां जातां सहज साधला तर उपदेश, असेंच सामान्यतः लेखकांचें धोरण असे. या धोरणाला थोडीशी कलाटणी 'मोचनगड' कर्ते गुंजीकर व नागेशराव बापट यांनींच प्रथम दिली. हे दोघेहि विद्वान व इतिहासाचे डोळस अभ्यासक असल्यामुळें इतर समकालीनांप्रमाणें ऐतिहासिक सत्याचा विपर्यास सहसा होऊं न देण्याची त्यानीं बरीचशी दक्षता घेतली. त्यांच्या काळांत जी कांहीं ऐतिहासिक साधनसामुग्री उपलब्ध होती ती, व परंपरेनें कानावर आलेल्या कथा यांच्या आधारावर कथानकाचा सांगाडा तयार करून व त्यांत आपल्या कल्पनेनें मालमसाला भरून त्यांनीं भूतकालीन प्रसंगांचीं व व्यक्तींचीं चित्रें वर्तमानकालीन समाजापुढें ठेविलीं. आज, इतिहाससंशोधकांच्या प्रचंड परिश्रमांमुळें विपुल ऐतिहासिक साधनें उपलब्ध झालीं आहेत. त्यायोगें, ऐतिहासिक व्यक्ति, प्रसंग व घटना यासंबंधींच्या रूढ समजुती व कल्पना बदलणें प्राप्त झालें आहे. बापटांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या, ही गोष्ट लक्ष्यांत ठेऊनच वाचल्या पाहिजेत. 'छत्रपती संभाजी महाराज' या कादंबरींतील तुळशीबाई, शहाजादी रोशनार, या कथानकांत काव्यात्मता निर्माण करणाऱ्या पात्रांना इतिहासाचा मुळींच आधार नाहीं. या पात्रांना हाताशीं धरून संभाजीची रंगविलेली जीवनसृष्टी काल्पनिक आहे. तिला सत्याचा आधार नाहीं. औरंगजेबाची जी एक मुलगी शिवाजी व संभाजी यांजबद्दल विशेप सहानुभूतीनें पाहतांना आढळते, तिचें नांव झीनतुन्निसा बेगम असें होतें. या बेगमेचा संभाजीशीं साक्षात् संबंध कधींहि आला नाहीं. औरंगजेबाविरुद्ध संभाजीस हाताशीं धरून महाराष्ट्रांत कांहीं वर्षे राहून कारस्थान करीत असलेल्या तिच्या भावामुळें–अकबरशहा–अप्रत्यक्षपणें राजकीय पत्रव्यवहारांतून आला असेल तेवढाच. प्रणयाचा त्यांत लवलेशहि नव्हता. संभाजीच्या वधानंतर शाहू व त्याची आई येसूबाई यांचा तिनें उत्तम प्रकारें परामर्श घेतला व पुढें त्यांना सुखाचे दिवस दाखविले. हें तिचें करणें, संभाजीबद्दलच्या अनुरागाचें द्योतक होतें असें अनेक कवींनीं व कादंबरीकारांनीं मानलें आहे. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. तिच्या अंतः करणांत वसत असलेल्या बापाच्या स्वभावाशीं विसदृश असें– उच्च दर्जाच्या माणुसकीचें तें द्योतक होतें.

बापटांची तिसरी ऐतिहासिक कादंबरी 'चितूरगडचा वेढा' ही होय. इ. स. १५६७ त अकबर बादशहानें चितुरगडास वेढा दिला तो प्रसंग यांत वर्णिला आहे. "पूर्वी रजपूत लोकांत कित्येक अवर्णनीय पुरुष व स्त्रिया होऊन गेल्या. त्यांनीं आपल्या देशाचें वैभव राखण्यासाठीं काय काय केलें, त्यांच्या अंगीं देशाभिमान व कुलाभिमान कसा सोज्ज्वल रीतीनें वास करीत होता, स्वातंत्र्य कायम राखण्यासाठीं त्यांचें मन कसें स्फुरत होतें, ममत्व टाकून स्वदेशहितार्थ आपलें तन-मन-धन कसें अर्पण करीत आणि अश्रांत श्रम घेत, इत्यादि गोष्टी या पुस्तकापासून वाचकांनीं ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. नुसतें लढाईचेंच वर्णन दिल्यानें वाचकांची तृप्ति होणार नाहीं असें समजून, अकबरशहा व त्याचे प्रतिस्पर्धी रजपूत लोक यांचा थोडासा वृत्तांत या पुस्तकाच्या आरंभीं व शेवटीं देऊन मध्यें चितूरगडच्या लढाईचें वर्णन दिलें आहे. तें जितकें भरपूर व साधार देववेल तितकें दिलें आहे. प्रसंगविशेषीं व स्थलविशेषीं, कोठें पोक्त, उदात्त व उन्नत विचार; कोठें कोटिक्रम व नम्र परिहास; व कोठें शब्दप्रहार आणि सत्यनिरूपण, हे प्रकार पाहण्यांत येतील, पुस्तकाची भाषासरणी जितकी साधी, गंभीर, सालंकृत, सुबोध व सुरस करवेल तितकी केली आहे. यांत मुख्य वीर व भयानक रसांचेच प्रसंग भरले आहेत. क्वचित् स्थलीं शृंगाररसाचीहि थोडीशी झांक दिसून येईल."

बापट यांच्या वरील पुस्तकांव्यतिरिक्त 'राजगुरु दादोजी कोंडदेव आणि छत्रपति शिवाजी महाराज,' 'श्रीमन्महाराणी जमनाबाईसाहेब गायकवाड चरित्र,' 'सुरस वाक्यरत्नावलि,' 'लिर्कलेअर चरित्र, 'सुभद्राहरण', अशीं आणखी पांच पुस्तकें आहेत. पहिलें निबंधात्मक स्वरूपाचें असून, त्यांतील "विषय, इतिहास, वृद्धपरंपरेनें चालत आलेल्या गोष्टी व कित्येक इंग्रजी आणि मराठी ग्रंथ यांच्या आधारानें लिहिला आहे. एवढें मात्र कळविणें भाग आहे कीं, 'दादांचा उपदेश' (भाग २ रा) हा अस्सल उपदेश नव्हे, व तसा आपल्या देशांत मिळण्याचा संभवहि नाहीं. शिवाजी महाराजांच्या अंगीं स्वदेशोद्धाराचा अंकुर आहे असें पाहून दादांनीं आपल्या अंतकाळीं त्यांस पुढें उपयोगीं पडण्यासारखा उपदेश केला, अशी इतिहासप्रसिद्ध गोष्ट आहे. तोच प्रसंग पायाला घेऊन त्याजवर राजेरजवाडे व इतर सर्व लोक यांस

उपयोगीं पडण्याजोगा हा उपदेश रचिला आहे." या पुस्तकाच्या आठ आवृत्त्या निघाल्या, यावरून तें किती लोकप्रिय झालें होतें याची कल्पना येते. दुसरें, श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या दत्तक आई व खंडेरावमहाराज गायकवाड यांच्या पत्नी जमनाबाईसाहेब गायकवाड यांचें १३२ पृष्ठांचें एक छोटें चरित्र आहे. 'चौकसपणा, देश-कालवर्तमान ध्यानांत आणून तदनुसार आपल्या कृतीचें धोरण बांधण्याचें सामर्थ्य, धैर्य, कर्तबगारी, कंटकपणा, साधी रीत, सरळ आणि प्रसंगास अनुरून असें भाषण करण्याची संवय, थोडीशी विद्या आणि बहुश्रुतपणा,' असे वाखाणण्यासारखे गुण अंगीं असलेल्या एका कर्तबगार राजस्त्रीचें लिहिलेलें हें मार्मिक चरित्र आहे.

**वाङ्मय :**

(१) टिटवी; [जैमिनी अश्वमेधाच्या आधारें]; १८९३; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(२) चितूरगडचा वेढा; १८९९; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(३) छत्रपति संभाजी महाराज अथवा राजाचें दुष्कर्म राजाला भोंवतें आणि प्रजेलाहि भोंवतें; [कथाकाल १६८०–८९]; प्र. आ. १८८४, द्वि. आ. १८८८; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(४) पानपतची मोहीम; १८९७, प्रकाशक–दा. सा. यंदे; १९२५, सरस-वाङ्मयरत्नमाला, पुणें.

(५) श्रीमंत बाजीराव बल्लाळ उर्फ पहिले बाजीरावसाहेब पेशवे; १८७९, १८८६; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(६) राजगुरु दादोजी कोंडदेव आणि छत्रपति शिवाजी महाराज; द्वि. आ. १८८३, आठवी आवृत्ति १९३१; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

(७) श्रीमंत महाराणी जमनाबाईसाहेब गायकवाड यांचें चरित्र; १९००; प्रकाशक : दा. सा. यंदे.

(८) सुरस वाक्यरत्नावलि.

(९) लिकॅलेअर चरित्र.

(१०) सुभद्राहरण, [ यांत सुभद्राहरणाची गोष्ट सांगून, एकंदर कथानकाचें सांप्रतच्या लोकस्थितीस जुळण्याजोगें स्पष्टीकरण केलें आहे ]; १८९२; निर्णयसागर छापखाना, मुंबई.

**बापट, विष्णु वामन** [ १८७१-१९३२ ] श्रीशंकराचार्यांच्या ग्रंथांचे व इतर धार्मिक पुस्तकांचे भाषांतरकार. रत्नागिरी जिल्ह्यांतील राजापूर तालुक्यांतील धाऊलवल्ली गांवीं यांचा जन्म झाला. यांचे वडील वामनभटजी वैदिक व दशग्रंथी होते. वडील लहानपणीं वारल्यामुळें विष्णुशास्त्र्यांचें प्राथमिक शिक्षण रामदुर्गास त्यांच्या आश्रयाखालीं व इंग्रजी शिक्षण त्यांचे मामाचे उत्तेजनानें शिरोळ व मिरज येथें झालें. मध्यंतरीं शिक्षण सोडून नाटक कंपनींत गेल्यामुळें इंग्रजी पांच इयत्तांपुढें यांची मजल गेली नाहीं. नाटक कंपनीचा संबंध चार महिन्यांतच सुटला व ते 'गव्हर्मेंट टेलिग्राफिक क्लास'मध्यें शिक्षण घेण्यास पुण्यास राहिले. येथील शिक्षणक्रम पुरा होतांच त्यांनीं सदर्न मराठा रेल्वेंत नोकरी धरली. या नोकरींत असतां कांहीं विद्याव्यासंगी मंडळींशीं त्यांचा परिचय घडून येऊन, त्यास वाचनाचा नाद जडला. शालेय शिक्षण आपणास जरी नीट मिळूं शकलें नाहीं तरी, वाचनानें आपण आपलें ज्ञान वाढवूं शकूं अशी त्यांस उमेद वाटूं लागली. त्यांचें जसजसें वाचन वाढूं लागलें तसतसें आपण लेखक व्हावें असें त्यांस वाटूं लागलें. आणि त्या दृष्टीनें त्यांनीं आपला व्यासंग चालविला.

'मराठींत चांगला ग्रंथकार होणारास संस्कृत भाषा चांगली अवगत असली पाहिजे' अशा अर्थाचें चिपळूणकरांच्या निबंधमालेंत एक वाक्य आहे. तें लक्ष्यांत बाळगून, चांगला लेखक व्हावयाचें तर, आपण संस्कृत भाषेचा अभ्यास केला पाहिजे असें त्यांच्या मनानें घेतलें व ते भांडारकरांच्या पुस्तकांवरून संस्कृतचा अभ्यास करूं लागले. हा अभ्यास त्यांनीं प्रारंभीं स्वावलंबनपूर्वकच चालविला होता. पुढें त्यांनीं सदर्न मराठा रेल्वेमधील नोकरी सोडून, बी. एन्. रेल्वेंत नोकरी धरली व तीहि कांहीं दिवसांनीं सोडून नॉर्थ वेस्टर्न रेल्वेंत कराचीस केबिनवरील सिग्नलरचें काम ते करूं लागले. येथें असतांना डी. जे. सिंध कॉलेजमधील संस्कृतचे अध्यापक हरि लक्ष्मण लागू यांच्याशीं परिचय घडून येऊन, त्यांचे हाताखालीं संस्कृतचा अभ्यास पद्धतशीरपणें

करण्याची त्यांस संधी मिळाली. लागूंकडून त्यांनीं ‘ अष्टाध्यायी ’ व ‘ सिद्धान्त कौमुदी ’ समजून घेतली. ह्या संस्कृताचा अभ्यास चालू असतां प्रसिद्ध जर्मन पंडित डॉयसन यांचें ‘ शांकर तत्त्वज्ञाना ’वरील व्याख्यान त्यांस ऐकावयास मिळालें. या व्याख्यानांत, ‘ शांकर वाङ्मय ज्यानें वाचलें नाहीं त्याचें जीवित व्यर्थ ’, असे त्याच्या तोंडून निघालेले उद्गार ऐकून यांस शांकर तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्याची तळमळ लागली. ही तळमळ निववण्यासाठीं त्यानीं श्रीक्षेत्र वाई येथें त्यावेळेस वास्तव्य करीत असलेले श्रीप्रज्ञानंदसरस्वती यांचा आश्रय घेतला. एक वर्षाची बिनपगारी रजा घेऊन, त्यांनी स्वामिजींकडे प्राचीन पद्धतीनें अध्ययनास सुरुवात केली सुमारें अकरा महिने गेल्यानंतर, ‘ प्रस्थानत्रयीचा अर्थ ग्रहण करण्याची पात्रता आतां तुमच्यामध्यें आलेली आहे. पुढील ग्रंथांचें श्रवण करण्याची आवश्यकता नाहीं. ते तुम्हांला कोणाच्या साह्यावांचूनच समजूं लागतील;’ असा आशय स्वामीजींनी प्रगट केल्यावरूनच त्यांनीं वांई सोडली व पुन्हां रेल्वेमध्यें ते नोकरी करूं लागले पण त्यांचें चित्त तेथें ठरेना. आपण यापुढें ग्रंथाध्ययन व ग्रंथलेखन हाच पेशा स्विकारावा, त्यांतच समाधान मिळेल असें त्यांस वाटूं लागून त्यानीं नोकरीला राम राम ठोकून मुंबईस प्रयाण केलें. मुंबईंतील त्यावेळचे एक प्रसिद्ध प्रकाशक दामोदर सावळाराम यंदे यांनीं त्यांस जवळ करून, त्यांजकडून धार्मिक ग्रंथांचीं भाषांतरें करून घेतलीं. मुंबईस लेखनाबरोबरच त्यानीं आनंदगिरीच्या टीकेसह प्रस्थानत्रयभाष्याचें अध्ययन स्वतःच्याच मेहनतीनें चालू केलें व प्रभुत्व मिळविलें.

१९०३ चे अखेरीस त्यांचे हितचिंतक प्रो. लागू यांच्या शिफारशीवरून सिंध हैद्राबाद येथील गिडुमल संस्कृत पाठशाळेंत त्यांची शास्त्री म्हणून नेमणूक झाली. या पाठशाळेचा संस्कृत ग्रंथसंग्रह फार मोठा होता. त्याचा त्यांना चांगलाच उपयोग करून घेतां आला. अध्यापनाचें काम संभाळून त्यांनीं येथें बरेंच लेखन केलें. पंचदशी, सांख्यतत्त्व कौमुदी, तत्त्वानुसंधानसार, बृहद्योगवासिष्ठसार, कथासरित्सागर इत्यादि ग्रंथांचीं भाषांतरें लिहून तीं यंदे आणि मंडळीस त्यांनीं दिलीं; त्याचप्रमाणें वांई येथील पुराणप्रकाशक मंडळीलाहि अनेक पुराणांचीं भाषांतरें करून दिलीं. १९१२ सालपर्यंत शास्त्रीबुवा हैद्राबादेस होते.

पुढें, आपण पुणें येथें स्थायिक होऊन स्वतंत्रपणें ग्रंथप्रकाशनाचा व्यवसाय करावा असें ठरवून त्यानीं सिंध सोडलें. पुण्यास आल्यावर त्यानीं 'ब्रह्मविद्या-ग्रंथ रत्नमाला' व 'दर्शनमाला' अशा दोन माला सुरू केल्या. त्यानंतर एक वर्षानें त्यानीं 'आचार्य' नांवाचें पाक्षिक (१९१४) सुरू केलें. १९१८ चे सुमारास सर विठ्ठलदास ठाकरसी यांच्याशीं त्यांचा परिचय घडून येऊन, त्यांस व त्यांच्या पत्नीस गीता व वेदान्त समजून देण्याची कामगिरी त्यांजकडे आली. ठाकरसी घराण्यांशीं त्यांचा हा संबंध अखेरपर्यंत राहिला, व त्यामुळें त्यांस ग्रंथलेखनास हवें असलेलें स्वास्थ्य मिळूं शकलें. त्यांच्या नांवावर आज जी प्रचंड ग्रंथसंख्या दिसते तिचें बरेंचसें श्रेय ठाकरसी घराण्याकडून मिळालेल्या आश्रयालाच द्यावें लागेल.

विष्णुशास्त्री हे कडवे शांकरमतानुयायी होते. श्रीशंकराचार्यांच्या ग्रंथांचें भाषांतर करूनच ते थांबले नाहींत तर त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसारासाठीं 'आचार्यकूल' नांवाची संस्थाहि त्यानीं स्थापन केली.

शास्त्रीबोवांनीं स्वतंत्र असें ग्रंथलेखन जरी केलेलें नसलें तरी त्यानीं जें भाषांतरित प्रचंड वाङ्मय निर्माण केलें आहे तें खास कमी मोलाचें नाहीं. मराठी वेदान्तविषयक वाङ्मयांत त्यानीं फार मोठी भर घातली. आणि तीहि एकट्या व्यक्तीनें—कोणाचेंहि विशेष साहाय्य न घेतां—ही विशेष कौतुकाची गोष्ट आहे.

**वाङ्मय:**

(१) श्रीतर्कसंग्रहसार—(मूळासह); १९१४; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.
(२) जैमिनि—पाणिनिदर्शनसार (समतभेद); १९१४; इंदिरा छापखाना, पुणें.
(३) शांकरभाष्यानुसार सुबोध भगवद्गीता [मूळ श्लोक, अन्वयार्थ, स्पष्टीकरण व अवतरणें यांसह]; १९३२; इंदिरा छापखाना व आनंद छापखाना, पुणें.
(४) श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थ, [मूळ श्लोक, अन्वयार्थ, शांकरभाष्य, शब्दशः भाष्यार्थ आणि गीतारहस्य परीक्षणात्मक विस्तृत टीपा, कोश यांसह]; इंदिरा छापखाना, पुणें.

(५) सान्वयार्थ बालबोधिनी श्रीभगवद्गीता, [सारांश व मथितार्थ यांसह]; १९२१; श्रीसिद्धेश्वर छापखाना, कोल्हापूर.

(६) शांकरभाष्यानुसार गीतारहस्य; १९१४; इंदिरा छापखाना, पुणें.

(७) तत्त्वानुसंधानसार; [ नैयायिकांचें व सांख्यांचें खंडन, माधवानंदांच्या ग्रंथाधारें ]; १९०९; इंदुप्रकाश छापखाना; मुंबई.

(८) वेदान्तपरिभाषार्थ, [ मूळ, अर्थ व विवरण यांसह आणि वेदान्त शब्दकोश ]; १९३३; आनंद छापखाना, इंदिरा छापखाना, पुणें.

(९) श्रीमत्सदानंदप्रणीत वेदान्तसार याचें मराठी भाषांतर, [ मूळ संस्कृतासह ]; १९०६; शारदाक्रीडन छापखाना, मुंबई.

(१०) जीवन्मुक्तिविवेकसार; संक्षेप; १९०९; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(११) श्रीमद्विद्यारण्यमुनिप्रणीता पंचदशी–भाग १ ला; [ मूळ संस्कृत व सान्वयार्थ महाराष्ट्र विवरण ]; १९०४, १९२९; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(१२) श्रीमद्भारतीतीर्थप्रणीता पंचदशी—भाग २ रा; १९०६; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(१३) सुबोध पंचदशी, [मूळ श्लोक, अन्वयार्थ, स्पष्टीकरण, अवतरणें व प्रत्येक प्रकरणाचा मथितार्थ, प्रस्तावना ]; १९२२; इंदिरा छापखाना, पुणें.

(१४) श्रीमच्छंकराचार्यप्रणीता अपरोक्षानुभूति; [ मराठी विवरणासह ]; शके १८२५; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(१५) शंकराचार्यकृत सार्थ आत्मबोध; [ मूळ संस्कृत व गद्य मराठी भाषांतर ]; १९०२; शारदाक्रीडन, मुंबई.

(१६) श्रीशंकराचार्यकृत प्रश्नोत्तररत्नमालिका; [ मूळ, अन्वय व सविस्तर अर्थ ]; १९१५; इंदिरा छापखाना, पुणें.

(१७) ब्रह्मसूत्र शारीरभाष्यार्थ–भाग १ ला; अध्याय १ ला; १९२४; इंदिरा छापखाना, पुणें.

(१८) ब्रह्मसूत्र शारीरभाष्यार्थ–भाग २ रा; अध्याय २ रा; १९२५; इंदिरा छापखाना, पुणें.

(१९) ब्रह्मसूत्र शारीरभाष्यार्थ–भाग ३ रा व ४ था [ मूळ सूत्र, सूत्रार्थ, शांकरभाष्य, अवतरणें, स्पष्टीकरण भामत्यादि टीकाकारांचा अधिक आशय व्यक्त करणाऱ्या टीपा यांसह ]; १९२५; इंदिरा छापखाना; पुणें.

(२०) शांकरभाष्यानुसार सुबोध ब्रह्मसूत्र किंवा वेदांतदर्शन ( वैयासिक न्यायमालेसह ); [ मूळ सूत्र, अवतरणें, शब्दशः सूत्रार्थ, वैयासिक न्यायमालेचे श्लोक, त्यांचा अन्वयार्थ, खुलासा, अधिकरणाचे पंचावयव ]; १९२३; इंदिरा छापखाना, पुणें.

(२१) श्रीमाहेश्वरदर्शनसार ( समतभेद ); १९१४; [ पाशुपत, शैव, प्रत्यभिज्ञा व रसेश्वर या चारी माहेश्वरांचीं मतें ]; १९१४; इंदिरा छापखाना, पुणें.

(२२) श्रीरामानुजदर्शनसार ( समतभेद ); १९१४; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(२३) श्रीपूर्णप्रज्ञदर्शनसार ( समतभेद ); १९१४; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(२४) श्रीवल्लभदर्शनसार ( समतभेद ); १९१४; इंदिरा छापखाना, पुणें.

(२५) चार्वाकदर्शनसार ( खंडनासह ); १९१३; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(२६) जैनदर्शनसार ( खंडनासह ); १९१३; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(२७) बौद्धदर्शनसार ( खंडनासह ); १९१३; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(२८) शांकरभाष्यानुसार सुबोध उपनिषत्संग्रह; १९२३; इंदिरा छापखाना, पुणें.

(२९) ऐतरेयोपनिषद्भाष्यार्थ; [ अन्वय, अर्थ व आनंदगिरीकृत टीकेच्या अनुरोधानें वाक्ययोजना यांसह. मूळ व अर्थ ]; १९१३; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(३०) ऐतरेयोपनिषदर्थप्रकाशरूप आत्मपुराण, अध्याय १ ला; १९१३; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणे.

(३१) श्री विद्यारण्यमुनिकृत उपनिषत्तात्पर्यरूप अनुभूतिप्रकाश; १९१३; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(३२) श्री शंकरानंदप्रणीत कौषीतकि सारार्थप्रकाशरूप आत्मपुराण–अध्याय २ रा; १९१९; इंदिरा छापखाना, पुणें.

(३३) काठकोपनिषद्भाष्यार्थ; शके १८३७, शके १८४७; इंदिरा छापखाना, पुणें.

(३४) तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ; १९१४; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(३५) सार्थ तैत्तिरीयोपनिषद्; १९१३; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(३६) श्रीविद्यारण्य मुनिकृत उपनिषत्तात्पर्यरूप अनुभूतिप्रकाश, १९१४; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(३७) श्रीशंकरानंदप्रणीत तैत्तिरीयोपनिषदर्थप्रकाशरूप आत्मपुराण—अध्याय १० वा; १९१४; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(३८) नारायणोपनिषद्; [ सान्वयार्थ ]; १९१४; लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

(३९) ईशोपनिषद्भाष्यार्थ; आ. दुसरी १९२१; इंदिरा छापखाना, पुणें.

(४०) बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ—भाग १ ला-अध्याय १ ला: शके १८३७; शके १८४७, इंदिरा छापखाना, पुणें.

(४१) बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ—भाग २ रा; अध्याय २ व ३; शके १८३९; इंदिरा छापखाना, पुणें.

(४२) बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ—भाग ३ रा; अध्याय ४, ५, ६; शके १८३९; इंदिरा छापखाना, पुणें.

(४३) छान्दोग्योपनिषद्भाष्यार्थ; शके १८४०; इंदिरा छापखाना, पुणें.

(४४) प्रश्नोपनिषद्भाष्यार्थ; शके १८३७, शके १८४७; इंदिरा छापखाना, पुणें.

(४५) माण्डूक्योपनिषद्भाष्यार्थ; शके १८३९; इंदिरा छापखाना, पुणें.

(४६) मुण्डकोपनिषद्भाष्यार्थ; १९१४; इंदिरा छापखाना, पुणें.

(४७) श्रीजैमिनी अश्वमेध; [ मूळ संस्कृत व मराठी भाषांतर ] १९१३; मोदवृत्त छापखाना, वाई.

(४८) श्रीयाज्ञवल्क्यस्मृति ( मिताक्षरासारासह ); [ मूळ संस्कृत व मराठी भाषांतर, श्लोक सूचीसह ]; १९१२, मोदवृत्त छापखाना, वाई; १९२९, चित्रशाळा छापखाना, पुणें.

(४९) श्रीमच्छंकराचार्यप्रणीतं सविवरणं हरिमीडेस्तोत्रम्; १९०९; [ मूळ व मराठी विवरण ] इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(५०) श्रीभविष्यमहापुराण–भाग २ रा. मोदवृत्त छापखाना, वांई.

(५१) श्रीभविष्यमहापुराण-भाग ३ रा; शके १८३१ मोदवृत्त छापखाना, वांई.

(५२) बृहद्योगवासिष्ठसार–भा. १ ला; १९०९; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(५३) बृहद्योगवासिष्ठसार–भा. २ रा; १९१०; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(५४) बृहद्योगवासिष्ठसार–भा. ३ रा; १९१२; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(५५) बृहद्योगवासिष्ठसार–भा. ४ था; १९१२; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(५६) आनंदरामायणसार, १९०४; आ. ३ री १९२८; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(५७) श्रीअद्‌भूतरामायण; १९१०; मोदवृत्त छापखाना; वांई.

(५८) श्रीहरिवंशपुराण ( महर्षिव्यासप्रणीत ) हरिवंशपर्व व विष्णुपर्व–भाग १ ला; १९११; मोदवृत्त छापखाना, वांई.

(५९) श्रीहरिवंशपुराण (महर्षिव्यासप्रणीत) भविष्यपर्व-भाग २ रा; १९११; मोदवृत्त, वांई.

(६०) पुष्पदन्तविरचित शिवमहिम्नस्तोत्राचें मराठी विवरण; १९०२; शारदाक्रीडन, मुंबई.

(६१) श्रीगणेश पुराण—पूर्वार्ध व उत्तरार्ध; शके १८२७; मोदवृत्त छापखाना, वांई.

(६२) सार्थ अवधूतगीता; [ मूळ संस्कृत व मराठी गद्य भाषांतर ]; आ. २ री; मुंबईवैभव प्रेस; मुंबई.

(६३) कथासरित्सागर—भाग १ ला; १९११; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(६४) कथासरित्सागर—भाग २ रा; १९११; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(६५) कथासरित्सागर—भाग ३-४; १९१२; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(६६) सुभाषितसंग्रह—( सार्थ ); १९१०; इंदुप्रकाश छापखाना, मुंबई.

(६७) श्रीमदानंदमूर्तिचरितम्; [ मूळ पद्यात्मक संस्कृत व गद्यात्मक मराठी भाषांतर ]; १९३०; इंदिरा छापखाना, पुणें.
(६८) एकनाथी भागवतार्थ—पूर्वार्ध–भाग १ ला; [ मूळ एकनाथी भागवत व गद्यात्मक अनुवाद ]; १९२७; इंदिरा छापखाना, पुणें.
(६९) एकनाथी भागवतार्थ—उत्तरार्ध–भाग २ रा; १९२७; इंदिरा छापखाना, पुणें.
(७०) श्रीमन्महाभारतार्थ; खण्ड १ ते ७; कर्नाटक छापखाना, मुंबई.
(७१) महर्षि श्री वाल्मीकिप्रणीत योगवासिष्ठ या ग्रंथाचें मराठी सुरस भाषांतर; भाग २, ३; चिपळुणकर आणि मंडळी, पुणें.

**चरित्र, चर्चा, अभ्यास :**

आचार्यभक्त शास्त्रसुधाकर विष्णुशास्त्री बापट यांचें संक्षिप्त चरित्र; १९३३; लक्ष्मीबाई प्रधान; आनंद छापखाना, पुणें.

**बाळेकुंद्रीकर, श्रीपंतमहाराज** [ ३-९-१८५५—१६-१०-१९०५ ] अवधूतसंप्रदायी ब्रह्मविद्. यांचें संपूर्ण नांव दत्तात्रय रामचंद्र कुळकर्णी. सांगली संस्थानांतील बाळेकुंद्री हें यांचें मूळ गांव. बेळगांव जिल्ह्यांतील हुक्केरी तालुक्यांतील दड्डी हें यांच्या मातृघराण्याचें गांव. या दड्डी गांवीं यांचा जन्म झाला. शिक्षण बेळगांवांत लंडन मिशन स्कूलमध्यें झालें. १८७७ सालीं त्यांनीं पब्लिक सर्व्हिसची व पुढें १८८० मध्यें मॅट्रिकची परीक्षा दिली व याच मिशन स्कूलमध्यें त्यांनीं शिक्षकाची नोकरी पत्करली. १९०३ च्या जून महिन्यापर्यंत या शाळेंत अध्यापनाचें काम करून ते सेवानिवृत्त झाले. विद्यार्थिदशेंत असतांनाच यांना बालमुकुंद नांवाच्या एका अवधूत संप्रदायी सिद्धाचा सहवास घडून परमार्थमार्गाचें वळण लागलें. या बालमुकुंदांनीं श्रीपंतांस शके १७९७ आश्विन वद्य १२ ( गुरुद्वादशी, २६-१०-१८७५ ) अवधूतमार्गाची दीक्षा दिली. दीक्षा घेतल्यानंतर प्रपंच साधून परमार्थाचें त्यांनीं साधन केलें व इतरांकडूनहि करविलें. सर्वसाधारणपणें 'अवधूत' म्हणजे त्रिमूर्ति दत्तात्रेय असें समजतात. पण 'अवधूत' हा शब्द विवक्षित–अंतरंग–स्थितीचा द्योतक असून 'अवधूतोपनिषदां'त वर्णिल्याप्रमाणें "अविनाशित्व, श्रेष्ठत्व, सर्व संसारपाशांतून मुक्तता, श्रुतिवचनानें मर्मज्ञता,

वर्णाश्रमबंधनातितता, सदा आत्मनिष्ठ व अखंडयोग या लक्षणांनीं युक्त अशी स्थिति ज्याच्या ठिकाणीं आढळते त्यालाच 'अवधूत' म्हणून संबोधिलें जातें. अंतरंगीं पूर्ण असंगता अथवा अनासक्ति आणि भक्तिप्रेमरंग व सहज स्थितीची राहाणी यांचें या राहाटींत समीकरण झालेलें असतें. तत्त्वबोध हें अवधूत संप्रदायाचें एक मुख्य अंग आहे. तें तत्त्व म्हणजे श्रुतिप्रतिपादित 'एकमेवाद्वितीयम् ब्रह्म' हा अद्वैतसिद्धांत होय. साधारणपणें तत्त्वबोध करणें म्हणजे व्याख्यानद्वारा हा अद्वैतसिद्धांत विशद करून सांगणें अथवा त्याची फोड करून तो शिष्याला समजावून देणें असें समजलें जातें. याप्रमाणें ब्रह्मतत्त्वाचें जें ज्ञान होतें त्याला परोक्षज्ञान म्हणतात. पण परोक्ष ज्ञान हें शब्दज्ञान होय. अनुभवाशिवाय त्याचा उपयोग नाहीं. उलट तें ज्ञानाभिमानाला कारणीभूत होण्याचा संभव असतो. त्यामुळें ब्रह्मतत्त्वाचा म्हणजे स्वस्वरूपाचा अनुभव येणें हें अत्यावश्यक आहे. म्हणून तत्त्वबोध करणें म्हणजे तें तत्त्व अनुभवाला आणून देणें होय. अनुभवयुक्त जें ज्ञान त्याला अपरोक्ष ज्ञान म्हणतात श्रीपंतांनीं, आपल्या आयुष्यभर, या अपरोक्ष ज्ञानाचा लेखन, संभाषण व भजन यांद्वारा प्रचार केला. यांच्या लेखनसंभाराचें स्वरूप, पद्य, स्फुट लेख, पत्रें व संभाषणें, असें आहे. श्रीपंतांचें हें सर्व लेखन 'श्रीदत्तप्रेमलहरी पुष्पमाला' या नांवानें आठ खण्डांत प्रसिद्ध करण्यांत आलें आहे. श्रीपंतांच्या ठिकाणीं सद्गुरूची पूर्ण कृपा, आत्मानुभवाचें भरपूर भांडार, भक्तिप्रेमाचा विशुद्ध जिव्हाळा, शिष्यप्रबोधनकार्याची उत्सुकता, रसिकता, मार्मिकता, शास्त्रप्रतीति, योगादि साधनांतील प्रावीण्य, भाषाप्रभुत्व व चातुर्य हे गुण एकवटल्यामुळें त्यांचें लेखन वैचारिक दृष्ट्या महत्त्वाचें व उच्च दर्जाचें झालेलें आहे.

**वाङ्मयः**

श्री दत्तप्रेमलहरी; खण्ड १ ते ८; प्रसिद्धीकाल शके १८४८ ते शके १८५४; तरुणभारत छापखाना, बेळगांव.

**चरित्र, चर्चा, अभ्यासः**

श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रीकर यांचें चरित्र; केशव रामचंद्र दिवेकर; १९३७; मुंबई.

# चरित्रसूचि